॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥

# श्रीथोरलेस्वामीमहाराज

## श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांचे चरित्र

( उत्तरार्ध – सिद्धखण्ड – क्रमाङ्क ४ )

– खण्ड पाचवा –




–: लेखक :–

द. सा. मांजरेकर

डॉ. केशव रामचंद्र जोशी

एम्. ए., पीएच्. डी.

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

सौ. मंदाकिनीताई मराठे

निर्वैर व्हावे सर्व भूतांसवे।
साधन बरवें हेंचि एक ॥

केशव रामचंद्र जोशी

दि. १६/७/१९०७

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥



# श्रीथोरलेस्वामीमहाराज

## श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांचे चरित्र

( उत्तरार्ध – सिद्धखण्ड – क्रमाङ्क ४ )

## – खण्ड पाचवा –



शक्तिपात


–: लेखक :–

द. सा. मांजरेकर

डॉ. केशव रामचंद्र जोशी

एम्. ए., पीएच्.डी.

प्रकाशक :

व्यवस्थापक,
सिद्धयोग प्रकाशन,
२६।२०२ लक्ष्मीनगर, पुणे ९.
पिन ४११००९

★

मुद्रक :

ज. प. खरे
आदित्य मुद्रण,
१४४२ शुक्रवार पेठ, पुणे २.
पिन ४११००२

★

प्रकाशनकाल :

प्रथमावृत्ती – १९९०

★

★ मूल्य ८० रुपये ★

## —: नमन :—

श्रीवासुदेवा जगत्पालका । जय विधे जगत्कारका ।
जय शंभो जगत्तारका । चित्तहारका तुज नमो ॥१॥
तूंची आर्यसंरक्षक । तूंची अनार्यशिक्षक ।
तूंची हें ग्रंथकौतुक । करविसी लोक तारावया ॥२॥
परात्पर परंज्योती । तूंची परब्रह्ममूर्ती ।
कोण जाणे तुझी गती । स्वयंज्योती तूं श्रीदत्त ॥३॥
विविध धर्मान्वित । ज्ञानभक्तिरसभरित ।
असे हे श्रीवासुदेव चरित । मूर्तिमंत अमृत कीं ॥४॥
विहार तुझा स्वभक्त हृदयांत । तूं भक्ताधीन सतत ।
केशव मागतो पसरून हात । ह्या ग्रंथीं सतत सान्निध्य ठेवी



## —: समर्पण :—

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक भक्तवत्सल भक्ताभिमानी भक्तकामकल्पद्रुम भक्तहृदयनिवासी राजराजेश्वर श्रीसद्गुरुनाथवासुदेवस्वरूप श्रीमन् शक्तिपाताचार्यवर्य महासिद्धयोगी श्रीयुक्त श्रीसमर्थ सकलसन्तश्रेष्ठ श्रीसद्गुरुनाथ श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या परमपवित्र व परमकोमल चरणी कोटी कोटी साष्टांग दण्डवत् प्रणाम करून परमप्रेमपूर्वक व परमशरणागतीपूर्वक सादर समर्पण.

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

## —: श्रीसद्‌गुरुध्यान :—

श्रीसद्‌गुरुं च यतिरूपधरं ह्यनन्तम् ।
सच्चित्सुखं विधिहरीशमयं दयाब्धिम् ॥
भक्तिप्रियं भजकदुःखहरं त्र्यधीशम् ।
श्रीवासुदेवगुरुदत्तमहं नमामि ॥१॥
श्रीगुरो तुझी मानवी तनू । हंसरूपिणी सिद्ध आसनू ॥
दंडपात्र काषाय अंबरू । अन्तरीं वसो दे निरन्तर ॥२॥



## ॥ श्रीसद्‌गुरुचरणी विज्ञापना ॥

गुरु माझा मोक्षदाता । श्रुती गर्जती सर्वथा ॥१॥
गुरु माझा कल्पतरू । भवाब्धीला हा उतारू ॥२॥
गुरु एक मातापिता । दुःखः शोक भयहर्ता ॥३॥
गुरूला जे शरण जाती । ऋद्धि सिद्धि दासी होती ॥४॥
गुरू देवांचाही देव । भक्तांलागीं त्याचा ठाव ॥५॥
मुखीं वासुदेव गुरू । सीतारामा हा निर्धारू ॥६॥

★ ★ ★

रेवा तिरींच्या वसणाऱ्या । ये गरुडेश्वरीं बसणाऱ्या ॥१॥
मानवरूपा घेणाऱ्या । विरक्तियोषा वरणाऱ्या ॥२॥
न्यासोद्धारण करणाऱ्या । स्वभक्तदुरिता हरणाऱ्या ॥३॥
सहजावस्थे असणाऱ्या । सायुज्यामृत देणाऱ्या ॥४॥
सीतारामीं रमणाऱ्या । निजभक्ताच्या कैवाऱ्या ॥५॥

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीशिववामनाय नमः ॥

## प्रस्तावना :–

### ॥ श्रीश्रीसद्गुरुचरित्रसंगमाहात्म्य ॥

वासुदेवचरित्र भक्तिगुटिका जे आवडी सेविती ।
चित्तामाजि अखंड तत्स्मरण ही जे प्रीतिनें ठेविती ।
ते सारे गुरुभक्त मुक्त सदा भवबंधांतूनि होतिल ।
ब्रह्मानन्दपदासि साध्य करुनी जन्मीच ह्या घेतील ॥

★ ★ ★

सन्तसमागम जोड । मनुजा । सन्त समागम जोड ॥ध्रु०॥
उत्तम जन्मा येउनि प्राण्या । दुर्जन संगति सोड ॥ मनु० ॥१॥
विषयविषातें न करीं प्राशन । अंतक मोडिल खोड ॥ मनु०।२।
सद्गुरुचरणीं लीन होशि तरी । फेडिल मनिचें कोड ॥ मनु०॥
मन हें उन्मन करुनि पहासी । उगवे चिन्मय मोड ॥ मनु० ।४।
सीतारामीं शरण होउनी । हृदग्रंथीतें तोड ॥ मनु० ॥५॥

श्रीमान् शक्तिपाताचार्यवर्य महासिद्धयोगी श्रीसन्त सद्गुरू श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या असीम व लोकोत्तर प्रेमकृपाशीर्वाद बलाने, आज त्यांचे श्रीसमर्थ सद्गुरू " श्रीथोरले-स्वामीमहाराज " अर्थात् अनन्त कोटी ब्रह्माण्डनायक राजाधिराज श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बे-स्वामीमहाराज यांच्या विस्तृत व खण्डशः प्रसिद्ध होणाऱ्या चरित्राचा पाचवा खण्ड अर्थात् उत्तरार्धं–सिद्धखण्ड–क्रमाङ्क चार हा प्रसिद्ध होत आहे, ही परमभाग्याची गोष्ट आहे.

" श्रीथोरलेस्वामीमहाराज " या खण्डात्मक चरित्रग्रंथाच्या पहिल्या खण्डाच्या प्रस्तावनेत कथन केल्याप्रमाणे हे " श्रीवासुदेव-माहात्म्य " किंवा " श्रीवासुदेवमहापुराण " असून या अलौकिक, लोकोत्तर व एकमेवाद्वितीय अशा महापुराणाच्या पहिल्या खण्डात श्रीस्वामीमहाराजांचा श्रीक्षेत्र माणगाव येथे जन्म झाल्यापासून म्हणजे शके १७७६ अर्थात् इ. स. १८५४ ते त्यांनी श्रीक्षेत्र उज्जयिनी येथे दण्डग्रहण केला म्हणजे शके १८१३ अर्थात् इ. स. १८९१ पर्यन्तचा जीवनवृतान्त कथन केला आहे. अर्थात् प्रथम खण्डात श्रीस्वामीमहाराजांच्या वयाच्या ३६ व्या वर्षांपर्यन्तची सर्व हकीकत आली असून एक प्रकारे त्यांच्या जीवनाच्या पूर्वार्धामधील साधनकाळातील वृतान्त यात सामाविलेला आहे. त्यामुळे या खण्डाला पूर्वार्ध–साधनाखण्ड असे म्हटले आहे. श्रीस्वामीमहा-राजांच्या वयाच्या ३६ व्या वर्षी ज्यावेळी श्रीगोदावरीनदीच्या तीरी श्रीक्षेत्र गंगाखेड येथे त्यांची मंडळी सौ. अन्नपूर्णाबाई यांना देवाज्ञा झाली त्यावेळी त्यांनी आपल्या सौ. पत्नीच्या तेराव्या दिवसां-पर्यन्तच्या सर्व क्रिया यथाविधी केल्यानन्तर चोदाव्या दिवशी संन्यास घेऊन पुढे श्रीक्षेत्र उज्जयिनी येथे जाऊन श्रीमत् परमहंस परि-व्राजकाचार्य श्रीनारायणानन्दसरस्वतीस्वामीमहाराज यांच्याकडून दण्ड ग्रहण केला. त्यावेळी श्रीदत्तप्रभूंनी त्यांना अशी आज्ञा केली की, " आज सर्वत्र वर्णाश्रमधर्माचा लोप झालेला आहे; तरी यापुढे सर्व भरतखण्डात पायीच संचार करून सर्व लोकांना दीक्षोपदेश द्यावा व धर्ममार्गाची स्थापना करून ईश्वरनिष्ठा व स्वधर्मनिष्ठा जागृत करावी. " या आज्ञेचे श्रीक्षेत्र उज्जयिनी येथपासून पालन करता करता वयाच्या ६० व्या वर्षी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे समाधी घेईपर्यन्त श्रीस्वामीमहाराजांचे एकूण २३ चातुर्मास झाले. त्यातील

शके १८१३ अर्थात् इ. स. १८९१ ते शके १८२६ अर्थात् इ. स. १९०४ पर्यन्तच्या १४ चातुर्मासांचा म्हणजे श्रीस्वामीमहाराजांच्या वयाच्या ५० व्या वर्षांपर्यन्तचा काल दुसऱ्या खंडात अर्थात् "उत्तरार्धं सिद्धखण्ड–क्रमाङ्क १" यात कथन केला असून शके १८२७ अर्थात् इ. स. १९०५ च्या १५ व्या चातुर्मासापासून शके १८३० अर्थात् इ. स. १९०८ च्या १८ व्या चातुर्मासापर्यन्तचा म्हणजे वयाच्या ५५ व्या वर्षांपर्यन्तचा काळ तिसऱ्या खण्डात म्हणजे "उत्तरार्धं–सिद्धखण्ड–क्रमाङ्क २" यात चित्रित केला आहे. चवथ्या खण्डात म्हणजे "उत्तरार्धं–सिद्धखण्ड–क्रमाङ्क ३" मध्ये शके १८३१ अर्थात् इ. स. १९०९ च्या १९ व्या चातुर्मासापासून शके १८३२ अर्थात् इ. स. १९१०–११ च्या २० व्या चातुर्मासापर्यन्तचा म्हणजे वयाच्या ५७ व्या वर्षांपर्यन्तचा काळ चित्रित केला असून प्रस्तुत पाचव्या खण्डात म्हणजे "उत्तरार्धं–सिद्धखण्ड–क्रमाङ्क ४" मध्ये शके १८३३ अर्थात् इ. स. १९११ च्या २१ व्या चातुर्मासापर्यन्तचा म्हणजे शके १८३४ अर्थात् इ. स. १२१२ ला श्रीस्वामीमहाराजांचा चिखलदा येथे २२ वा चातुर्मास सुरू होईपर्यन्तचा त्यांच्या वयाच्या ५८ व्या वर्षापर्यन्तचा काळ चित्रित केला आहे

श्रीस्वामीमहाराजांच्या अवतारी अशा लोकोत्तर जीवनातील कितीतरी महत्त्वाचे, अपूर्व, अभ्यसनीय, आदर्शकारी, मनोहारी व अलौकिक पैलू या पाचव्या खण्डात कथन केलेल्या त्यांच्या जीवनात प्रकट झालेले दिसून येतात. त्यातील काही मनोज्ञ पैलूंचे दिग्दर्शन केले; तर ते सर्व साधक–भक्तांना आपली त्यांच्या चरणांवरील श्रद्धा दृढतम करण्याला, उत्तरोत्तर शरणागती वृद्धिगत करण्याला व त्यांच्यावरील भक्तिप्रेमाची चढती कमान कायम ठेवण्याला उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटतो.

श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या या पाचव्या खण्डात प्रस्तुत झालेल्या त्यांच्या जीवनात प्रकट झालेला सर्वात् महत्त्वाचा पहिला पैलू "श्रीस्वामीमहाराज हे अवतारी महापुरुष होते," हा आहे. भगवान् श्रीदत्तात्रेय, श्रीपादश्रीवल्लभ व श्रीमन्नृसिंहसरस्वती-स्वामीमहाराज या तीन अवतारांप्रमाणेच श्रीस्वामीमहाराजांच्या अवताराचे प्रयोजन हे दीक्षाद्वारा अर्थात् कृपा करून म्हणजे भक्त व मुमुक्षूजनांच्या ठिकाणी आपल्या अद्‌भुत, अलौकिक व लोकोत्तर अशा शक्तींचा स्थूल, सूक्ष्म व पर पातळीवर दिव्य असा संचार करून अर्थात् शक्तिपात करून त्यांची अनादि निद्रिस्त आत्मशक्ती जागृत करून इहपर भोगमोक्ष दानाने अखण्ड कल्याण करणे हेच आहे, हे स्पष्ट होते. (पृ. ३९) या हेतूच्या प्रकाशात "आपण या स्थानी (श्रीक्षेत्र कुरवपूर येथे) येऊन चातुर्मास करावा म्हणजे पुष्कळ मंडळी येथे येऊन हे दुर्गम स्थान प्रसिद्ध होईल," अशी श्रीपाद-श्रीवल्लभांनी श्रीस्वामीमहाराजांना आज्ञा करून व त्यांना श्रीक्षेत्र कुरवपूर येथे चातुर्मास करावयास लावून व काही काळ त्यांचे येथे वास्तव्य करवून घेऊन त्यांच्याकडून हे स्थान प्रसिद्ध कसे केले व उपरोक्त प्रयोजनांची पूर्ती कशी केली, हे सर्व पाहणे आवश्यक आहे. (पृ. ३३ ते ३९) या दृष्टीनेच म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांचा "सन्त परिचय" (पृ. ३९ ते ५०) हा लेख अत्यन्त अभ्यसनीय आहे, याची साधक–वाचकांना खात्री पटल्याशिवाय राहणार नाही.

जे अवतारी सन्त महापुरुष असतात त्यांच्या जीवनाचे रहस्य अत्यन्त गहन, गंभीर व गूढ असे असते. श्रीरामेश्वरभट्ट यांनी श्रीसन्ततुकाराममहाराजांच्या अवताराचे हे रहस्य प्रकट करताना जे म्हटले आहे ते श्रीस्वामीमहाराजांना पूर्णांशाने लागू पडते. श्रीरामेश्वरभट्ट हे रहस्य प्रकट करताना असे म्हणतात की–

भक्त भागवत जीवन्मुक्त सन्त। महिमा अत्यद्‌भुत चराचरीं ।।१।। ऐसिया अनन्तामाजीं तूं अनन्त। लीलावेश होत जगत्राता ।।२।। ब्रह्मानन्द तुकें तुळे आला तुका। तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ।। ३ ।। शास्त्रशिष्टाचार अविरुद्ध क्रिया। तुझी भक्तराया देखियेली ।।४।। देऊनि तिळांजुळी काम्यनिषिद्धासी। विधिविनियोगेशीं ब्रह्मार्पण ।।५।। सन्त ग्रहमेळीं जगदांध्या गिळी। पैल उदयाचळीं भानु तुका ।।६।। सन्तवृन्दें तीर्थें गौतमी हरिकथा। तुकया नरसिंहस्ता भेटों आली ।।७।। शान्तिपतिव्रते झालें परिणयन। कामसन्तर्पण निष्कामता ।।८।। क्षमा क्षमेपणें प्रसिद्ध प्रथा जगीं। तें तों तुझ्या अंगीं मूर्तिमन्त ।।९।। दया दीनानाथा तुवां जीवविली। विश्वीं विस्तारलीं कीर्ति तुझी ।।१०।। वेदवाक्य बाहो उभारिला ध्वज। पूजिले देवद्विज सर्वभावें ।।११।। अधर्मक्षयव्याधि धर्माशीं स्पर्शला। तो त्वां उपचारिला अनन्य भक्ति ।।१२।। ब्रह्म ऐक्यभावें भक्ति विस्तारिली। वाक्यें सफल केलीं वेदविहितें ।।१३।। देहबुद्धि जात्या अभिमानें वंचलों। तो मी उपेक्षिलों न पाहिजे ।।१४।। न घडो याचे पायी बुद्धीचा व्यभिचार। मागे रामेश्वर रामचंद्रा ।।१५।।

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा दुसरा महत्त्वाचा पैलू "आचारः प्रभवो धर्मः।" व "सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।।" या उभयविध न्यायाने एकीकडे आचाराची पराकाष्ठा व दुसरीकडे ईश्वरावर पराकाष्ठेचे प्रेम यांच्या अद्‌भुत मिश्रणाने बनलेला

संमिश्र असा आहे. श्रीक्षेत्र कुरवपूर येथे श्रीस्वामीमहाराज आल्या-वर पहिल्या एक-दोन दिवसात भिक्षेची जी समस्या उद्‌भविली त्यावरून हा पैलू स्पष्ट होतो. (पृ. ५४) श्रीस्वामीमहाराजांनी आचाराबद्दलची आपली पराकाष्ठेची निष्ठा आयुष्यभर राबविलेली दिसून येत असली; तरी त्यांचे देवांवर इतके उत्कट प्रेम होते व देवांशी त्यांचे इतके सख्य होते की, या प्रेमापोटीच श्रीपादश्रीवल्ल-भांनी सांगितल्यावर त्यांनी आपले सर्व नियम बाजूला ठेवून श्रीक्षेत्र कुरवपूर येथे भिक्षा घेण्यास सुरुवात केली. (पृ. ५५) त्याचप्रमाणे श्री. रघुनाथ चिमणाजी थत्ते यांच्या पत्नीची पिशाच्च बाधा दूर करण्याचे श्रीस्वामीमहाराजांचे स्वत:चे सामर्थ्य असतानाही त्यांनी श्रीदेवांना त्यासंबंधी प्रार्थना केली असताना, "त्यांच्या मंडळींची व्यवस्था आपण नरसोबावाडीला करू. येथे त्यांच्या संबंधी काहीही उपाययोजना करता येणार नाही. त्याबद्दल तुम्ही कसलीही काळजी करू नये," असे श्रीदेवांनी सांगितल्यावर त्यांनी श्री. थत्ते यांना तसेच सांगितले. हा सर्वच प्रसंग देवभक्तांच्या ऐक्याचा, प्रेमाचा व श्रीस्वामीमहाराजांच्या निरभिमान वृत्तीचा निदर्शक आहे. (पृ. १५७ ते १५९) देवभक्तांचे हे प्रेम पाहिल्यावर एका बाजूला आचार निष्ठा व दुसऱ्या बाजूला प्रेमनिष्ठा यांच्या मनोज्ञ अशा प्रयाग संगमावरच आपण उभे असल्याची प्रचीती आपणास आल्या-शिवाय राहात नाही.

या दृष्टीने श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या १२ व्या अध्यायातील १४ व्या श्लोकाचा जो भावार्थ प्रकट केला आहे, तो अत्यन्त मननीय असा आहे. ते असे म्हणतात की, "माझ्या भक्ताच्या हृदयरूपी मंदिरात जीव आणि परमात्मा म्हणजे तो आणि मी हे दोन्ही ऐक्याच्या आसनावर बसून म्हणजे एकरूप होऊन

विराजमान होतात अर्थात् माझ्या भक्ताच्या ठिकाणी जीव-परमात्म्यैक्यनिश्चय अखण्ड विराजमान असतो. अशा प्रकारे माझा भक्त योगसम्पत्तीने पूर्णत्वास पावला असला; तरी तो आपले मन व बुद्धी माझ्या ठिकाणी अखण्ड अर्पण करतो. अर्जुना ! तोच भक्त, तोच योगी आणि तोच मुक्त असे समज. फार काय सांगावे. तो स्त्री व मी पती इतका तो मला आवडतो. खरे तर हे म्हणणेही योग्य नाही; कारण तो भक्त मला माझ्या जीवापेक्षाही जास्त प्रियकर आहे."

श्रीस्वामीमहाराजांचे श्रीदेवांशी असलेल्या या सख्यभक्तीच्या दृष्टीने श्रीदेवांनी श्रीस्वामीमहाराज समाधिस्थितीत असताना त्यांच्या अंगावर घाण टाकून मंदिरात आपल्या अंगावर असले घाण पदार्थ पडून त्रास कसा होतो, हे दाखवून देऊन त्याचा बंदोबस्त त्यांच्याकडून करवून घेतल्याचा सर्वच प्रसंग अत्यन्त बोलका आहे. (पृ. ६८ ते ७०) आचार हाच धर्माचा प्रमुख आधार असल्याने "श्रीगांडामहाराजांनी श्रीक्षेत्र कुरवपूर येथे पादुकांना पाणी घालू नये," असे श्रीदेवांनी श्रीस्वामीमहाराजांकडून सांगितले. श्रीदेवांची ही कठोर आज्ञा श्रीस्वामीमहाराजांनी अत्यन्त कठिण अन्तःकरण करून श्रीगांडामहाराजांना सांगितली व त्यांनीही ती आनन्दाने शिरोधार्य केली. याप्रमाणेच मामलेदारांची कथा व त्या दृष्टीने केलेले विवेचन (पृ. १०१ ते १०५), श्री. श्रीपादराव यांची कथा व श्राद्ध कर्माचे विवेचन (पृ. १२१ ते १३३) राजूरच्या संहितास्वाहाकार यज्ञात शेवटच्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांच्या पायाला अनाहूतपणे रुपयाचा स्पर्श झाल्याबरोबर त्यांचे तेथून निघून जाणे (पृ. २१५) इत्यादि सर्व कथा मोठ्या बोधप्रद व मननीय आहेत, यात काहीच शंका नाही. या सर्व कथा वाचल्या म्हणजे ज्याप्रमाणे "श्रुतिस्मृति ममैवाज्ञा," हे लक्षात घेऊन साधकांनी शास्त्रप्रामा-

त्याचा आपल्या मनात अत्यन्त आदर कसा केला पाहिजे याची जशी जाणीव होते, त्याचप्रमाणे या कथेवरून श्रीगांडामहाराजां-सारखे सच्छिष्य आपल्या प्राणापलीकडे गुर्वाज्ञा ही कशी शिरसावंद्य मानतात, हेही दिसून येते.

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांच्या व देवांच्या अन्तरंग प्रेमाचा प्रत्यय आपल्या सर्वांना यावा व त्यांच्यासारखी आचारनिष्ठा आपल्या सर्वांच्या ठिकाणी बाणावी म्हणून श्रीस्वामीमहाराजांच्या परम-कोमलचरणी अशी प्रार्थना आहे की, " प्रभो ! आपण आम्हा सर्व साधकभक्तांवर कृपेचा वर्षाव करून आम्हाला आपल्या सारखे भक्त करून देवभक्तांच्या अन्तरंग लीलेमध्ये आमचा समावेश करावा आणि आपल्या सारखीच पराकाष्ठेची आचारनिष्ठा आमच्या ठिकाणी उत्पन्न करून आम्हा सर्वांना धर्मकाया व धर्मबुद्धी द्यावी अशी आपल्या चरणी अत्यन्त कळकळीची प्रार्थना आहे. "

" श्रीस्वामीमहाराज अत्यन्त करुणासंपन्न होते, " हा त्यांच्या जीवनाचा तिसरा महत्त्वाचा पैलू आहे. त्यामुळेच दुष्काळ दूर होऊन सर्वत्र समृद्धी व्हावी याकरिता श्रीक्षेत्र कुरवपूर व आसपासच्या सर्व प्रदेशात पाऊस पडावा म्हणून त्यांनी ऋष्यश्रृंगाच्या मंत्राचा जप करवून घेतला. (पृ. ५५) अर्थात् या मंत्राच्या प्रभावामुळे सर्वत्र पाऊस पडून समृद्धी झाली. (पृ. ५५) या दृष्टीने श्री. लक्ष्मणराव वैद्य यांची कथा व त्या संबंधीचे विवेचन (पृ. १७६ ते १८०), मंजीरथ या गावातील एका बाईंना सर्पदंश झाला असता लिंबाची डहाळी अभिमंत्रून त्यांचे विष कसे उतरविले याची सर्व हकीकत (पृ. २९४) इत्यादि सर्व गोष्टी मोठ्या अभ्यसनीय आहेत.

" श्रीस्वामीमहाराजांचे आपल्या शिष्यांवर निरतिशय प्रेम असून शिष्यांनी आपल्या आज्ञेचे कटाक्षाने परिपालन केले पाहिजे व त्यात

यत्किंचितही कसूर करता कामा नये," हा त्यांच्या जीवनाचा महत्त्वाचा असा चवथा पैलू आहे. श्रीस्वामीमहाराजांचे आपल्या शिष्यांवर जे निरतिशय प्रेम होते त्या प्रेमापोटीच श्रीक्षेत्र कुरवपूर येथील चातुर्मासाच्या काळात त्यांनी श्रीगांडामहाराजांकडून सेवा करवून घेतली. (पृ. ५९) ही सेवा करवून घेताना श्रीस्वामीमहाराजांनी श्रीगांडामहाराजांना अपूर्व शिकवणही दिली. (पृ. ६३) ही शिकवण सर्व साधक–भक्तांनी आत्मसात करणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे श्रीगांडामहाराजांकडून साधन होऊन त्यांना "याचि देही याचि डोळा । पाहीन मुक्तीचा सोहळा ।" या श्रीसंततुकाराम-महाराजांनी सांगितलेल्या न्यायाने ब्रह्मानंदप्राप्ती व्हावी म्हणून "सर्व संचारामध्ये तू जर आमच्या बरोबर असाच फिरत राहिलास तर ब्रह्मदेवाचे आयुष्य मिळाले तरी ते अपुरेच पडेल," असे निक्षून सांगून त्यांना भडोचला पाठवून त्यांचे कल्याण कसे केले (पृ. २००, २०१) व या दृष्टिकोनातून कथन केलेल्या श्रीशुकमहामुनी, श्री उद्धव व श्रीकल्याणस्वामीमहाराज यांच्या सर्व कथा सर्वच साधक–भक्तांना अत्यन्त अभ्यसनीय, मननीय व हृद्य वाटतील यात तिलःप्राय शंका वाटत नाही. ( पृ. ३०२ ते ३२० ) श्रीस्वामीमहाराजांच्या गुर्वाज्ञापालनाचा कटाक्षाच्या दृष्टीने राजूरच्या संहितास्वाहाकाराला प. प. श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज आले असताना जो प्रसंग घडला तो सर्व साधक-भक्तांना शिकवणूक देणारा आहे, हे लक्षात घेतले पाहिजे. ( पृ. २०० ते २०२ )

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा "कृतिशील धार्मिक लोक-शिक्षण," हा महत्त्वाचा पाचवा पैलू आहे. या दृष्टीने श्रीस्वामी-महाराजांकडून एक स्तोत्र म्हणावयाचे राहिल्यावर त्यांनी स्वतःला विंचवाकडून चाववून घेतल्याची कथा मोठी वाचनीय आहे.

( पृ. ६४ ) श्रीदेवांच्या सेवेत व साधनेत यत्किंचित्‌ही कुचराई करता कामा नये असे कृतिशील धार्मिक शिक्षण लोकांना देण्या-करिताच श्रीस्वामीमहाराजांनी उपरोक्त प्रकारे कष्ट भोगून जो लोकोत्तर आदर्श उपस्थित केला तो पाहिला म्हणजे लोकशिक्षणा-करिता अशी अद्‌भुत लीला करणारे सन्त जगात फारच थोडे असतात याची प्रचीती येते. त्याचप्रमाणे श्री. श्यामराव चौधरी यांच्या प्रार्थनेप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांचे दोन उपाध्ये श्री. आप्पादेव व श्री. आण्णादेव यांची अरणे म्हणण्याची इच्छा तत्काळ कशी पूर्ण केली, ही सर्व हकीकत वाचनीय आहे. ( पृ. २९० ते २९२) श्रीक्षेत्र पैठण येथील श्रीसंतएकनाथमहाराजांच्या मठातील श्रीकृष्णांच्या मूर्तीच्या पुनर्प्रतिष्ठापनेची हकीकतही या पैलूच्या दृष्टीने मननीय अशीच आहे. (पृ. २९५)

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा सहावा महत्त्वाचा पैलू "समत्वाच्या अलौकिक आदर्शाची उपस्थिती," हा आहे. या दृष्टीने श्रीकृष्णामाईच्या दृष्टान्ताप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी शूद्रांना वाटलेल्या डाळीच्या प्रसादाची व शूद्र स्त्रियांची ओटी भरल्याची सर्व हकीकत वाचनीय आहे. (पृ. ७१) श्रीस्वामीमहाराजांची ही समत्वाची दृष्टी किती विस्तृत होती हे महाभुजंगाच्या कथेवरून स्पष्ट होते. (पृ. ७३ ते ७७) त्याचप्रमाणे श्री बाळेराव चौधरी यांच्या शेतातील दोष नाहीसा होऊन ते उत्तम पिकावे म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांच्या शेतावर फकिरांकडून नमाज पढवून घेण्यास सांगितल्याचे पाहिल्यावर, त्यांच्या समत्वाच्या दृष्टीची उंची मोजमापाच्या पलीकडील आहे, हे लक्षात येऊन मन आश्चर्याने थक्क होऊन, ते त्यांच्या चरणी नतमस्तक झाल्याशिवाय राहात नाही. ( पृ. २७८ )

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा सातवा महत्त्वाचा पैलू "श्रद्धा" हा आहे. साधन चतुष्टयान्तर्गत शम, दम, उपरती, तितिक्षा, श्रद्धा व समाधान या षट्सम्पत्तीतील श्रद्धा ही साधन-सम्पत्ती साधकांच्या ठिकाणी किती उत्कटतेने वास करणे आवश्यक आहे याचे प्रत्यन्तर एका स्त्रीच्या कथेवरून व त्यावर केलेल्या विवेचनावरून साधक–वाचकांना अवश्य येईल. (पृ. १०५ ते १२१) या दृष्टीनेच एका आंग्लविद्याविभूषित सरकारी अधिकाऱ्याची कथा (पृ. १३४ ते १५१), श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेली श्रीगुरु-चरित्रातील रजकभक्ताची कथा (पृ. १४० ते १५१) व एका भक्त कुटुंबियांची कथा ( १५१ ते १५७ ) इत्यादि सर्वच कथा अत्यन्त मननीय अशा आहेत. श्रद्धेच्या या पैलूचे अपूर्व दर्शन घडविणारी श्रीदासोपन्तांच्या वंशातील ब्राह्मणाला शिक्षा केल्याची कथाही या दृष्टीने पाहण्यासारखी आहे. (पृ. १८५ ते १८७)

"श्रीस्वामीमहाराज आपल्या देहाबद्दल पूर्णपणे अनासक्त होते," हा त्यांच्या जीवनाचा महत्त्वाचा आठवा पैलू आहे त्यामुळेच श्रीक्षेत्र कुरवपूर येथे कावळ्याने श्रीस्वामीमहाराजांच्या मस्तकावर तीन वेळा चंचुप्रहार केल्यावर "ज्या माणसाच्या मस्तकावर कावळा चंचुप्रहार करतो त्याचे आयुष्य सहा महिन्यांपेक्षा अधिक नसल्या-मुळे यापुढे या देहावर आता कोणीही प्रेम करू नये," असे त्यांनी अगदी निःशंकपणे सांगितले. (पृ. १८०)

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा महत्त्वाचा नववा पैलू "यज्ञ-निष्ठा" हा आहे. या दृष्टीने राजूरचा संहितास्वाहाकार व इतर वीस स्वाहाकारादि जे यज्ञ घडले त्या संबंधीचे (पृ. १९९ ते २४९) व पुढे यज्ञाच्या स्थूलार्थाचे व सूक्ष्मार्थाचे जे विवेचन केलेले आहे, त्याचे अभ्यासपूर्वक मनन केल्यास श्रीस्वामीमहाराजांच्या यज्ञ-

निष्ठेचे व यज्ञदृष्टीचे अलौकिकत्व प्रतीत झाल्याशिवाय राहणार नाही. (पृ. २४९ ते २७५)

" श्रीस्वामीमहाराजांच्या हस्तस्पर्शात अद्भुत सामर्थ्य सामावि-लेले होते, " हा त्यांच्या जीवनाचा दहावा पैलू सर्वात् महत्त्वाचा आहे. या दृष्टीने हिंगोली गावातील विहिरीच्या पाण्याचे शुद्धिकरण त्यांच्या हस्तस्पर्शाने कसे झाले (पृ. २७९) व श्री. श्यामराव चौधरी यांची मुलगी श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या कमंडलूतील पाणी शिंपडल्यामुळे जिवन्त कशी झाली (पृ. २८६) या दोन्ही कथा व त्यासंबंधी केलेले विवेचन (पृ. २८० ते २९०) आणि परिशिष्ट क्र. २ मधील माझे परमपूजनीय प्रातःस्मरणीय सद्गुरू श्रीसन्त वामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांचा " दैवी शक्तीचे संक्रमण " हा लेख वाचला म्हणजे त्यांच्या या पैलूंचे माहात्म्य आपल्या पुरेपूर लक्षात आल्याशिवाय राहणार नाही

सारांश, श्रीथोरल्यास्वामीमहाराजांच्या चरित्राच्या पाचव्या खण्डात चित्रित झालेले श्रीस्वामीमहाराज म्हणजे " मार्तण्ड जे तापहीन " या श्रीसन्तज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेल्या न्यायाने संसाररूपी अंधकार दूर करून शांती व सुख देणारे उष्णतारहित असलेले प्रतिसूर्यच आहेत, यात तिलःप्राय शंका नसल्याने " श्रीवासु-देवाय नमः । " अशी त्यांची अखण्ड प्रार्थना करीत आपले जीवन कृतकृत्य करण्यातच खरी धन्यता आहे. ज्याप्रमाणे मेघ हा चातक-पक्षावर जलवर्षाव करून त्याला अनायासाने जलप्रसाद प्राप्त करून देऊन संतुष्ट करतो त्याप्रमाणे आपणा सर्व साधकभक्तांवर श्रीस्वामीमहाराजांनी कृपावर्षाव करून आपला अनादि मोहमायादि अंधकार दूर करून आपणा सर्वांना त्यांनी अनायासाने संसार-सागरातून तरून न्यावे म्हणून श्रीस्वामीमहाराजांचे अनन्य भक्त व

त्यांचे पूर्वाश्रमातील बन्धू श्रीसीतारामम‌हाराज यांच्या शब्दात त्यांचे स्मरण व त्यांचा धावा करणे हेच योग्य ठरेल.

दीनदयाघन पतीतपावन सद्‌गुरु तूं देवा।
अनन्यभावें निशिदिनीं आम्ही करूं तुझी सेवा ॥ ध्रु० ॥
तेजोमय हें स्वयंप्रकाश निर्मल तव स्वरूप।
जगदुद्धारास्तव तूं घेशी हें मानवरूप ॥
अंतरिं दृष्टी करुनि पाहतां निर्गुण हें अरुप।
जडेंद्रियांसी प्रकाश देशी जैसा जगिं दीप ॥१॥
वसति दीव्यते इति व्युत्पत्या अन्वर्थक नाव।
सर्व भूवरी प्रसिद्ध जाहले स्वामि वासुदेव ॥
बहुजन त्वद्दर्शनासि येती मागति पदिं ठाव।
त्यांची इच्छा पुरवुनि भजनीं देशी सद्‌भाव ॥ २ ॥
स्वाश्रमोचित कर्में करुनी जे द्विज जगिं असती।
सात्विक बुद्धी पाहुनी त्यांवरि तुमची बहु प्रीती ॥
इच्छा त्यांची पुरवुनि देशी संतति संपत्ती।
दुराचारें वर्तती जे जाती अधोगती ॥ ३ ॥
सज्जनरक्षण धर्मपालनास्तव तूं अवतरशी।
कलिमाजीं या सर्व देवता गुप्त होति ऐसी ॥
श्रुतिस्मृतीचीं वाक्यें स्मरुनी जागृत तूं होसी।
सीताराम तव गुण गाउनि दृढ मिठि दे चरणांसी ॥४॥

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचे निरन्तर ध्यान व गुण-वैशिष्ट्यांचे वर्णन करून स्मरण केले म्हणजे श्रीसद्‌गुरू हा

मोक्षदाता व कल्पतरू आहे असा निर्धार अन्तःकरणात कसा उत्पन्न होतो याचे वर्णन करताना श्रीसीतारामममहाराज असे म्हणतात की–

गुरु माझा मोक्षदाता। श्रुति गर्जती सर्वथा ॥१॥
गुरु माझा कल्पतरू। भवाब्धीला हा उतारू ॥२॥
गुरु एक माता पिता। दुःख शोक भयहर्ता ॥३॥
गुरुला जे शरण जाती। ऋद्धिसिद्धि दासी होती ॥४॥
गुरु देवांचाही देव। भक्तांलागीं त्याचा ठाव ॥५॥
मुख्य वासुदेव गुरू। सीतारामा हा निर्धारू ॥ ६ ॥

आता खण्डशः प्रसिद्ध होणाऱ्या या बृहत् चरित्राच्या छपाईसाठी व प्रसारासाठी ज्यांचे साहाय्य झाले व होत आहे त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे हे माझे कर्तव्य आहे. श्रीथोरल्यास्वामी-महाराजांच्या चरित्राच्या पहिल्या चार खंडांना व विशेषतः या पाचव्या खण्डाला श्रीमती कान्ताबेन प्राणुभाई देसाई यांनी साहाय्य करून आपले पती स्वर्गीय श्री. प्राणुभाई मोहनभाई देसाई यांच्या स्मरणार्थ हा खण्ड श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी सप्रेम अर्पण केला आहे. त्यांचे हे साहाय्य अत्यन्त निरपेक्ष असल्यामुळे त्यांनी केलेली ही सेवा श्रीथोरलेस्वामीमहाराज व श्रीसद्गुरुनाथमहाराज यांच्या चरणी रुजू होऊन या उभयतांनी आपल्या कृपाशीर्वादाचे अखंड छत्र त्यांच्यावर धारण करून सामरस्यात्मक अंतिम स्थितीपर्यंत त्यांना पोहचवावे अशी त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

त्याचप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांचे एकांतिक भक्तश्रेष्ठ परम-पूजनीय श्री. नि. अ. तथा श्री. राजाभाऊ करंदीकरमहाराज, संस्थापक, श्रीवासुदेवानन्दसरस्वती ॐ श्रीसद्गुरु प्रतिष्ठान, बोरिवली, त्यांचे सर्व साधक, भक्त व कार्यकर्ते, माझे गुरुबन्धू

श्री. यशवन्त महादेव बाक्रे, बोरिवली, आणि श्री. दत्तात्रेय कोंडीराम शिंदे व त्यांच्या धर्मपत्नी सौ. सुलभाताई दत्तात्रेय शिंदे, बोरिवली, या सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या छपाईसाठी आणि त्यांनी रचलेल्या इतर ग्रंथांच्या प्रसारासाठी जे साहाय्य व जी अमोलिक मदत करून अपार कष्ट घेतले, घेत आहेत व घेणार आहेत त्याबद्दल मी त्यांचा अपार ऋणी आहे. या बाबतीत परम-पूजनीय श्रीस्वामीचरणभक्तश्रेष्ठ श्री. करंदीकरमहाराज यांचे साहाय्य व परिश्रम हे शब्दातीत असून त्यांच्या या उभयविध सह-कार्याबद्दल त्यांना व त्यांच्या साधक-भक्त कार्यकर्त्यांना माझे शतशः हार्दिक धन्यवाद आहेत !

याशिवाय श्री. सूर्यकान्त काशिनाथ भावे, सौ. उषाताई सूर्यकांत भावे, सौ. विजयाताई रघुवीर माटेगावकर, श्री. कृष्णाजी शिवराम आठवले, श्री. गोपाळराव सदाशिवराव खांडेकर, श्री. श्रीराम गोपाळराव खांडेकर, श्री. परमानन्द नैनवाल, श्री. रघुनाथ राजा-राम ऊर्फ अण्णासाहेब आपटे, श्री. शरद सीताराम ऊर्फ राजाभाऊ अत्रे, श्री. अरुणराव प्रभाकरराव राजे, श्री. उत्तमराव दिनकरराव पाटील, सौ. हेमलताताई उत्तमराव पाटील, श्री. चन्द्रकान्तराव रघुनाथराव पाटील, सौ. रेखाताई चन्द्रकान्तराव पाटील, श्री. शिरीष इच्छाराम चौधरी, श्री. यशवन्तराव गजाननराव ताटके, श्री. श्रीधर दिनकर ऊर्फ दादा खांडेकर, श्रीमती पद्मजा प्रशान्त सोनारीकर, श्री. पंडितराव रामचंद्रराव दातार (वकील), श्री. प्रभाकर धोण्डोपन्त अजोतीकर, श्री. सुभाष दिनकर ऊर्फ नाना खांडेकर, श्री. किशोर नारायण गोराडे, श्री. दत्तात्रेय वासुदेव ऊर्फ पोपटराव जोशी, सौ. सखूबाई दगडू पाटील, श्री. बबनराव देवबा लांडगे, श्री. सदाशिवराव भालचन्द्र शारंगपाणी, सौ. विद्या-

ताई सदाशिवराव शारंगपाणि, श्री. मंगलदास शंकरराव अंजने, श्री. मधुसूदन शंकरराव अंजने, श्री. आनन्दराव कृष्णाजी पाठक, श्री. गोपाळराव रामचन्द्रराव देशपांडे, प्रा. श्री. प्रकाश मोतीराम पाटील, सौ. अनसूयाबाई मोतीराम पाटील, श्री. सुधीर मनोहर देसाई, श्री. व्ही. जी. खेर, श्री. सुरेशराव रघुनाथराव पंडित, श्री. प्रभाकरराव नानाजी चौबळ, श्री. कमलाकरराव गजाननराव पाटील, श्रीमती विजयाताई यज्ञेश्वर पंडित, कै. श्री. सुरेशराव रामचन्द्रराव मल्लापूर, श्री. श्रीकान्त दिनकर ऊर्फ बण्डोपन्त खाण्डेकर, श्री. शा. द. करन्दीकर, श्री. लक्ष्मणराव परशरामराव पाटील, सौ. मालतीबाई लक्ष्मणराव पाटील, श्री. सुहासराव वासुदेवराव भारंबे, सौ. प्रतिभाताई सुहासराव भारंबे, गं. भा. द्वारकाताई नथ्थू चौधरी, श्री. घनःश्यामराव बाबूराव वायंगणकर, श्री. अनिल शंकर मुळचे, श्री. भास्कर मोरेश्वर आठवले, सौ. मंदाकिनीताई मराठे ( परमपूजनीय श्रीवामन दत्तात्रेय गुळवणी महाराज यांच्या नावाने साहाय्य) श्री. सदाशिवराव श्रीनिवासराव कुलकर्णी, श्री. अविनाश भालचन्द्र धामणकर, श्री. दत्तात्रेय मुकुंद सरदेसाई, श्री. श्रीकान्त दत्तात्रेय सरदेसाई, श्री. दत्तात्रेय गुलाबसा क्षत्रीय, श्री. मुकुन्दराव नारायणराव केन्दूरकर, श्री. हरिभाऊ नारायणराव कुलकर्णी, सौ. मीराताई हरिभाऊ कुलकर्णी, श्री. दत्तात्रेय नारायण मोहन-पाटील, सौ. गयाबाई दत्तात्रेय मोहन-पाटील, श्री. माधवराव धोण्डोपन्त अजोतीकर, श्री. विश्वनाथराव आनन्दराव पाटील, सौ. सुमनताई विश्वनाथराव पाटील, श्री. अ. स. कानेटकर, श्री. हरिहर गोपीनाथराव दाभाडे, श्री. बळवन्तराव केशवराव जोशी, श्री. दादासाहेब यंदे, सौ. उषाताई कुलकर्णी, श्री. अरुणकुमार शंकरराव वाघ, डॉ. सौ. कुमुदिनीताई अरुणकुमार

वाघ, श्री. दामोदर दत्तात्रेय पोळ, सौ. अनुराधाताई दामोदर पोळ, सौ. सुजाताताई भायदे, श्री. लक्ष्मणराव राजाराम महाजन, श्री. श्रीकृष्ण सदाशिव महाडेश्वर, श्री. प्रदीप पीरचंद पाटील, डॉ. श्री. गोविंद हरि चौधरी, सौ. राधाताई गोविंद चौधरी, श्रीमती पद्मावतीताई एकनाथराव कुलकर्णी या व इतरही सर्व गुरुबन्धू, गुरुभगिनी, साधक व प्रेमी मंडळींचे श्रीथोरलेस्वामीमहाराज यांच्या चरित्राच्या प्रकाशन कार्यासाठी अपरंपार साहाय्य झाले असून पुढील सर्व खण्डांसाठी हे व इतरही सर्व प्रेमी मंडळी साहाय्य करणार आहेत, ही श्रीस्वामीमहाराजांची व श्रीगुरुचरणांची अपार कृपा आहे यात काहीच शंका नाही. या सर्वांच्या साहाय्याविना श्रीस्वामी- महाराजांच्या चरित्राचा हा पाचवा खण्ड छापून प्रसिद्ध होणे कदापीही शक्य झाले नसते व पुढील खण्डही छापून प्रसिद्ध होणे शक्य नाही, हे नितान्त सत्य आहे. या सर्वांचे हे साहाय्य अत्यन्त निरपेक्ष असल्यामुळे त्यांनी केलेली ही सेवा श्रीथोरलेस्वामीमहाराज व श्रीसद्गुरुनाथमहाराज यांच्या चरणी रुजू होऊन या उभयतांनी आपल्या प्रेमकृपाशीर्वादाचे अखंड छत्र या सर्वांवर व त्यांच्या कुटुंबीय मंडळींवर ठेवावे अशी त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या या पाचव्या खण्डात श्रीक्षेत्र कुरवपूर येथील जी जी विविध चित्रे छापली आहेत, ती ती सर्व छायाचित्रे श्री. विनय मुरलीधर देशपांडे, भुसावळ, व श्री. बबनराव देवबा लांडगे, मुंबई, यांनी मोठ्या प्रेमाने, आत्मीयतेने व आपुलकीने त्या ठिकाणी स्वखर्चाने स्वत: जाऊन काढून आणून दिली. त्याच- प्रमाणे श्रीक्षेत्र कुरवपूर येथे आपले उभे आयुष्य घालवून श्रीपाद- श्रीवल्लभांची चरण सेवा करणारे त्यांचे एकनिष्ठ व एकांतिक भक्त श्री. शरच्चन्द्र केळकर यांनीही आपल्या जवळील त्या क्षेत्राचे

सर्व नवे व जुने फोटो मोठ्या प्रेमाने व उदार अंतःकरणाने दिल्या-मुळेच ते या चरित्रखण्डात छापता आले. या पाचव्या खण्डाची छपाईप्रत माझे धाकटे बंधू चि. हरिहर व त्यांच्या दोन मुली चि. कु. विजयागौरी व चि. कु. रोहिणी या तिघांनी मिळून अत्यन्त सुवाच्च अक्षरात खूप कष्ट घेऊन लिहून देऊन माझे श्रम हलके केले. श्री. द. सा. मांजरेकर यांनी अपरंपार कष्ट घेऊन हे चरित्र लिहून श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांची जी सेवा केली आहे, ती मोठी स्पृहणीय आहे, यात काहीच शंका नाही. त्याचप्रमाणे या चरित्राची मुद्रिते वाचणे, तपासणे इत्यादि इतर सर्व कामे श्री. माधवराव धोण्डोपन्त अजोतीकर, श्री. दिलीप धायतडक, श्री. शरद सीताराम ऊर्फ राजाभाऊ अत्रे, चि. हरिहर, सौ. रमा, चि. योगेश, चि. कु. विजयागौरी व चि. कु रोहिणी या सर्व घरातील मंडळींनी श्रीस्वामी-महाराजांची व श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांची अत्यन्त प्रेमाने सेवा म्हणून केली, ही मोठी भाग्याची गोष्ट आहे. उपरोक्त सर्वांनी केलेली ही त्यांची विविध सेवा, प्रेम व भक्ती श्रीस्वामीमहाराजांनी व श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांनी मान्य करून घेऊन, या सर्वांना व त्यांच्या कुटुंबीय मंडळींना धन्य व कृतार्थ करून त्या सर्वांवर प्रेम-कृपाशीर्वादाने छत्र अखण्ड धारण करावे म्हणून या उभयतांच्या चरणी शरणागतीपूर्वक प्रार्थना आहे.

या चरित्रग्रंथाच्या पाचव्या खण्डाची छपाई माझे मित्र व श्रीस्वामीमहाराजांचे सांप्रदायी श्री. ज. प. खरे यांनी हे आपले स्वतःचेच काम आहे या धारणेने व श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी आपली ही सेवा रुजू व्हावी म्हणून अत्यन्त प्रेमाने केली असून पुढील सर्व खंडांची छपाई ते मोठ्या आत्मीयतेने करून देणार आहेत, याबद्दल मी जेवढी कृतज्ञता व्यक्त करीन व त्यांना धन्य-

वाद देईन तेवढे थोडेच आहेत. त्यांची ही सेवा त्यांचे परमपूजनीय प्रातःस्मरणीय श्रीसद्गुरू श्रीनारायणमहाराज, त्यांचे श्रीसद्गुरू श्रीसीताराममहाराज व त्यांचे श्रीसद्गुरू ज्ञान व योगमूर्ती अखंड-मंडलाकार श्रीथोरलेस्वामीमहाराज या श्रीदत्तस्वरूप त्रयमूर्तींनी रुजू करून घेऊन त्यांना धन्य व कृतार्थ करावे अशी त्या सर्वांच्या चरणी नम्रतापूर्वक प्रार्थना आहे. त्याचप्रमाणे आदित्य मुद्रणालया-तील काम करणाऱ्या सर्वांचे अपरिमित साहाय्य झाले, होत आहे व होणार आहे हे नमूद करताना अत्यंत समाधान वाटत आहे. या या सर्व प्रेमी कर्मचारी बंधूंना श्रीस्वामीमहाराजांनी प्रेम, कृपा व आशीर्वाद देऊन त्यांचे इहपर अखंड कल्याण करावे म्हणून त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

इत्यलम्। श्रीसरस्वतीगंगाधर यांच्या "श्रीगुरुचरित्र" या ग्रंथातील शब्दात अल्पसा बदल करून असे म्हणता येईल की, "श्रीस्वामीचरित्रामृत। सेविता तृष्णा अधिक होत॥" हेच खरे आहे; कारण "श्रीस्वामी चरित्र ऐकता। लाधली सकळाभीष्टता। याकारणें ऐका समस्ता। श्रीगुरुचरित्र कामधेनू॥५१.६७॥ अमृताची असे माथणी। स्वीकारितां भाविकजनीं। धर्मार्थकाम-मोक्षसाधनीं। हेचि कथा ऐकावी॥६८॥ चतुर्विध पुरुषार्थ। लाधती श्रवणें परमार्थ। श्रीवासुदेवानंदसरस्वती गुरुनाथ। रक्षी त्यांचे वंशोवंशीं॥७१॥" अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचे चरित्र हे कामधेनू व चिन्तामणी असल्यामुळे श्रीसंतनिरंजनरघुनाथ यांच्या शब्दात थोडासा बदल करून त्यांचे गुणगान करताना असे म्हणता येईल की, "तस्मात् धन्य तो स्वामीराव। जो वैराग्यसिन्धू अभिनव। किंवा धैर्यमेरूचाचि ठाव। अचळपणें सर्वदा॥ श्रीरघुनाथ चरित्र॥ ३८६॥ जो तपोघनांमाजीं श्रेष्ठ। दत्तात्रेयांचा अवतार वरिष्ठ।

कलिमाजीं प्रकटला स्पष्ट। जनोद्धार करावया ॥३८७॥ जो ब्रह्म-विद्येचा रत्नाकर। अद्वैतबोधरत्नें सुंदर। सुमुमुक्षु पाहोनिया चतुर। निजकृपें लेववी ॥३८८॥ जो आत्मतत्त्वांतें दाविता। जो चैतन्यातें जागविता। अज्ञ जनांतें शक्तिपाता। करोनिया उद्धरी ॥३८९॥ श्रीस्वामीनाथ दयाकर। पूर्वेसि उगवला दिनकर। त्याचे सुप्रभें वारिंकर। भक्त प्रेमळ विकसती ॥३९२॥ सद्‌गुरुराय हा निशाकर। आम्ही शिष्य हे चकोर। चिद्रस सेवोनि परिकर। ब्रह्मा-नन्दें क्रीडतसों ॥३९३॥ जयजय स्वामी श्रीवासुदेवा। त्रैलोक्या-माजीं तुमची प्रतिमा। शोधोनि पाहतां सर्वोत्तमा। न दिसेची कदापि ॥३९४॥ तूं अप्रतिम अगोचर। अक्रिय असंग अनावर। केशव वामन वारंवार। त्या तुजप्रती नमितसे ॥३९५॥" अशा रीतीने ज्याप्रमाणे रंभागर्भ आकाशात विलीन होतो त्याप्रमाणे शिवशक्तिसमावेशपूर्वक श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी नमनरूप सामरस्य घडून यावे व "श्रीगुरुरूपी नारायणा। विश्वंभर दिनो-द्धारणा। आपण आपुली दावूनि खुणा। गुरुशिष्यरूपें क्रीडसी॥" या न्यायाने श्रीस्वामीमहाराजांनी आम्हा सर्वांचा शिष्यरूपाने स्वीकार करून अनुग्रह करावा आणि आम्हा सर्व साधक-भक्तांना आपल्या अप्राकृत गुरुशिष्यक्रीडेत समाविष्ट करून घ्यावे अशी त्यांच्या चरणी शरणगतीपूर्वक अखंड प्रार्थना आहे.

श्रीगुरुचरणरजसेवक
केशव रामचंद्र जोशी

## अनुक्रमणिका

विषय पृष्ठ

## कै. श्री. प्राणुभाई मोहनभाई देसाई



જન્મ: ૧૫-૬-૧૯૨૯ સ્વર્ગવાસ: ૯-૫-૧૯૮૬

સ્વ. પ્રાણુભાઈ દેસાઈના સ્મરણાર્થે
ધર્મપત્ની કાંતાબેન (નીરુબેન) તરફથી

जन्म इ. स. १५-६-१९२९ | स्वर्गवास इ. स. ९-५-१९८६

स्वर्गीय श्रीमान् प्राणुभाई मोहनभाई देसाई यांच्या स्मरणार्थ त्यांच्या धर्मपत्नी श्रीमती कान्ताबेन प्राणुभाई देसाई यांनी हा खंड श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी सप्रेम समर्पण केला आहे.

॥ भगवान् श्रीदत्तात्रेय ॥



निम्नहातीं मालाकमंडलू। मध्यहातीं त्रिशूल–डमरू।
ऊर्ध्वहातीं शंखचक्रू। तो हा महायोगेश्वर श्रीदत्तात्रेय ॥

॥ श्रीदत्तगुरू भगवान्
श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज ॥




श्रीवासुदेवानन्दसरस्वती । भगवान् स्वये श्रीदत्तमूर्ती ॥
समर्थ श्रीसद्गुरु पावनकीर्ती । चक्रवर्ती योग्यांचे ॥

॥ भगवान् श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज ॥



दीक्षा द्यावया साधुजना । उद्धरावया भक्तजना ॥
अवतरे श्रीदत्तमहाराणा । श्रीमन्नृसिंहसरस्वती शंकर ॥

॥ योगिराज सद्गुरु श्रीसन्त वामनरावजी गुळवणीमहाराज ॥



शक्तिपाताचा महामेरू। बहुत जनांसी आधारू।
ब्रह्मस्थितीचा निर्धारू। शाम्भव योगी ॥

जन्म शके–१८०८–इ.स. १८८६ मार्गशीर्ष वद्य १३, श्रीक्षेत्र कुडुत्री
समाधी शके–१८९६–इ. स. १९७४ पौष वद्य ८, श्रीक्षेत्र पुणे

॥ श्रीसद्‌गुरु श्रीसीताराममहाराज टेम्बे ॥



सीतारामो योगिवरो ब्रह्मचारी कवीश्वरः।
गुरुपादार्पिततनुः समदृग्गुरुतांगतः ॥
समाधी – फाल्गुन शु॥ ८ शके १८४० – इ स. १९१८
श्रीक्षेत्र वढणेरी, जि. अमरावती.

॥ श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज ॥



प्रकटोनी या धरेवरती। निजजनोद्धार करती।
शांत दांत मुनिस्वामी। ते हे नृसिंहसरस्वती यती ॥

| जन्म – चैत्र शुद्ध १, | समाधी – आश्विन वद्य ७, |
|---|---|
| शके १७८८ इ. स. १८६६ | शके १८४९ इ. स. १९२७, अयोध्या |

॥ श्रीक्षेत्र गुंज ॥

॥ श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य

श्रीयोगानन्दसरस्वतीस्वामी ऊर्फ श्रीगांडामहाराज ॥



यो वै भूमा तत्सुखं त्वेतिगीतं गेयातीतं ध्यानगम्यं मुनींद्रम् ।
भक्तैकार्यं ह्यात्त मानुष्यमूर्ति योगानन्दं तं यतीन्द्रं नतोऽस्मि ॥

जन्म शके १७९० इ.स. १८६८ मार्गशीर्ष शुद्ध १५, श्रीक्षेत्र तलंगपूर

समाधी शके-१८५० इ.स. १९२८ फाल्गुन वद्य १२, श्रीक्षेत्र गुंज



भगवान् श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील पुरातन वटवृक्षाच्या खाली बांधलेल्या मंदिरातील श्रीपादश्रीवल्लभांचा पुतळा.



भगवान् श्रीपादश्रीवल्लभ



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील पालखीत मिरविताना श्रीपादश्रीवल्लभांची उत्सवमूर्ती.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील पालखीसाठी सज्ज असलेली श्रीपादश्रीवल्लभांची उत्सवमूर्ती.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील
मंदिरातील मुख्यस्थानी
पूजा झाल्यावर बसविलेल्या
श्रीविग्रहाचे एक दर्शन.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील
मंदिरातील मुख्यस्थानी
पूजा झाल्यावर बसविलेल्या
श्रीविग्रहाचे दुसरे दर्शन.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील शिलेवर उमटलेले श्रीपादश्रीवल्लभांचे कोमल चरण.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील पुरातन वटवृक्षाच्या खाली बांधलेल्या छोट्याशा मंदिरात स्थापन केलेल्या श्रीपादश्रीवल्लभांच्या पादुका.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील पुरातन वटवृक्षाचे मूळ स्वरूप. श्रीपादश्रीवल्लभ या वटवृक्षाच्या छायेतच ध्यानाला बसत असत.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील पुरातन वटवृक्षाचे आजचे स्वरूप.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील श्रीपादश्रीवल्लभांच्या साधनगुंफेचे दुसरे स्वरूप.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथील श्रीपादश्रीवल्लभांच्या व श्रीस्वामीमहाराजांनी अनुष्ठान केलेल्या साधनगुंफेचे आजचे तिसरे स्वरूप.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील श्रीकृष्णानदीच्या पलीकडील तीरावरील समतल शिला. त्यावर रोज एकहजार सूर्यनमस्कार घातल्यामुळे उमटलेली श्रीपादश्रीवल्लभांची



श्रीक्षेत्र कुरवपूर येथून जवळ असलेल्या चिक्कूर येथील २५-३० फूट उंचीच्या शिलेवर उमटलेले श्रीपादश्रीवल्लभांचे कोमल चरण.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील श्रीपादश्रीवल्लभांचे मुख्य स्थान.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथील श्रीकृष्णानदीचे विशाल पात्र, पात्रातील अजस्र शिळा व भोपळ्याच्या साहाय्याने नेणारे वाटाडे.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील श्रीकृष्णानदीचे विशाल पात्र बाजेवरून ओलांडून नेणारे वाटाडे.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील श्रीपादश्रीवल्लभांच्या साधनगुंफेचे पहिले मूळ स्वरूप .



भगवान् श्रीपादश्रीवल्लभांनी चोरांना मारून श्रीवल्लभेश भक्ताचे रक्षण केले.



श्रीक्षेत्र कुरवपूर येथील श्रीपादश्रीवल्लभांच्या मुख्य मंदिरासमोरील श्रीकृष्णानदीचे प्रवेशद्वार.

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥

# ❀ श्रीथोरलेस्वामीमहाराज ❀

## श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांचे चरित्र

( उत्तरार्ध–सिद्धखण्ड–क्रमाङ्क ४)

## –खण्ड पाचवा–

## – अध्याय तेविसावा –

### अभंग १

स्मरुं वासुदेवा, श्रीदेवाधिदेवा । पावसोनि धांवा, भजकाचा ॥ १ ॥
ये बा यतिवर्या, रमेच्या तनया । श्रुतिगणगेया, गुरुवर्या ॥ २ ॥
भक्तां अभयकर, सिद्धासनावर । वसे योगिवर, निरन्तर ॥ ३ ॥
पद्मपत्रसमसुंदरनयन । सुस्मितवदन, मनरंजन ॥ ४ ॥
सीताराम भक्ता, भेटे जो स्मरतां । हरोनी दुरिता, भक्तां रक्षी ॥५॥

### अभंग २

तुझा वास जेथें असे निरंतर । यमहि किंकर होई त्याचा ॥१॥
अष्टसिद्धी दासी होवोनी रहाती । योगियांची गती नाहीं जेथें ॥२॥
कामादि षड् वैरी पळोनियां जाती । आशा तृष्णा मरती भिवोनियां
ऐसा हा महिमा सद्गुरुकृपेचा । अनुभव त्याचा सीतारामा ॥४॥

## अभंग ३

तुम्ही सर्वजन शुद्ध मन करा । भवसिंधु तरा लवलाही ॥१॥
ऐसें महापर्व पुन्हा नये हातीं । विचारोनि चित्तीं मार्ग धरा ॥२॥
संसारसागर बहु आहे खोल । बुडोनियां जाल अज्ञोदकीं ॥३॥
कामक्रोधादिक जलचरें खातीं । दारा पुत्र जाती टाकोनीयां ॥४॥
घेउनि ज्ञाननौका आला वासुदेव । तारील हा भव शरणांगता ॥५॥
दास सीताराम नौकारूढ झाला । तरोनियां गेला भवसिंधु ॥६॥

## अभंग ४

शरीर केवळ निरयाची खाणी । बोलताती ज्ञानी हेंची सत्य ॥१॥
पित्याचें हो रेत मातेचा विटाळ । त्याचें होतें फळ तोची देह ॥२॥
मांसाचा हा गोळा गंगेत धूतला । कैसा शुद्ध झाला बाह्यस्नानें ॥३॥
विष्ठा मूत्र रक्त रेत भरिलें आंत । नवद्वारें वहात अहर्निशीं ॥४॥
कामक्रोधलोभ अंतरींचे मळ । कैसे होती दूर तीर्थस्नानें ॥५॥
मुख्य स्नान शमदमादी साधन । तेणें शुद्ध मन होत असे ॥६॥
शुद्ध मन होतां ब्रह्म मिळे हातां । सीतारामभक्ता अनुभव ॥७॥

## अभंग ५

गुरुराया मज द्यावें वरदान । देहाचें हें भान नसो मज ॥१॥
कर्पूर अनळीं उदकीं सैंधव । तैसें मन तत्त्वीं लीन होवो ॥२॥
आत्माकार दृष्टी होवोनी रहावी । बाह्यवृत्ती जावी विरोनीयां ॥३॥
समाधी तो द्यावा निर्विकल्प मज । जगापाशीं काज नाहीं आम्हां ॥४॥
तेव्हां माझा जीव होईल तो सुखी । काळाचिये मुखीं घालूं निंब ॥५॥
सदा घडो संग तुझ्या चरणांचा । निर्धार हा साचा सीताराम ॥६॥

## चातुर्मास एकविसावा–शके १८३३–इ. स. १९११–

## श्रीक्षेत्र कुरवपूर :–

श्रीक्षेत्र कुरवपूर हे स्थान श्रीगुरुचरित्रात वर्णन केल्याप्रमाणे प्रथम श्रीदत्तावतार श्रीपादश्रीवल्लभ यांचे स्थान म्हणून श्रीदत्त-संप्रदायात प्रसिद्ध आहे; परंतु श्रीस्वामीमहाराज येथे येण्यापूर्वी हे स्थान अप्रसिद्धच होते. त्यामुळे श्रीपादश्रीवल्लभांनी श्रीस्वामी-महाराजांना अशी आज्ञा केली की, "आपण या स्थानी येऊन चातु-र्मास करावा म्हणजे पुष्कळ मंडळी येथे येऊन हे दुर्गम स्थान प्रसिद्ध होईल." त्यांच्या आज्ञेप्रमाणे श्रीस्वामीमहाराज शके १८३३ अर्थात् इ. स. १९११ मध्ये येथे येऊन पोहोचले. श्रीपादश्रीवल्लभांच्या आज्ञेप्रमाणे श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र कुरवपूरसारख्या ज्या दुर्गम स्थानी आले ते स्थान कोठे आहे ? कसे आहे ? श्रीपादवल्लभांचे जीवनचरित्र काय आहे ? ते कुरवपूर येथे येऊन का राहिले ? श्रीस्वामीमहाराजांना आज्ञा करून हे स्थान प्रसिद्ध करण्याचा त्यांचा हेतू काय होता ? अर्थात् श्रीदत्तात्रेयांचा प्रथम अवतार श्रीपाद-श्रीवल्लभ, द्वितीय अवतार श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज व तृतीय अवतार योगिराज परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमत् श्रीवासु-देवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज या सर्वांचे अवतार धारण करण्याचे एकच दिव्य प्रयोजन कोणते होते ? व हे सर्व अवतारी महापुरुष एकाच दिव्य अशा प्रयोजनसूत्राने कसे सूत्रबद्ध झाले होते ? हे प्रथम पाहणे क्रमप्राप्त, आवश्यक व अपरिहार्य आहे; कारण त्याशिवाय श्रीस्वामीमहाराजांच्या अवतारकार्याच्या प्रयोजनाचे स्पष्टीकरण शक्य होणार नाही. त्यामुळे विषयान्तर होत असले; तरी वरील प्रश्नांचा उलगडा करणे नितांत आवश्यक आहे. या दृष्टीने प्रथम आपण श्रीक्षेत्र कुरवपूर हे स्थान कोठे आहे व ते कसे आहे ते पाहू.

श्रीक्षेत्र कुरवपूर हे महाक्षेत्र श्रीकृष्णानदी व श्रीभीमानदी यांच्या संगमावर वसलेले आहे. हल्ली हे क्षेत्र कुरुगड्डी या नावाने प्रसिद्ध आहे. हे बेट कूर्माकार असल्याने की काय याला तेलगू भाषेत कूर्मगड्डा असे म्हणतात आणि याचेच कानडी भाषेत कुरुगड्डी असे अपभ्रंशित रूपान्तर झालेले आहे. हे एक प्राचीन श्रीदत्तक्षेत्र असून ते आंध्र राज्यात कृष्णा स्टेशनपासून १८ मैलांवर असून एका बेटावरच वसलेले आहे. हे बेट एक मैल लांब व अर्धा मैल रुंद अशा आकाराचे असून ते श्रीकृष्णानदीच्या प्रवाहात जेथे वसलेले आहे तेथे नदीचे पात्र दोन मैल रुंद आहे. या बेटाच्या एका टोकाला श्रीश्रीपाददत्तमंदिर असून दुसऱ्या टोकाला गाव आहे व मध्ये शेते आहेत. येथील मंदिरात भगवान् श्रीदत्तात्रेयांच्या पादुका आहेत.

या बेटाभोवतीच्या चारही बाजूला पसरलेल्या श्रीकृष्णानदीच्या विशाल पात्रात हत्तीएवढ्या मोठमोठ्या अजस्र शिला पसरलेल्या असल्यामुळे येथे नावा सहसा चालू शकत नाहीत. त्यामुळे या ठिकाणी पावसाळ्यात बहुशः कोणी जाऊ शकत नाही. श्रीकृष्णा-माई पार करून कुरवपूरला जाताना वाटाड्या घेणे फार आवश्यक असते. कोरड्या दिवसात तेथील वाटाडे पाण्याचे खोल डोह आणि अजस्र शिलांना वळसे देत प्रवाशांना सुखरूपपणे बेटावर आणून सोडतात. मात्र पावसाळ्यात तुडुंब भरलेल्या पात्रातून भोपळे किंवा बाज यांच्या साहाय्याने वाटाडे प्रवाशांना बेटावर सुखरूप पोहचवितात.

या ठिकाणी श्रीकृष्णानदीत मोठमोठाले व अणकुचीदार दगड असल्याने नदीस उतार असला तरी वाटाड्यांच्या मदतीशिवाय सुरक्षितपणे मंदिर गाठणे हे महाकर्म कठिण होते. अशावेळी अंगा-वरचे सर्व कपडे डोक्याला गुंडाळून व सामान वाटाड्यांकडे देऊन

त्यांचा हात धरूनच जावे लागते. अशी पावसाळ्यात किंवा हिवाळ्यात अडचण असते. मात्र उन्हाळ्यात येथे गेल्यास हा सर्व भाग शिलामय असल्याने तो तापून सतत उन्हाच्या वाफा निघत असतात व या ऋतूत येथे येणाऱ्यास पंचाग्नीसाधनाचे तप अनुभवावे लागते ! त्यामुळे उन्हाळ्यात येथे येणे म्हणजे अग्निदिव्यच करणे होय. ज्याचे पूर्वसुकृत बळकट असते त्यालाच ही यात्रा घडते हेच खरे ! त्यामुळे येथे येणारे यात्रेकरू फारच कमी असतात. असे असले; तरी हे स्थान मात्र अत्यन्त जागृत असे आहे, यांत काहीच शंका नाही.

स्वातंत्र्यपूर्वोत्तर काळात रायचूर जिल्हा निजाम राज्यात होता. त्यावेळी राजभाषा उर्दू असल्याने सरकारी कागदपत्रात या बेटाचा ' कुर्वाकला " या नावाने उल्लेख आला आहे. या ठिकाणी श्रीकृष्णानदी पश्चिमेकडून पूर्वेकडे वाहते आणि हे बेटही श्रीकृष्णेच्या पात्रात पूर्व–पश्चिम लांबीने पसरलेले आहे. येथे श्रीकृष्णानदी ही आंध्र आणि कर्नाटकची सीमा झालेली असून तिच्या उत्तरेस आंध्र व दक्षिणेस कर्नाटक राज्य आहे. राजकीय दृष्टचा श्रीक्षेत्र कुरवपूर कर्नाटक राज्याच्या रायचूर जिल्ह्यात पडते. यामुळे येथे कानडी व तेलगू या दोन्ही भाषा चालतात.

श्रीक्षेत्र कुरवपूर हे श्रीकृष्णामाईचे नाभिस्थान असल्याचा उल्लेख श्रीस्वामीमहाराजांनी " श्रीकृष्णालहरी " या आपल्या काव्यात करताना असे म्हटले आहे की–

मुखं ते सह्याधः सदयहृदयं ते नरहरेः ।
पुरेऽप्यान्ध्रे नाभिः प्रपदयुगलं प्राच्यविषये ।
अये कृष्णे तेऽदः प्रथितमिह रूपं मुनिमते ।
नमः श्रीकृष्णे ते जय शमिततृष्णे गुरुमते ॥ १७ ॥

अर्थ :– हे श्रीकृष्णे ! सह्य पर्वताच्या अध:प्रदेशी "वाई" नामक क्षेत्रात जे उगमस्थान आहे ते तुझे मुख आहे. पुष्कळ ब्राह्मणांची वस्ती असल्यामुळे ते मुख होय. श्रीक्षेत्र नरसिंहवाडीमध्ये श्रीदत्ताच्या मनोहरपादुकारूपी तुझे सदय हृदय आहे. त्यामुळे तेथे तुझी सेवा करणारा ऐहिक व पारमार्थिक अशी दोन्ही सुखे मिळवितो. हे माते ! आन्ध्र देशात "कुरुगड्डी" नावाच्या क्षेत्रात तुझे नाभिस्थान म्हणजे मध्यदेश आहे आणि ज्यावेळी पूर्वदेशी तू पूर्वसमुद्राला मिळते त्यावेळी दोन प्रवाह होऊन मिळाल्यामुळे ते दोन प्रवाहरूपी तुझे चरण तेथे आहेत. असे तुझे स्वरूप या लोकी प्रसिद्ध आहे. ते नेहमी माझ्या अंत:करणात स्थिर राहो ! हे कृष्णे ! तुला माझा नमस्कार असो. हे दत्तात्रेयमान्ये ! भक्ततृष्णा दूर करणाऱ्या तुझा जयजयकार असो.

श्रीश्रीपादश्रीवल्लभदत्तमंदिर हे बेटाच्या पश्चिम टोकाला असून त्या भागाला "अग्रहार" असे म्हटले जाते. पूर्वी हिंदू राजेराजवाड्यांच्या काळी वेदाध्ययन करणाऱ्या व वैदिक पाठशाळा चालविणाऱ्या ब्राह्मणांना दिलेली भूमी "अग्रहार" म्हणून ओळखली जात असे. आजही श्रीपादश्रीवल्लभमंदिराच्या भागाची सरकारी दप्तरात "अग्रहारगाव" म्हणूनच नोंद आहे. त्या काळची ती महाविद्यालयेच होती. अग्रहाराचा उल्लेख काही ठिकाणी ब्रह्मपुरी किंवा ब्रह्मपूर असाही केला जातो. पूर्वीच्या काळी भारतात अशी अग्रहार विद्याकेन्द्रे सगळीकडे पसरलेली होती.

श्रीक्षेत्र कुरवपूर बेटाच्या साधारणपणे मध्यावरच्या भागात इतर समाजाची लहानशी वस्ती आहे. येथील एकूण लोकसंख्या सुमारे तीनशे आहे. येथे श्रीपादश्रीवल्लभांच्या पूजेअर्चेसाठी ब्राह्मणाचे एकच घर असून तेथे सध्या कै. श्री. केशवभटजी पुजारी यांची दोन मुले देवळाच्या परिसराच्या ओवऱ्यांमध्येच राहून श्रींची पूजा-अर्चा

उत्सवादि सर्व नित्यनैमित्तिक सेवा श्रीस्वामीमहाराजांनी घालून दिलेल्या नियमाप्रमाणे करीत असतात. त्याचप्रमाणे येथील पुजारी बन्धुद्वय येथे आलेल्या भक्तयात्रेकरूंची राहण्याची सर्व मनपसंत व्यवस्था व पूजा, रुद्राभिषेक, पालखीसेवा, भोजनादि सर्व गोष्टी अत्यन्त आस्थेवाईकपणे करीत असतात. या दोघांना मराठी लिहिता, वाचता व बोलता येत असल्यामुळे हे क्षेत्र मराठी प्रदेशापासून खूप दूर असले; तरी येथे आल्यावर मराठी भाषिकांना काही अडचण पडत नाही. येथील देवस्थानचे सर्व व्यवहार मराठीतूनच चालतात. ज्यांना येथे जाऊन साधना कराण्याची इच्छा आहे त्यांनी श्री. श्रीपादभटजी पुजारी, मु. पो. श्रीक्षेत्र कुरवपूर, पोष्ट–अतकूर, मार्गे देवसुगूर, जिल्हा रायचूर, कर्नाटक राज्य, पिन कोड ५८४२०१ या पत्त्यावर पत्र व्यवहार करावा.

श्रीक्षेत्र कुरवपूर ही श्रीगुरुचरित्रात वर्णन केलेल्या श्रीदत्तात्रे-यांच्या प्रथम अवतारातील श्रीगुरूंची अर्थात् श्रीपादश्रीवल्लभांची अत्यन्त एकान्तातील गूढ व नितान्तरमणीय अशी तपोभूमी आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीमद् भगवद्गीतेच्या "शुचौ देशे प्रति-ष्ठाप्य ॥ ६.११ ॥" या श्लोकार्धाचा भावार्थ स्पष्ट करताना ज्या पवित्र स्थानी राहून साधकाने साधन करावे असे वर्णन केले आहे, ते श्रीक्षेत्र कुरवपूरला तंतोतंत लागू पडते. ते वाचताना श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी जणू काही श्रीक्षेत्र कुरवपूरचेच वर्णन केले आहे असे वाटते. ते असे म्हणतात की –

(श्रीकृष्णनाथमहाराजरूपी श्रीसद्गुरू श्रीअर्जुनरूपी शिष्याला असे सांगतात की – ) "आता आम्ही तुला शक्तिपातयोगमार्गाचे अर्थात् सिद्धयोगमार्गाचे साधन सांगतो. माझ्या उपदेशानुसार अनुभव येण्याकरिता या योगाभ्यासाच्या साधनासाठी पुढीलप्रमाणे

योग्य स्थान पाहून तेथे साधन करणे जरूर आहे. या योगाभ्यासाकरिता अशी जागा असावी की, ज्या जागेवर बसल्यावर तेथून उठूच नये असे वाटते आणि ही जागा पाहताक्षणीच वैराग्य दुप्पट वाढते. ही जागा पूर्वी सत्पुरुषांनी वास्तव्य केलेली असावी व तिच्यापासून मनाच्या संतोषाला साहाय्य व्हावे आणि मनाला धैर्याचा उल्हास प्राप्त व्हावा. अशा जागेत गेल्यावर अभ्यासच आपल्याला साधकाकडून करवितो म्हणजे श्रीसद्‌गुरुकृपेने जागृत झालेली अनादि निद्रिस्त आत्मशक्ती कुंडलीनीच आपण स्वतःच नाना तऱ्हेच्या योगांतर्गत क्रिया साधकाच्या शरीरात उपस्थित करून शेवटी आपणच साधकाच्या अंतःकरणाला माळ घालते म्हणजे ती प्राणरूप व जीवरूप असलेली शक्ती स्वतःच शिवस्वरूप होते. अशा प्रकारे आपोआप साधन होऊन साध्य प्राप्त करणारी अशी रम्यपणाची अखंड योग्यता असलेले असे साधनाचे स्थान असावे. हे पार्था! ही जागा अशी असते की, त्या जागेच्या नुसते जवळून गेले; तरी तेथे बसून तपश्चर्या करावी असे वाटते आणि या जागेमुळे पाखंड्यांच्याही मनात मनापासून संपूर्णपणे आस्तिक्य उत्पन्न होते. जर एखादा विषयासक्त व कामुक मनुष्य सहज वाटेने जात असता अकस्मातपणे व अवचितपणे त्या स्थानी आला तर तोही ती जागा सोडून परत माघारी जाण्याचे विसरतो. अशा रीतीने ज्याला त्या ठिकाणी राहण्याची इच्छा नाही त्यालाही ती जागा आपल्या येथे राहवून घेते, जो भटकणारा आहे त्याला एके ठिकाणी बसविते व ती वैराग्यास थापटून अर्थात् हलवून जागृत करते. असे अपूर्व स्थान पाहिल्यावर एखादा राजा किंवा विलासी पुरुष जरी असला तरी त्यालाही ते स्थान पाहताक्षणीच असे वाटते की, आपले राज्य सोडून देऊन या ठिकाणी एकांतवासातच निवान्त राहावे. अशा

प्रकारे जे स्थान इतके सुंदर आणि अतिशय शुद्ध व स्वच्छ असते, त्या ठिकाणी जाऊन साधकाने तपश्चर्या केल्यास ब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो. अशा प्रकारच्या स्थानाच्या बाबतीत साधकाने आणखी एका गोष्टीचा असा विचार करावा की, त्या ठिकाणी काही साधकांची वस्ती असावी. मात्र ते स्थान इतर असाधक अशा सामान्य लोकांच्या वर्दळीने रुळलेले नसावे. त्याचप्रमाणे त्या ठिकाणी मुळापासून अमृतासारखी गोड असलेली आणि नेहमी फळांनी भरलेली अशी दाट झाडे असावीत. तेथे निर्मळ पाण्याचे व ज्यांचे पाणी काढून घेणे सोपे असते असे पावसाळ्याविनाही वाहणारे पाण्याचे झरे पावलोपावली असावेत. या जागी सूर्याचे ऊनही सौम्य असावे आणि वारा अत्यन्त शीतल, शांत व मंद झुळकांनी युक्त असा वाहत असावा. तेथे बहुतकरून माणसांची गडबड नसावी व श्वापदांची गर्दी नसावी. त्याचप्रमाणे राघू आणि भ्रमर हे ही फारसे नसावेत. मात्र तेथे हंस, दोनचार सारस पक्षी आणि एखाद्या वेळी कोकिळ पक्षी येऊन बसला तरी चालेल. या जागी सतत नसले तरी मोरही केव्हातरी येण्यास हरकत नाही. हे अर्जुना ! साधकाने आपल्या साधनाकरिता अवश्यमेव अशा तऱ्हेचे निसर्गसुंदर स्थान शोधून ठेवावे. या ठिकाणी सहज दिसणार नाही अशा बाजूला एखादा निगूढ मठ किंवा शिवालय असावे. अशा ठिकाणी साधन करून जीवन कृतार्थ करावे." एवंच उपरोक्त वर्णनाप्रमाणे साधनेच्या दृष्टीने श्रीक्षेत्र कुरवपूर हे स्थान फारच रम्य आहे.

अशा या परमपावन व सिद्ध अशा पुण्यभूमीत श्रीपादश्रीवल्लभ आपल्या अवतारकार्याच्या शेवटच्या काळात येथे आले व या ठिकाणीच त्यांनी तिरोहित होऊन अवतारकार्याची समाप्ती केली.

या दृष्टीने पाहिले; तर श्रीपादश्रीवल्लभांच्या पदस्पर्शाने श्रीक्षेत्र करवपूरचा परिसर भारलेला आहे, याची पावलोपावली प्रचीती येते. बहिर्मुख माणसेही येथे अंतर्मुख होतात. त्यांच्या मनोभूमीत वैराग्याचे बीज पेरले जाते आणि ते परमार्थाचे पथिक बनतात. या ठिकाणी साधकाने स्वल्पकाळ वास्तव्य करून साधन केले; तरी तेही त्याला हळूहळू अग्रेसर करते. या ठिकाणी एकदा येऊन गेलेल्या साधकाला येथे पुन:पुन्हा येऊन साधन करण्याचा मोह होतो, यात काहीच शंका नाही. श्रीपादश्रीवल्लभस्वरूप भगवान् श्रीदत्तात्रेय साधकाला येथे कोणत्या स्वरूपात भेटतील व त्याला कृतार्थ करतील हे तें स्वत:च जाणतात. यासाठी या आदर्श तपोभूमीत जाऊन ज्याचा त्यानेच अनुभव घेणे हेच श्रेयस्कर होय; कारण श्रीगुरू श्रीपाद-श्रीवल्लभ साधकांना येथे भेटतात व तरीही नामानिराळे राहतात. जे साधकभक्तजन वरच्या पातळीवर गेलेले असतात तेच फक्त त्यांना ओळखू शकतात व त्यांच्या भेटीच्या सुखद स्मृतीचा जीवनभर अननुभूत असा सुखानुभव घेत राहतात. खरोखर, कमीत कमी गरजा ठेवून स्वावलंबी जीवन जगणाऱ्या साधकांना साधनेच्या दृष्टीने हे स्थळ अत्यंत उत्कृष्ट आहे. आपल्या वासनेतून, मायेतून, दुष्ट संस्कारातून व अखेरीस जन्ममरणपरंपरेतून सुटून मुक्त होऊन आपणांस स्वातंत्र्याची प्राप्ती व्हावी असे ज्यांना वाटत असेल त्यांच्यासाठी ही पुण्यभूमी कल्पवृक्षाप्रमाणे फलदायी होते, यात काहीच शंका नाही.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे श्रीपादश्रीवल्लभांच्या पदस्पर्शाने पुनीत झालेली श्रीकृष्णामाई ज्याप्रमाणे त्यांची कीर्ती अखंड गात वाहते त्याप्रमाणेच साधन – गुंफा, श्रींचा बसावयाचा पुरातन वटवृक्ष, श्रींच्या सूर्यनमस्कार घालण्याने शरीराची संपूर्ण छाया उमटलेली

शिला, श्रींच्या पादुकांची शिला, जुनी गुंफा, श्रीवल्लभेशांचे स्थान इत्यादि पवित्रस्थळेही श्रीपादश्रीवल्लभांची पवित्र स्मृती सतत जागृत करून देऊन साधकाच्या अंतःकरणात भक्तिप्रेमाची गंगा उद्भूत करून प्रवाहित करीत राहतात.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे व आसपासच्या परिसरात श्रीपादश्रीवल्लभांच्या पदस्पर्शाने पुनीत झालेल्या व त्यांच्या हृद्य आठवणी सांगणाऱ्या ज्या बऱ्याच गोष्टी आहेत त्यातील पहिली वस्तू आणि वास्तू म्हणजे येथील साधन गुंफा होय. या ठिकाणी श्रीपादश्रीवल्लभ श्रीदत्तात्रेय हे नित्य अनुष्ठानाला बसत असत. आजही त्याचा अनुभव भक्तांना व साधकजनांना आल्याशिवाय राहात नाही. त्याचप्रमाणे त्या गुंफेत श्रीस्वामीमहाराजही इ. स. १९११ च्या चातुर्मासाच्या काळात अनुष्ठानास बसत असत.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथील दुसरी पवित्र वस्तू म्हणजे येथील पुरातन वटवृक्ष होय. हा वटवृक्ष किती पुराणकालीन आहे हे त्याचे तोच जाणे; कारण वटवृक्षाचे वय कित्येक हजार वर्षे असू शकते. भगवान् श्रीपादश्रीवल्लभ या वटवृक्षाच्या छायेत नेहमी बसत असल्यामुळे याचे माहात्म्य अधिक आहे. चराचर जगताचे आश्रयस्थान असलेल्या व सर्वांवर कृपाछत्र धारण करणाऱ्या श्रीपादश्रीवल्लभ श्रीदत्तात्रेयांवर आपल्या छायेचे छत्र धरणारा हा वटवृक्ष अत्यंत भाग्यवान् आहे हेच खरे. आजही श्रीगुरू अदृश्य रूपाने त्याच्या सावलीत बसून कुरवपूरला येणाऱ्या साधकभक्तांवर आपली प्रेमळकृपादृष्टी टाकून त्यांचे जीवन धन्य व कृतार्थ करतात यात काहीच शंका नाही.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथील तिसरी वस्तू श्रीकृष्णामाईच्यां पलीकडील तीरावर असलेली एक समतल शिला ही आहे. श्रीपादश्रीवल्लभांच्या वास्तव्यकाळी कुरवपूरची भूमी तेथपर्यंन्त असावी.

मात्र पुढे श्रीकृष्णामाई हळूहळू सरकत सरकत अलीकडे आली असावी. त्यामुळे सध्या ती शिला पलीकडच्या तीरावरील झाली असावी. श्रीपादश्रीवल्लभ नित्य या समतल शिलेवर एक हजार सूर्यनमस्कार घालीत असत. या शिलेला सूर्यनमस्काराची शिला असे म्हणतात. श्रीपादश्रीवल्लभांच्या अष्टांग स्पर्शाने या खडकाचा कण न् कण उद्धरला आहे; कारण या खडकावर सूर्य नमस्कार घालीत असल्यासारखा त्यांच्या संपूर्ण शरीराचा ठसा व चरणांचे ठसेही उमटलेले स्पष्टपणे दृष्टीस पडतात. श्रीक्षेत्र कुरवपूर येथे आल्यावर कोणाही श्रीगुरुभक्तास या शिलेवरील श्रींच्या ठशाचे दर्शन घेतल्या-शिवाय राहवत नाही.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथील पवित्र व दर्शनीय अशी चवथी वस्तू म्हणजे श्रीपादश्रीवल्लभांच्या कोमल पावलांचा ठसा उमटलेली चिक्कूर येथील २५–३० फूट उंचीची शिला ही आहे. तिच्या माथ्या-वर श्रीगुरूंची कोमल पावले आपला ठसा उमटवून गेली आहेत. स्त्रियांना किंवा वयोवृद्ध भक्तांना त्या शिलेवर चढून त्यावरील हरिपदाचे दर्शन प्राप्त करणे जवळजवळ अशक्यच आहे; कारण त्या शिलेवर चढणे वाटते तितके सहज सोपे नाही. ज्यावेळी श्रीपाद-श्रीवल्लभ या परिसरात आले त्यावेळी त्यांनी या प्रचंड शिलेवर चढून आजूबाजूचा प्रदेश न्याहाळला व वास्तव्यासाठी सुयोग्य जागा कोठे आहे ते पाहिले व कुरवपूर हे बेट पसंत केले. त्यावेळी त्या शिलेने आपल्या शिरकमली ते कैवल्यपद धारण केले व आजही ती ते माथ्यावर घेऊन मोठ्या डौलाने मिरवीत आहे.

या भाग्यशाली शिलेच्याच पलीकडे फर्लांग दीड फर्लांग अंतरा-वर दहा पंधरा फूट उंचीची एक छोटीशी टेकडीवजा जागा आहे. तेथील अवशेष पाहिले म्हणजे तेथे पूर्वी काही वास्तू किंवा घरे

वगैरे असल्याची साक्ष पटते. मात्र आज ते स्थळ वैराण झाले आहे या उंचवटयाच्या एका बाजूस एक फार जुनी गुंफा आहे. तेथील ध्यान, धारणा व अनुष्ठान यासाठी खास तयार करून घेतलेले आसन, गुंफच्या दरवाजाची चौकट, बाहेर पाणी साठविण्यासाठी केलेले दगडी टाके इत्यादि गोष्टी पाहून येथे श्रीपादश्रीवल्लभांनी काही काळ वास्तव्य तर केले नसेल ना असे वाटल्यावाचून राहात नाही.

श्रीकृष्णानदीच्या पलीकडे उत्तर-ईशान्य दिशेच्या दरम्यान मंथनगुड नावाचे एक गाव आहे. या गावाच्या अलीकडे सहा-सात फर्लांगावर भगवान् श्रीपादश्रीवल्लभांचे मंदिर आहे. हे मंदिर प्रचंड उंच अशा शिलांनी वेढलेले असून त्यातील वीस पंचवीस फूट उंचीच्या नागाच्या फणेप्रमाणी जणू काही आकार असलेल्या एका चपटचा शिलेच्या आधाराने ते उभे आहे. ती शिला म्हणजे जणू शेषनागाने श्रीविष्णूंवर धरलेली प्रचंड फणाच असावी असे भासते. गर्भगृहात त्या शिलेवर चंद्र, सूर्य व त्रिशूल यांची चिन्हे उमटलेली आहेत. गर्भ-मंदिराच्या चौकटीवरील कोरीव काम नजरेत भरण्यासारखे आहे हे मंदिर व त्याचा परिसर अत्यन्त गूढ, निरव व प्रसन्न आहे. साधकाचे मन येथे सहजच अंतर्मुख होते.

सारांश "कुरवपूर महा गहन। कुरुक्षेत्र तेची जाण ।। १८.१३ ।।" असे श्रीसरस्वती गंगाधरांनी श्रीमद्‌गुरुचरित्र ग्रंथात जे साररूपाने वर्णन केले आहे ते स्थूल, सूक्ष्म व परार्थरूपाने या क्षेत्राला संपूर्णांशाने लागू पडते यात तिलःप्राय शंका नाही. श्रीक्षेत्र कुरवपूर हे कुरुक्षेत्र आहे याचा स्थूलार्थ असा आहे की, ते यात्रेचे एक पवित्र असे स्थान असून अशा पवित्र तीर्थक्षेत्रांची यात्रा करून पापक्षय करावा असा उपदेश श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांनी आपल्या शिष्यांना

केला होता. हा स्थूलार्थ अधिक स्पष्ट करताना "द्विसाहस्री" गुरुचरित्रात व त्यावरील स्वकृत टीकेत श्रीस्वामीमहाराजांनी असे म्हटले आहे की–

उत्तमा सहजा पूजा मध्यमा योगधारणा ।
अधमा प्रतिमापूजा तीर्थयात्रा धमाधमा ।।

याचा अर्थ असा आहे की, "सहजपूजा ही उत्तम पूजा असून योगधारणेस मध्यमपूजा असे म्हणतात. प्रतिमापूजन हे अधम समजतात आणि तीर्थयात्रा ही अधमाधम पूजा होय, असे शास्त्रकारांनी स्पष्ट केले आहे." यावर टीका करताना श्रीस्वामीमहाराज असे म्हणतात की, "मग तीर्थयात्रेचा आग्रह श्रीमन्नृसिंहसरस्वतीगुरुमहाराजांनी का केला ? अशी एक शंका येथे येते. त्याचे थोडक्यात उत्तर असे आहे की, "ज्याप्रमाणे निर्मल आरशात स्वच्छ प्रतिबिम्ब दिसते त्याचप्रमाणे योग, यज्ञ, जप, अनुष्ठान व कर्म यांनी अभ्यासू मुमुक्षूंना मोक्ष मिळतो. मात्र इतर लोक यांपैकी काहीही करीत नसल्यामुळे त्यांना असा मोक्ष मिळत नाही. याकरिता सामान्यजनांचे पापक्षय करणारे मुख्यसाधन तीर्थयात्रा हेच आहे. त्यामुळे श्रीमन्नृसिंहसरस्वतीगुरुदेवांनी तीर्थयात्रोपदेश केला आहे. "आपमापामपः आपोभ्द्यान्विदमापः ।" या श्रुतीने कर्माप्रमाणेच तीर्थयात्रेनेही दुरितक्षय होतो, असे स्पष्ट म्हटलेले आहे. श्रीगंगा, श्रीगोदावरी, श्रीकृष्णा इत्यादि नद्यांचे सेवन ऋषींनी केलेले आहे. त्यामुळे त्यांच्या जलांना शास्त्रकारांनी तीर्थ हे नामाभिधान ठेवले. विवेकी व अभ्यासू साधकांच्या दृष्टीने विचार केल्यास तीर्थयात्रेस महत्त्वाचे स्थान जरी नसले; तरी सुद्धा दुरिताचा समूळ नाश करणाऱ्या तीर्थयात्रेची सेवा करणे हा मोक्षमार्गांपैकीच एक अत्यन्त सुलभमार्ग सामान्यांकरिता वेदांनी सांगितलेला आहे याबद्दल शंका घेण्याचे काहीच कारण नाही.

याकरिताच योगवासिष्ठामध्ये भौमयज्ञाच्या अंगीकाराविषयी श्रीवसिष्ठमहाऋषींनी श्रीरामचंद्रांच्या तीर्थयात्रेचेच वर्णन मोठ्या विस्तृतपणे सांगितलेले आहे. याचा सांगोपांग विचार वेळीच साधक-भक्तांनी करावयाचा आहे."

श्रीक्षेत्र कुरवपूर म्हणजे कुरुक्षेत्र आहे. याचा सूक्ष्मार्थ असा आहे की, हे कर्माचे, तपस्येचे, उपासनेचे व साधनाचे क्षेत्र असून त्याची या दृष्टीने महती काय आहे, हे आपण पूर्वी पाहिलेच आहे.

श्रीक्षेत्र कुरवपूर म्हणजे कुरुक्षेत्र आहे. याचा परार्थ पाहताना श्रीमद्‍भगवद्‍गीतेतील पहिल्या श्लोकामध्ये आलेल्या "धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे" या दोन शब्दांचा अर्थ श्रीश्रीधरस्वामींनी आपल्या टीकेत कसा स्पष्ट केला आहे व योगिराज श्रीश्यामाचरण लाहिडी महाशयांच्या "आध्यात्मिक-दीपिकेत" त्याचा परार्थ कसा कथन केला आहे, हे पाहणे मोठे उद्‍बोधक ठरेल.

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समावेता युयुत्सवः ।
मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १.१ ॥

या श्लोकाचा अर्थ स्पष्ट करताना श्रीश्रीधरस्वामी आपल्या टीकेत असे म्हणतात की, "हे संजया ! धर्मभूमी (रूप) कुरुक्षेत्रात (धर्मक्षेत्र हे कुरुक्षेत्राचे विशेषण आहे. त्यांचे कुरु नावाचे कोणी आदिपुरुष होते, त्या कुरूच्या धर्मस्थानात) एकत्रित झालेल्या व युद्धाची इच्छा करणाऱ्या माझ्या आणि पाण्डूच्या पुत्रांनी काय केले ? "

यावर परार्थरूप "आध्यात्मिक व्याख्या" करताना योगिराज श्रीश्यामाचरण लाहिडी महाशय आपल्या आध्यात्मिक-दीपिकेत असे म्हणतात की, "धर्मक्षेत्रे–धर्म म्हणजे प्राणिमात्रांबद्दल दया होय. यामुळे जीवाचे रक्षण होते. या प्रकारच्या कर्म व अकर्माला कर्म असे

म्हणतात. याचे प्रमाण श्रीमद्भवगद्गीतेत असे दिले आहे की, " कर्मण्यकर्म यः पश्येदकर्माणि च कर्म यः। स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ ४.१८॥ अर्थात् जे कर्मफलाकांक्षारहित आहेत आणि जे गुरुकृपाद्वारा प्राप्तपुरुष झाले आहेत त्यांच्यामुळे आयुष्यवृद्धी होते आणि शरीराचे रक्षणही होते. याचेच नाव दया असे आहे. प्रथम आपल्या शरीराचे रक्षण केल्यानन्तर मग दुसऱ्याच्या शरीराचे रक्षण करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. असे हे धर्मक्षेत्र आहे. क्षेत्र म्हणजे शरीर होय. त्याचे प्रमाण श्रीमद्भगवद्गीतेत आहे ते असे. " इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ॥ १३.१ ॥ " अर्थात् शरीर म्हणजे क्रिया करण्याचे स्थान. या शरीरात परमात्मा हा जीवात्मरूपाने विद्यमान असतो. दुसरीकडे शरीरात पंचतत्त्व अर्थात् पंच पांडव आहेत युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल व सहदेव म्हणजे आकाश, वायू ( तेज ), अग्नी ( आप ), जल आणि पृथ्वी होत. युधिष्ठिर आकाशस्वरूप आहे. त्यामुळे व्योम म्हणजे आकाश हे परव्योमात म्हणजे पराकाशात मिळून गेले म्हणजे तो सशरीर स्वर्गात गेला. भीम वायुस्वरूप आहे. याचे प्रमाण महाभारतात आहे. " खचरस्य सुतस्य सुतः खचरः, . . . . खचरी परिरोदिति हा खचर । " अर्जुन हा इंद्राचा मुलगा आहे. इ (शक्ती), न्द्र (वन्ही). त्याची शक्ती अग्नीप्रमाणे आहे. या कारणामुळेच वज्राला इन्द्राचे आयुध म्हणतात. नकुल = न + कुल म्हणजे ज्याचे कुल नाहीं असा अर्थात् ज्याचा किनारा सापडत नाही असे जल. सहदेव हा पृथ्वीचा अर्थात् मृत्तिकेचा पुत्र आहे. यामुळेच तो वैद्यकशास्त्रात प्रवीण होता, असे महाभारतात लिहिले आहे.

कुरुक्षेत्रे–क्षेत्रे म्हणजे या शरीरात. पंच ज्ञानेंद्रिये आणि पंच कर्मेंदिये मिळून दहा इंद्रिये दहाही दिशांना धावत असतात. हीच

सर्व इंद्रिये मनरूपाने धृतराष्ट्राचे शंभर पुत्रच आहेत. त्यांची नावे आदिपर्वात विस्तारपूर्वक लिहिली आहेत. या नावांचे रूपक, अर्थ आणि तदनुसार होणारी व कुप्रवृत्तीचे अनुसरण करणारी सर्व कर्मे उपक्रमणिकेत वर्णिली आहेत. बेंबीपासून खाली मूलाधारापर्यन्त अधोगमन किंवा पारतंत्र्यमूलक कुरु आहे अर्थात् ( येथे जीवरूपाने असलेले प्राण ) फलाकांक्षेच्या रूपाने माणसाला कर्म करण्यास उद्युक्त करतात. यालाच कुरुक्षेत्र असे म्हणतात.

अशा प्रकारे धर्मक्षेत्रातील पाच तत्त्वे व कुरुक्षेत्रातील इंद्रिये दोन दलांच्या रूपाने युद्ध करण्याची इच्छा करतात. "अहं" या आकाराने युक्त असलेल्या मनाचा हा प्रश्न आहे की, वाईट दिशेने आमचे दल पाण्डव पंचतत्त्वांच्या बरोबर काय करीत आहे ? संजय शब्दाचा अर्थ दिव्यदृष्टी असा आहे अर्थात् ब्रह्मात ध्यानरत झाल्यावर कोणता व कसा अनुभव येतो हे जाणण्याची मन इच्छा करते. दिव्य दृष्टीच्या द्वारा जो प्रकाश उत्पन्न होतो तो स्थिर होऊन विचारतो की, " धर्म म्हणजे काय ? " सर्व भूतमात्रांवर दया करणे हाच धर्म आहे. याचा अर्थ असा आहे की, सर्व जीवांचे रक्षण होईल असे कर्म करणे होय. यालाच अकर्म असे म्हणतात. अर्थात् जे कर्म केले असता कर्मफल मिळत नाही व कर्मबन्धन होत नाही, तेच यथार्थ कर्म होय. खरे पाहता फलाकांक्षारहित कर्मही तेच आहे. असे कर्म श्रीसद्‌गुरूंजवळ राहून शिकावे लागते. आपली सर्व इंद्रिये कोणता ना कोणता हेतू मनात बाळगून कर्म करण्यासाठी प्रवृत्त होतात; परन्तु निरन्तर होणारे प्राणाचे श्वासोच्छ्वासरूपी कर्म कोणतीही कामना किंवा संकल्पाच्या उद्देशाने होत नाही. हे प्राणकर्म फलकामनारहित असल्यामुळे जो साधक श्रीसद्‌गुरूंच्या उपदेशानुसार मनाला प्राणाशी समरस

करण्याचा प्रयत्न करील, त्याचे मनही शेवटी प्राणाप्रमाणेच फला-कांक्षाशून्य होईल. प्राणकर्माच्या विषयांसंबंधी उपदेश देणे हीच वास्तविक जीवदया आहे. अन्नादिकादि दान करणे ही दया आहे, हे निश्चितच सत्य आहे; परन्तु अशा प्रकारच्या कोणत्याही स्थूल दयेने दुःख कायमचे दूर होत नाही. भुकेलेल्या माणसाला अन्नदान केल्याने काही काळपर्यन्त त्याची भूक निश्चितच दूर होते; परन्तु काही वेळानन्तर त्याला पुन्हा भूक लागते आणि तो पुन्हा दुःखी होतो. याकरिता शक्तिपाताने अर्थात् कृपेने ज्ञानदान करणे हीच खरी दया आहे. या दयेमुळे जीवाची कामक्षुधा अर्थात् सर्व प्रकारच्या इच्छांची भूक कायमची नष्ट होते. वासनेची भूक हाच जीवाचा खरा भवरोग आहे आणि ज्ञान हेच त्या रोगाचे श्रेष्ठ औषध आहे. मन आणि बुद्धी निश्चल केली की, हे ज्ञान आविर्भूत होते. माणसाच्या मनात वासनांचे वेग निरन्तरपणे उठत राहून ते त्याला नेहमी जीर्णशीर्ण करीत राहतात. जर मनाचा हा रोग नष्ट झाला नाही तर त्याला कधीही शांती मिळू शकत नाही. आता हे पाहिले पाहिजे की, मन कसे शांत होते ?

योगशास्त्रात असे लिहिले आहे की, "चलेवाते चलच्चित्तम्।" याचा अर्थ असा आहे की, प्राणवायू चंचल झाला की, माणसाचे चित्तही चंचल होते. याकरिता साधनाच्या द्वारा प्राण स्थिर केल्यावर मनाची आणि बुद्धीची चंचलता कायमची नाहीशी होते. परन्तु प्राणाची साधना करण्याकरिता शरीर असणे ही अत्यन्त आवश्यक गोष्ट आहे; कारण त्यामुळेच यथार्थ धर्मपालनाची क्षमता प्राप्त होते. भगवन्ताने मानवाच्या शरीराची रचना मोठ्या अपूर्व कौशल्याने केली आहे. या शरीरातच नित्य शुद्ध परमात्मा राहात असतो आणि त्याला जाणल्यामुळेच जीव कृतार्थ होतो. त्या परमा-

त्म्याला जाणण्याची व्यवस्थाही त्याने या शरीरातच करून ठेवली आहे. यामुळेच शरीराचे इतके माहात्म्य असून त्याचा आदर केला जातो. मनुष्यदेहाची प्राप्ती व्हावी अशी इच्छा बव्हंशी देवता-लोकातील जीवही करीत असतात. जरी मनुष्य देहाकडून अनेक वाईट कर्मे होतात, हे खरे असले; तरी ज्यावेळी श्रीसद्गुरूंच्या कृपेमुळे या शरीरात साधनाचा दिवा लागून तो माणसाच्या हाती येतो त्यावेळी त्याचा जन्म व जीवन सफल होते. धर्मसाधन कर-ण्याकरिताच आपल्याला या शरीराची प्राप्ती झालेली आहे; परन्तु जर साधनाची उपेक्षा करून आपण पशुप्रमाणे केवळ भोगवासने-साठीच या शरीराचा उपयोग केला तर हे अत्यन्त दुर्भाग्य आहे.

"अहं" चे अवलम्बन करूनच आमच्या सर्व ज्ञानाज्ञानांचा अर्थात् आत्मबोधाचा किंवा अनात्मबोधाचा उदय होतो. त्यामुळे आमचे "अहं" ज्ञानही "देहोऽहं" म्हणजे "मी देह आहे" आणि "शिवोऽहं" म्हणजे "मी शिव आहे" असे दोन प्रकारचे होते. "देहोऽहं" इति या बुद्धिः अविद्या सा प्रकीर्तिता।" मी देह आहे अशी जी बुद्धी आहे तीच अविद्या आहे आणि "नाहं देहः चिदा-त्मेति।" अर्थात् मी देह नसून चिदात्मा आहे हीच विद्या किंवा ज्ञान आहे. परन्तु आम्हाला प्रथम देहज्ञानच होते आणि आम्ही या देहज्ञान युक्त अशा "अहं" शीच परिचित आहोत. हाच आत्म्याचा बद्ध असा भाव आहे आणि दुसरा "अहं" हा "सोऽहं" किंवा "शिवोऽहं" असून त्याच्या बरोबर आपला तसा परिचय नाही. परन्तु हा "अहं" म्हणजे "अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ॥ ९.२४ ॥" या न्यायाने "अहं" हा आमचा आत्मा असून तो चिरमुक्त ईश्वरस्वभाव आहे. परंतु तो इन्द्रियांना अगोचर असल्यामुळे त्याला "सः" या शब्दाच्या द्वारा संबोधित केले जाते.

आपण नेहमी " मी, मी " असे म्हणतो; परन्तु " मी " ही काय वस्तू आहे हे जाणत नाही. याकरिता त्या मी चा शास्त्रकारांनी तो मी " सः " आहे किंवा तो " सः " च मी आहे, असा त्याचा परिचय दिला आहे. हा देहाभिमानयुक्त " मी " ज्यावेळी त्या " मी " ला शोधण्याकरिता निघतो त्यावेळी तो त्या " मी " त निमग्न होऊन जातो. त्यावेळी ब्रह्मज्ञान प्राप्त होते आणि जीवाचे जीवपण समाप्त होते. या दोन " मीं " चे मिलनच साधनाचे लक्ष्य आहे आणि त्या लक्ष्यापर्यन्त पोहोचण्याकरिता अनेक साधना कराव्या लागतात. याकरिताच या कुरुक्षेत्राच्या युद्धाचे आयोजन केले जाते.

या कुरुक्षेत्रावरील युद्धाचे दोन पक्ष आहेत. त्यातील एक पक्ष धर्माचा किंवा निवृत्तीचा असून दुसरा पक्ष अधर्माच्या किंवा प्रवृत्तीचा आहे. धर्माबरोबर अर्धमाच्या किंवा प्रवृत्तीबरोबर निवृत्तीच्या युद्धाचा इतिहास हेच मानवी जीवन आहे. दुर्गासप्तशती आदि अनेक शास्त्रांमध्ये त्याचे वर्णन पाहावयास मिळते. महाभारतात याचे विवरण पुढीलप्रकारे केले आहे.

दुर्योधन पापमय महावृक्ष आहे. कर्ण त्या वृक्षाचे खोड असून शकुनी शाखा, दुःशासन समृद्ध पुष्पफल आणि मनीषी राजा धृतराष्ट्र त्या वृक्षाचे मूळ आहे. युधिष्ठिर धर्ममय महावृक्ष आहे. अर्जुन त्या वृक्षाचे खोड असून भीमसेन शाखा, माद्रीचे दोन्ही पुत्र नकुल व सहदेव हे समृद्ध फल व पुष्प आणि त्या वृक्षाचे मूळ स्वतः श्रीकृष्ण, वेद आणि ब्राह्मण आहेत. "

अशा प्रकारे स्थूल सूक्ष्म व परार्थाने विभूषित झालेली व तदंगभूत सौंदर्याने झळकणारी अशी श्रीक्षेत्र कुरवपूर ही पुण्य, पवित्र व साधु-संतांची सिद्धभूमी आहे. भगवान् श्रीदत्तात्रेयांचे प्रथमावतार श्रीपाद

श्रीवल्लभ हे साधुसज्जनांना शक्तिपातयोगदीक्षाद्वारा मायापाशातून मुक्त करण्याचे आपले भारतवर्षातील नियत व संकल्पित अवतार कार्य पूर्ण होताच शेवटच्या काही काळात या पवित्र क्षेत्री येऊन वास्तव्य करून राहिले. या क्षेत्रात आल्यानन्तर येथेही त्यांनी आपले उर्वरित लोकोद्धाराचे कार्य पूर्ण केले व ते पुढे गुप्त होऊन अदृश्यरूपाने येथे निवास करून कसे राहिले हे पाहणे अत्यन्त उद्‌बोधक आहे. श्रीस्वामीमहाराजांच्या "द्विसाहस्री गुरुचरित्र" या ग्रंथाच्या व त्यावरील स्वकृत टीकेच्या आधारे प्रथम आपण श्रीपादश्रीवल्लभांचे चरित्र थोडक्यात पाहू व त्यानन्तर तदंगभूत असलेला त्यांच्या अवताराचा हेतूही पाहू.

या दृष्टीने "द्विसाहस्री गुरुचरित्राच्या" आधारे या गोष्टींचा विचार करण्याचे कारण असे आहे की, हा ग्रंथ श्रीदत्तात्रेयांनी श्रीस्वामीमहाराजांना द्रष्टे बनवून त्यांच्याकडून लिहून घेतला (खंड १ ला पृ १७५ ते १७७) व पुढे त्यांचा द्वारकेला मुक्काम असताना त्या ग्रंथावर श्रीदत्तात्रेयांच्या आज्ञेनेच श्रीस्वामीमहाराजांनी टीका लिहिली. (खंड २ रा पृ. ११८-१९९) त्यामुळे जणू काही श्रीदत्तात्रेयांनीच श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने आपल्या श्रीपादश्रीवल्लभ या कलियुगातील पहिल्या जन्मातील चरित्राचा व अवतारकार्याचा हेतू स्पष्ट केला आहे. ज्याप्रमाणे क्षेत्र नरसोबावाडी येथे श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांनी श्रीपादश्रीवल्लभ या नावाने घेतलेल्या आपल्या पूर्वावतारातील आश्विन शुद्ध १२ अर्थात् श्रीगुरुद्वादशी हा निजानंदी गमन केल्याचा दिवस स्वतः प्रसिद्ध केला त्याप्रमाणेच श्रीस्वामीमहाराजांकडून हे घडले आहे. या दृष्टीने श्रीपादश्रीवल्लभांच्या चरित्राचे व त्यांच्या अवतारकार्याचे प्रयोजन लक्षात घेणे किती महत्त्वाचे आहे याचा प्रत्यय आल्या

शिवाय राहणार नाही.

कर्नाटक व महाराष्ट्र या दोन प्रांतांच्या पूर्व सीमेवरील पीठापूर नावाच्या गावात एक सत्पात्र ब्राह्मण राहत असत. त्यांचे नाव आपळराजा असून त्यांच्या पत्नीचे नाव सुमती असे होते. ती आपल्या नावाप्रमाणेच अत्यंत चांगल्या व शुद्ध बुद्धीची असून सदाचारी होती. असे हे दोघेही पतिपत्नी नेहमीच श्रीदत्तोपासना व पूजाअर्चादि सर्व गोष्टी मोठ्या तत्परतेने करीत असत. एकदा अमावस्येच्या दिवशी साक्षात् भगवान् श्रीदत्तात्रेय याचकाचे रूप घेऊन माध्यान्हकाळी आपळराजाच्या घरी आले व त्यांनी भिक्षान्न मागितले. त्यावेळी दर्शश्राद्धाची सर्व पाकसिद्धी तयार होती; परन्तु श्राद्धविधी आणि ब्राह्मणभोजन व्हावयाचे होते. असे असले; तरी सती सुमतीने दर्शविधीपूर्वीच भिक्षुरूपधारी भगवान् श्रीदत्तात्रेयांना मोठ्या प्रेमाने व आदराने भिक्षान्न दिले. त्यावेळी सतीच्या मनातील भक्तिभाव जाणून विश्वव्यापक व सर्वात्मा भगवान् श्रीदत्तात्रेय सुप्रसन्न झाले आणि त्यांनी मातृबुद्धीने सती सुमतीचा उजवा हात आपल्या हातात घेऊन तिला आपले त्रिमूर्तिस्वरूप दाखवून दर्शन दिले. त्यावेळी तीन शिरे सहा हात असेच श्रीदत्तात्रेयांचे ध्यान-स्वरूप सती सुमतीने पाहिले. श्रीदत्तात्रेयांनी आपल्या खालील दोन हातांपैकी उजव्या हातात रुद्राक्ष माळ आणि डाव्या हातात कमण्डलू, मधल्या दोन हातांपैकी उजव्या हातात डमरू आणि डाव्या हातात त्रिशूल आणि वरील दोन हातांपैकी उजव्या हातात शंख व डाव्या हातात चक्र घेतलेले होते. त्याचप्रमाणे त्यांनी व्याघ्रचर्म पांघरलेले असून सर्वांगाला भस्म चर्चिलेले व डोक्यावर जटाभार धारण केलेला होता. अशा प्रकारे त्रिमुखयुक्त असे योगि-जनांनाही अत्यन्त दुर्लभ असे श्रीदत्तदर्शन सुमती साध्वीस झाले.

त्यावेळी भगवान् श्रीदत्तात्रेय मातृप्रेमाने सती सुमतीला असे म्हणाले की, "हे माते ! श्राद्धदिवशी निमंत्रण दिलेल्या पितरांच्या व देवांच्या ब्राह्मणांना भोजन देण्याच्या अगोदरच तू मला अन्न समर्पण केले आहेस; कारण हव्यान्न व कव्यान्न भोक्ता असा देव मी एकच आहे, हें तुला चांगलेच समजले आहे. सर्व भोक्ता भगवान् श्रीविष्णूच आहे, असे वर्णन श्रुति-स्मृतीत भाष्यकारांनी केले आहे. त्या जाणीव-बुद्धीनेच आज मला तू श्राद्धान्न समर्पण केले आहेस यामुळे मी तुझ्यावर अमर्याद खूष असून सुप्रसन्न झालो आहे. हे आई ! तुला कोणता वर पाहिजे ते तू मला सांग. तो वर दुर्मिळ असला तरीसुद्धा मी तो तुला देईन; कारण पाहिजे ते वरदान देण्यास मी समर्थ आहे."

भगवान् श्रीदत्तात्रयांचे हे बोलणे ऐकताच साध्वी सुमती त्यांना असे म्हणाली की, "अहो श्रीगुरुदत्ता ! मी आज मोठी धन्य झालेली आहे. त्याचप्रमाणे आमचे पितरही आज धन्य झाले आहेत व त्यांना निश्चितपणे चांगली गती लाभणार आहे; कारण आज मला साक्षात् आपले श्रीदत्तरूपाचे दर्शन झाले आहे. आपले हे सांग व सायुध असे रूपसौंदर्य मी माझ्या मानवी नेत्रांनी अद्याप समोर पाहत आहे. अहो श्रीदत्तात्रेया ! अशा प्रकारचे तुमचे सर्वांग सुंदर दर्शन, अभ्यासी योग्यांना डोळ्यांनी तर दिसणार नाहीच; परंतु हे रूप त्यांच्या मनापासूनही अतिशय दूर राहणारे असेच आहे. वर्षानुवर्षे तपानुष्ठान करणाऱ्यांनाही तुमच्या या रूपाचे दर्शन मिळणे अत्यन्त दुर्मिळच आहे. त्यामुळे मला झालेल्या दर्शनलाभा-पेक्षा अधिक मोठा लाभ तो कोणता आहे ? हे सांगा. मी भक्तीने समर्पण केलेले पैतृकभिक्षान्न आपण प्रेमानन्दाने स्वीकारले आहे. अहो श्रीदत्त अवधूता ! तुम्हीच अखिल चराचर सृष्टीचे उत्पन्नकर्ते,

पालनकर्ते व संहारकर्ते असून सर्वांचे मूळ कारण आहात. तुम्हीच आपल्या भक्तांना धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारही पुरुषार्थ देता. आपण मला माता असे म्हणता व माता या संबोधनाने हाक मारता म्हणून माझ्या उदरी तुमच्यासारखा सुपुत्र जन्मावा अर्थात् हे प्रभो ! तुम्हीच माझ्या उदरी सुंदर पुत्र म्हणून जन्म घ्यावा. त्यामुळे आपण मला दिलेले माता हे संबोधन सार्थ व सिद्ध होईल. याकरिता माझे संतान लोकसेवेस व आदरास प्राप्त होऊन विश्व-कल्याण साधेल असा आपण मला वर द्या."

साध्वी सुमतीच्या वराची ही याचना श्रवण करून भगवान् श्रीदत्तात्रेय तिला वर देताना असे म्हणाले की, "हे साध्वी स्त्रिये ! तू ज्याप्रमाणे मला वर मागितला आहेस त्याप्रमाणे जसेच्या तसे सर्व काही तुझ्या मनाप्रमाणे होईल. चिंता करू नकोस. मीच तुझा पुत्र होईन; परन्तु माझ्या वचनाचे तू उल्लंघन मात्र करू नकोस." असा वर देऊन भगवान् श्रीदत्तात्रेय घराच्या दारातच अंतर्धान पावले. अशा रीतीने आपल्या मनाप्रमाणे वरदान मिळाल्याने व आपल्या पोटी पुत्ररूपाने साक्षात् भगवान् श्रीदत्तमहाराज अवतार घेणार हे पाहून साध्वी सुमती अत्यंत आनंदित झाली व घरात येऊन तिने सर्व वृत्तान्त आपल्या पतीला निवेदन केला. ते वृत्त ऐकून आपळराजांनाही अत्यंत हर्ष झाला. अशा रीतीने ते दोघेही पतिपत्नी कमालीचे संतुष्ट झाले.

त्यावेळी साध्वी सुमती आपळराजांना असे म्हणाली की, "हे पतिदेवा ! मी आज फारच मोठा अपराध केला आहे; कारण की, ब्राह्मणभोजनासाठी तयार केलेले सर्व श्राद्धान्न, श्राद्धविधी होण्या-पूर्वीच मी भगवान् श्रीदत्तात्रेयांना भिक्षान्न म्हणून दिले. याकरिता आपण माझ्यावर कृपा करा आणि माझ्याकडून झालेल्या अपरा-

धाची मला क्षमा करा. माझ्या या विनंतीप्रमाणे सर्व काही करण्यास तुम्हीच योग्य आहात !" हे आपल्या पत्नीचे बोलणे ऐकून आपळ-राजा तिला असे म्हणाले की, "हे स्त्रिये ! पितरांकरिता तयार केलेल्या सिद्धान्नाचे भोजन ब्राह्मणांना घालून त्यांच्या द्वारा आपण करीत असलेले सर्व कर्म विष्णूंना समर्पण करतो. परंतु आपल्या सुदैवाने आज भगवान् विष्णूच श्रीदत्तरूपाने आपल्या घरी आले आणि अन्नभिक्षा स्वतःच स्वीकारून परमसंतोष पावले. हे मोठे अवघड व न साधणारे असे काम तू आज केले आहेस. अशा प्रकारचे काम मोठमोठ्यांना सुद्धा करता येत नाही व त्यांना साधतही नाही. आज ते काम तू सहजतेने केले आहेस. यापेक्षा अधिक असे आपणास काहीही नको. तू हे फारच चांगले केले आहेस, यात काहीच शंका नाही. स्वभक्तांचा उद्धार करण्यासाठी साक्षात् भगवान् श्रीदत्तात्रेय हे ब्राह्मण भिक्षूचे रूप घेऊन याचकाच्या रूपाने दुपारच्या वेळी (मध्यान्हकाळी) भिक्षा मागत फिरत असतात. त्यामुळे भिक्षान्न दानाने त्यांची पूजा–अर्चा आपण केली पाहिजे. त्यामुळे ते सुप्रसन्न होतात व वर देतात; मात्र भजनादिकांनी ते पाहिजे तसे प्रसन्न होत नाहीत. याकरिता हे कल्याणदायिनी सौभाग्यसंपन्न स्त्रिये ! तू केलेस तेच फार चांगले झाले आहे. तू मोठी धन्य व पुण्यवान् झाली आहेस. आज आमचे कूल तू पवित्र केले आहेस. मी तुला धन्यवाद देतो. याशिवाय आपल्याला श्रीदत्तकृपेने देवदुर्लभ वरदान मिळालेले असल्यामुळे त्यायोगे आपल्या पोटी भगवन्ताचा अवतार होऊन त्यामुळे आपल्याला लोककल्याणसुद्धा साधता येईल." अशा प्रकारे साध्वी सुमतीच्या मनातील अपराधाची भावना दूर करून आपळराजांनी शिल्लक राहिलेल्या अन्नाने लौकिकश्राद्धविधी

यथायोग्य रीतीने पूर्ण केला. श्राद्धान्न विष्णुभक्तांना अर्पण करून शेषान्नाने श्राद्ध करावे असे वैष्णवमत आहे. साध्वी सुमतीने असे केल्यामुळे अनायासे तेही साधले. त्यानन्तर साध्वी सुमती ही गर्भवती झाली आणि नंतर योग्य काळी म्हणजे नऊ महिने पूर्ण झाल्यानन्तर भाद्रपद शुद्ध चतुर्थीच्या दिवशी प्रातःकाली सूर्योदयाला ती प्रसूत होऊन पूर्वीच ठरल्याप्रमाणे श्रीपादश्रीवल्लभ यांचा अवतार झाला.

त्यानन्तर मनुष्यरूपी श्रीदत्तात्रेय बालकाला पाहून ज्योतिषी ब्राह्मण असे म्हणाले की, " अरे दैववान् ब्राह्मणा ! हा तुझा मुलगा म्हणजे तुम्ही उभयतांनी पूर्वी जो अपार पुण्यसंचय केला त्या पूर्व-पुण्यरूप कल्पवृक्षाचेच फळ तुम्हाला मिळाले आहे. ही गोष्ट अतिशय दुर्लभ व दुर्मिळ आहे. असा मुलगा लाभणे म्हणजे पूर्वी केलेल्या जन्मजन्मांतरातील सुकृताचे अर्थात् पुण्याचेच फळ तुम्हाला या जन्मी मिळालेले आहे, हे लक्षात घेतले पाहिजे. या पुत्राच्या जन्मकुंडलीत सर्व ग्रह अनुकूल असून ते शुभयोग दाखवितात. या मुलाचा लोकात मानसन्मान होईल. सर्व लोक त्याची अत्यन्त आदराने पूजा करतील. हा साक्षात् भगवान् श्रीदत्तात्रेयच आहे. तुमच्या दोघांच्या भक्ती-मुळेच भगवान् श्रीदत्तात्रेय या बालकाच्या रूपाने अवतीर्ण झाले आहेत; हे त्याच्या ग्रहयोगावरून स्पष्ट दिसते. " त्या मुलाचे हे जन्मटिपण पाहून ज्योतिषांना, आईवडिलांना व इतर सर्वांना फारच आनंद झाला. हा मुलगा आजानुबाहू असल्यामुळे त्याचे नाव श्रीपाद असे ठेवले होते. त्या मुलाचे आईवडील त्याचे संगोपन काळजीने व अतिशय दक्षतेने करीत होते. त्यामुळे मुलाची वाढ झपाट्याने होत राहून तो चांगला हृष्टपुष्ट झाला. ज्याप्रमाणे सूर्याच्या प्रखर व तेजःपुंज किरणांनी मूलतः जलमय असलेला पूर्ण चंद्र रात्रीच्या अंधकाराचा नाश करून तेजस्वी असा शीतप्रकाश लोकांना देतो

त्याप्रमाणे श्रीपादांचे असामान्य तेज लोकात पसरले. त्यानन्तर त्या मुलाचा जातकादि कर्मसंस्कार विधी झाला. योग्यकाली मुंज झाली. त्यावेळी बटू श्रीपादांनी स्वतः तिन्हीही वेद म्हणून दाखविले आणि शिष्यांनाही वेदपाठ समजावून दिले. श्रीपादांनी आचार, व्यवहार व प्रायश्चित्त यांचे पालन स्वतः काटेकोरपणे केले व इतरांनाही त्यांनी नियमपालनाची दीक्षा दिली. त्यानन्तर श्रीपादांचा विवाह ठरविण्यास त्यांचे वडील तयार झाले; परंतु श्रीपादांनी पित्याचे निवारण करताना त्यांना असे सांगितले की, "मी तापसी व ब्रह्मचारी आहे. माझे लग्न योगाभ्यासरूपी लक्ष्मीशीच ठरलेले आहे. त्यामुळे योगस्त्रीवाचून अन्य स्त्रीशी माझे लग्न होणार नाही; कारण इतर सर्व स्त्रिया मला मातेसमान आहेत. योगश्री हीच माझी खरी व आवडती गृहलक्ष्मी आहे. अहो ताता ! ही योगश्री मलाच सुलभ आहे; कारण मी श्रीवल्लभ आहे, हे विसरू नका." याप्रमाणे सांगून विरक्त तापसी होऊन निघालेल्या श्रीपादश्रीवल्लभांना पाहून त्यांच्या आईवडिलांचे नेत्र प्रेमाश्रूंनी भरले. त्यावेळी ते त्यांना असे म्हणाले की, "अरे श्रीपादा ! तू आम्हा मातापित्यांचे जीवनसर्वस्व आहेस. तू निघून गेल्यानंतर आम्ही कसे जगावे ? व कोठे राहावे ? पाणी नसल्यावर कमळे जगतील काय ? अरे ती पाण्याशिवाय वाळूनच जातील, तसेच आम्हीही मरून जाऊ. तू साक्षात् अतींद्रिय भगवान् विष्णूच आहेस, हे अगदी खरे आहे. आमच्या पूर्व पुण्याईनेच तू आमचा पुत्र झाला आहेस हे आम्ही पूर्णपणे जाणतो. तुझे दर्शन झाले हा आमचा मोठा भाग्योदयच झाला आहे, हेही खरे आहे. मग आम्हाला तू दुःखसागरात का टाकतोस ? आमच्या पांगळ्या व आंधळ्या अशा दोन मुलांना पाहून पाहून आम्ही म्हातारे झालो आहोत. अरे भगवान् श्रीपाद हरे !

आता मृत्युरूप संसारपाशाच्या दुःखातून आम्हाला मुक्त करणारे तुझे स्मरण अतिशय दूर जाणार आहे, हे खरे की नाही ? " याप्रमाणे करुणरसाने भरलेली मातापितरांची सद्गद् वाणी श्रवण करून श्रीपादांनी आपल्या दोन्ही भावांच्या मस्तकांवर जणूकाही सुखाची खाणच की काय ? असा आपला शुभंकर व वरद असा उजवा हात मोठ्या वात्सल्याने ठेवला; कारण श्रीपादरूपी हरी हा दुःखहर्ताच आहे. अशा प्रकारे दोन्ही थोरल्या भावांना श्रीपादश्रीवल्लभांचे वरदान मिळून त्यांच्या मस्तकावर वरद हस्तस्पर्श झाल्यामुळे ते दोघे धन्यता पावले.

ज्याप्रमाणे चिंतामणीचा स्पर्श होताक्षणीच लोखंडाचे सोने होते त्याप्रमाणेच श्रीगुरू श्रीपादश्रीवल्लभ यांचा हस्पस्पर्श होताक्षणीच एकदम त्यांच्या मोठ्या भावांपैकी एकास सुंदर पाय आले आणि दुसऱ्यास सुरेख असे दोन डोळे मिळाले. त्याप्रमाणेच त्या दोघांची देहयष्टी फारच देखणी व सुस्वरूप अशी झाली. केवळ इच्छामात्रानेच अखिल विश्वोत्पत्ती करून लीलेने विहार करणाऱ्या भगवान् श्रीपरमेश्वरास चरण व नेत्रदान करणे हे अवघड व आश्चर्यकारक नाही, हेच खरे आहे.

हे कसे घडते हे सांगताना स्थूलार्थाने व परार्थानेही " महायोगी श्रीगोरक्षनाथ " यांनी " सिद्धसिद्धान्तपद्धती " या ग्रंथात असे म्हटले आहे की—

कथनाच्छक्तिपाताद्वा पादुकाद्यवलोकनात् ।
प्रसादात्स्वगुरोः सम्यक् प्राप्यते परमं पदम् ॥ ५.६५ ॥
न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकम् ।
शिवशासनतः शिवशासनतः शिवशासनतः शिवशासनतः ॥ ६६ ॥

**वाङ्मात्राद्वाथ दृक्पाताद्यः करोति च तत्क्षणात् ।**
**प्रस्फुटं शांभवं वेद्यं स्वसंवेद्यं परं पद्म ॥ ६७ ॥**

उपदेशाने, शक्तिपाताने व श्रीसद्‌गुरूपादुकांच्या अवलोकनाने किंवा सेवेने ज्यावेळी श्रीसद्‌गुरूंचा सम्यक् प्रसाद प्राप्त होतो त्यावेळी ऐहिक दृष्टचा भोगाची व परदृष्टचा मोक्षाची अर्थात् परमपदाची प्राप्ती होते. यासाठीच श्रीशंकरांचे एकमात्र शासन अर्थात् शास्त्र किंवा सांगणे असे आहे की, श्रीसद्‌गुरूंपेक्षा काहीही श्रेष्ठ नाही; कारण सर्वश्रेष्ठ असे श्रीसद्‌गुरू केवळ वाणीने किंवा केवळ दृष्टीने एका क्षणात ऐहिक भोग किंवा परमश्रेष्ठ व स्वसंवेद्य अशा शांभव ज्ञानाला प्रकर्षत्वाने प्रकट करून त्याची अनुभूती आणून देतात.

या दृष्टीनेच मूळ "श्रीगुरुचरित्रात" श्रीपादश्रीवल्लभ हे, "भोगश्च मोक्षश्च करस्थ एव" या न्यायाने, भोग व मोक्ष या दोन्ही गोष्टी करतलावर आवळा ठेवावा त्याप्रमाणे प्रत्यक्ष देणारे आहेत हे सांगताना "श्रीसरस्वतीगंगाधर" यांनी असे म्हटले आहे की–

**ऐकोनि जननीचें वचन। अवलोकी अमृतदृष्टी करून।**
**पुत्र दोघेही झाले सगुण। आली दृष्टी चरणादिक ॥ ५.६६ ॥**
**वेदशास्त्रादि व्याकरण। सर्व म्हणती तत्क्षण।**
**दोघे येऊनि धरिती चरण। कृतार्थ झालों म्हणोनियां ॥ ६७ ॥**
**जैसा चिन्तामणी स्पर्शें। लोखंड होय सुवर्णासरिसें।**
**तैसें महात्मदृ्ष्टि वर्षें। योग्यता आली तत्काळीं ॥ ६८ ॥**

त्यानंतर श्रीपादश्रीवल्लभांनी साध्वी सुमतीला पूर्वी वरदान देताना जे स्वतःचे त्रिमूर्तिस्वरूपयुक्त श्रीदत्तरूप आईला दाखविले होते तेच पुन्हा दाखविले. ते अपूर्व रूप पाहून साध्वी सुमती माता विलक्षण आश्चर्यचकित झाली. त्यावेळी "हे माते ! तू माझ्या वचनाचे उल्लंघन करू नकोस," असे वरदानकालातील भगवान्

श्रीदत्तात्रेयांच्या वचनाचे स्मरण करून ती माता अत्यन्त केविलवाण्या शब्दांनी आपल्या मुलाला असे म्हणाली की, " हे श्रीपादश्रीवल्लभा ! हे श्रीदत्तात्रेया ! तुझी ही दैवी माया तरून जाणे अत्यन्त कठिण व दुरापास्त आहे. त्या मायेनेच मी फार मोहून गेले आहे अर्थात् त्यात रंगून गेल्यामुळे गोंधळून गेले आहे. तुझे नेहमीचे त्रिमूर्त्यात्मक असे सत्यरूप मी जाणू शकत नाही; कारण ते माझ्या बुद्धिमर्यादेच्या पलीकडे आहे. याकरिता तू माझा पुत्रच आहेस अशी माझी भावना अद्याप कायम आहे; पण आता मात्र तुझ्यासंबंधी पुत्रकल्पना करणे हे बरोबर ठरणार नाही; कारण अखंड ब्रह्माण्डाच्या रांगाच्या रांगा आणि त्यांच्या शेकडोशे ओळीच्या ओळी तुझ्या उदरात सहजगत्या समाविष्ट होऊन अंतर्भूत होतात, तोच तू माझ्या पोटी जन्माला आला आहेस असे समजणे म्हणजे ती एक विडंबनाच वाटते. ती एक प्रकारे थट्टाच केल्यासारखे नाही काय ? यासाठी हे भगवान् दत्तात्रेयस्वरूप श्रीपादश्रीवल्लभा ! तुझ्या विक्षेपावरणशक्तिरूप मायेचे आवरण किंवा आच्छादन माझ्यावर नसावे. ते तू दूर कर; कारण या आवरणामुळेच जन्ममरण दुःखरूप संसार घडतो, चित्त विक्षेप होतो व सत्य काय आहे ते समजत नाही. अंधारात पडलेली दोरी सापासारखी दिसते. ते सारे खोटे असते; परंतु त्या भ्रमानेच आपण थरथर कापतो, भितो, ओरडतो आणि धावत सुटतो. त्यानंतर जरी दिव्याच्या प्रकाशाने खरे समजले तरी नन्तर सुद्धा जे भयकंपादि विकार राहतात त्यांनाच विक्षेप असे म्हणतात; परंतु पुढे ते आपोआपच शांत होतात अशा प्रकारची मायाविक्षेप बाधा मला नसावी. "

अशा प्रकारे वेदान्त तात्पर्यार्थात्मक प्रार्थना साध्वी सुमतीने केली असता श्रीपादश्रीवल्लभ आपल्या आईला असे म्हणाले की,

" हे माते ! आत्ता जे रूप मी तुला दाखविले व तू जे पाहिलेस तेच तुझ्या सर्व वृत्तींना व्यापून राहिलेले रूप तू मनात धारण कर आणि त्याचेच वारंवार चिन्तन, मनन व ध्यान करीत जा. या साधनामुळे तू लवकरच हा मायामय समुद्र तरशील व माझ्या सच्चिदानंदघनस्वरूप अशा सायुज्यपदाला येऊन मिळशील."

त्यानंतर आपल्या दोघा बंधूंना आईवडिलांची सेवा करावयास सांगून "दीक्षा द्यावया साधुजनां ॥ श्रीगुरुचरित्र ५.७४ ॥" व "दीक्षा करावया भक्तजनां ॥ ५.७७ ॥" हा आपल्या अवतार कार्याचा हेतू स्पष्ट करताना ते आपल्या आईस असे म्हणाले की, "हे माते ! साधूंना व भक्तजनांना दीक्षादान करून मला लोकोद्धाराचे कार्य करावयाचे असल्याने तू आमची अवज्ञा न करता आम्हाला त्वरित निरोप द्यावा यातच तुझे कल्याण आहे."

याप्रमाणे आईची अनुज्ञा घेऊन व सर्वांचा प्रेमळ निरोप घेऊन श्रीपादश्रीवल्लभांनी आपल्या आईवडिलांना तीन प्रदक्षिणा घालून नंतर त्यांना नमस्कार केला व ते घरातून बाहेर निघाले. त्यानंतर ते प्रथम काशीला गेले. तेथून श्रीक्षेत्र बदरीनारायणाला जाऊन नंतर श्रीक्षेत्र गोकर्णाला येऊन राहिले. तेथे तीन वर्षे राहून ते श्रीगिरिपर्वतावर गेले. तेथून ते कुरवपूर या महाक्षेत्रात येऊन राहिले. तेथे अंबिका नावाच्या साध्वी स्त्रीस व तिच्या मतिमंद मुलास आत्महत्येपासून निवृत्त करून त्या गतधवा स्त्रीच्या निष्कपट व करुणप्रार्थनेने संतुष्ट होऊन आणि दयार्द्र बुद्धीने तिची प्रार्थना मान्य करून इतरांना दुर्मिळ असणारा स्वतःचा वरदहस्त श्रीपाद-श्रीवल्लभांनी त्या मूर्ख मुलाच्या मस्तकावर ठेवला आणि त्या बरोबर ताकाळ तो मुलगा देवगुरू बृहस्पतीसारखा वेदशास्त्रज्ञाता व विद्यापारंगत झाला. त्यावेळी त्या अंबिका नावाच्या स्त्रीच्या

"पुत्र व्हावा तुज ऐसा ।। श्रीगुरुचरित्र–८.११० ।।" या विनंतीप्रमाणे त्यांनी पुढे तिच्याच पोटी कारंजाला श्रीमन्नृसिंहसरस्वती या नावाने अवतार घेतला. त्याचप्रमाणे एका रजकाला वरदान देऊन त्याच्या भोगेच्छेप्रमाणे पुढील जन्मात त्याला यवन राजा करून व आपणही श्रीमन्नृसिंहसरस्वती या नावाने अवतार घेऊन शेवटी त्याला श्रीशैल्यपर्वतावर बोलावून घेऊन ज्ञानदान करून मुक्त केले. यानन्तर काही काळ प्रकट रूपाने वास्तव्य करून पुढे आश्विन वद्य १२ ला अवतार समाप्ती करून म्हणजे अदृश्य होऊन श्रीपादश्रीवल्लभ अदृश्यरूपाने श्रीक्षेत्र कुरवपूर या महाक्षेत्रात अखंड विराजमान झाले. त्यानंतर गुप्तरूपाने त्यांनी चोरांपासून श्रीवल्लभेश या भक्ताचे रक्षण कसे केले याची श्रीगुरुचरित्रातील नवव्या अध्याया-तील कथा वाचनीय आहे. आजही भक्तसाधकांना याचा प्रत्यय झाल्याशिवाय राहात नाही, कारण इ. स. १९८६ साली १३–१४ जणांसह मी ( केशव रामचंद्र जोशी ) त्या स्थानी नावेतून जात असताना नाव कशी बुडाली व त्यातून सर्वांना श्रीपादश्रीवल्लभ श्रीमन्नृसिंहसरस्वती – श्रीवासुदेवानंदसरस्वती – श्रीदत्तात्रेयस्वरूप श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी कसे वाचविले याची सर्व हकीकत परि-शिष्टात कै. श्रीरामकवी यांनी त्या प्रसंगावर रचलेल्या काव्याद्वारा कथन केली आहे. ( पाहा–परिशिष्ट क्र १ )

येथेपर्यन्त श्रीपादश्रीवल्लभांचे जीवनचरित्र पाहिल्यावर आता श्रीपादश्रीवल्लभ कुरवपूर येथे येऊन का राहिले हे श्रीस्वामीमहा-राजांच्या शब्दातच पाहिले म्हणजे "आपण या स्थानी येऊन चातुर्मास करावा म्हणजे पुष्कळ मंडळी येथे येऊन हे दुर्गम स्थान प्रसिद्ध होईल," अशी श्रीपादश्रीवल्लभांनी श्रीस्वामीमहाराजांना आज्ञा करून व त्यांना येथे चातुर्मास करावयास लावून व काहीकाळ

येथें त्यांचे वास्तव्य करवून घेऊन हे स्थान प्रसिद्ध का केले ? त्याचा हेतू स्पष्ट होईल व श्रीस्वामीमहाराज हे श्रीपादश्रीवल्लभरूप कसे आहेत याची अनुभूती येऊन मन अनन्य भक्तिभावाने ओथंबून जाऊन त्यांच्या चरणी लीन होईल. या दृष्टीने श्रीक्षेत्र कुरवपूरचे वर्णन करताना श्रीस्वामीमहाराज द्विसाहस्री गुरुचरित्रात व त्यावरील टीकेत असे म्हणतात की, " श्रीपादश्रीवल्लभ हे कुरव-पुरात अद्यापही साधू, संत, सज्जन, आस्तिक, श्रद्धाळू, भक्त व पुण्यवान् लोकांना प्रत्यक्षपणे दिसतात अर्थात् दर्शन देतात. असे असले; तरी कलीच्या मलाने दूषित झालेल्या पातकी लोकांना ते दिसत नाहीत. श्रीपादश्रीवल्लभांनी पुढे कारंजाला श्रीमन्नृसिंह-सरस्वती या नावाने दुसरा अवतार घेऊन सुद्धा या श्रीक्षेत्र कुरव-पुरात ते अदृश्यरूपाने वास्तव्य करून भक्तांच्या इष्ट कामना अद्यापही पूर्ण करतात. वेदाध्ययनाने, यज्ञयागादि अनुष्ठानाने शरीरकष्ट सोसून केलेल्या तपाचरणाने, सत्पात्री दान दिल्याने आणि इतर पुण्यकर्मांनी जे फळ कर्म करणाऱ्या यजमानांना मिळते, त्यापेक्षाही अधिक पुण्यलाभ अर्थात् अविनाशी व ध्रुवपदासारख्या अविचल अशा मोक्षपदाचा लाभ श्रीपादश्रीवल्लभांनी वास्तव्य केलेल्या या श्रीकृष्णानदीच्या मध्यभागी असलेल्या श्रीक्षेत्र कुरवपूर क्षेत्रात वास्तव्य करून राहिलेल्यांना अत्यंत शीघ्रगतीने लवकर मिळतो, यात काहीच शंका नाही. श्रीपादश्रीवल्लभांनी पुढे कारंजात श्रीमन्नृसिंहसरस्वती रूपाने अवतार घेतला; तरी सुद्धा श्रीक्षेत्र कुरवपूर येथें राहणाऱ्या साधक-भक्तांचा ते आजही उद्धार करतात, यात काहीच शंका नाही. आजही तेथे भक्त लोकांना व साधकांना श्रीपादश्रीवल्लभगुरूंचे दर्शन घडते व लोकांचे नवस पूर्ण होतात.

अशा प्रकारचा अनुभव अद्यापही सर्वांना मिळतोच हे कसे ? अशा प्रकारची शंका येथे निर्माण होण्याची शक्यता आहे. तोच आशय मनात आणून श्रीस्वामीमहाराज असे म्हणतात की. " सामान्य माणसाप्रमाणेच म्हणजे जीवाप्रमाणेच श्रीपादश्रीवल्लभांचाही देह मानवशरीररूपी होता. मग अन्य अवतार घेतल्यानंतरही श्रीक्षेत्र कुरवपूर येथे ते दिसत होते व भक्तांच्या कामना पूर्ण होत होत्या हे कसे शक्य आहे ? अशा प्रकारच्या शंकाकारांचे म्हणणेही आम्हाला संयुक्तिक व योग्य वाटते. याचे वास्तविक उत्तर असे आहे की, जीवाला अविद्येचा संबंध असल्याने त्याला मिथ्याभूत म्हणजे खोटयाच असलेल्या षड्विकारांसहित अशा देहादिकांचा संबंध येतो किंवा असतो; कारण जीव हा अविद्या परतंत्र असतो. त्यामुळे तो खोटया भासणाऱ्या देहादिकांशी आत्मबुद्धीने म्हणजे मी देहच आहे अशा बुद्धीने तदाकार होऊन तादात्म्य पावतो. ईश्वराचे मात्र तसे नाही; कारण ईश्वर हा नित्य, शुद्ध, बुद्ध, ज्ञानी, मुक्त, सत्य, चिद्घन, आनंदस्वरूप व स्वतंत्र आहे. योगमायेच्या मदतीने तो लीलेकरताच शरीरधारी होतो. यामुळे जीव आणि ईश्वर यांच्यात मोठाच फरक दिसून येतो. यादृष्टीने येथे जीवधारी मानव व लीला शरीरधारी ईश्वर यांची तुलनाच होऊ शकत नाही. या विचाराने उपरोक्त शंकेचे निरसन होते. "

" परमेश्वराधिष्ठित पुण्यक्षेत्रात वास्तव्य केल्याने अनायासानेच भगवन्ताच्या आवडत्या सद्भक्तांचा सहवास अशा क्षेत्रात होतो; कारण भगवद्भक्त बहुतकरून पुण्यक्षेत्रातच राहतात. त्यांच्या सहवासानेच इतरेजनांना भगवन्नामाच्या श्रवणकीर्तनाचा लाभ अद्यापिसुद्धा मिळतो आहे. अन्य ठिकाणी विघ्ने व अडचणी फारच येतात. त्यामुळे ध्यान, श्रवण, कीर्तन इत्यादि काहीच घडत नाही.

श्रीक्षेत्र कुरवपुरात साक्षात् श्रीपादश्रीवल्लभांचे वास्तव्य असल्याने तेथे निर्विघ्नपणे ध्यान, योग, अभ्यास, श्रवण, कीर्तन, चिंतन इत्यादि सर्वकाही अनायासे साध्य होते. त्यामुळे त्या ठिकाणी साधकांना ज्ञानामुळे साध्य होणारा मोक्ष अत्यन्त सुलभतेने मिळतो; कारण त्यांना अशा क्षेत्राच्या ठिकाणीच उपासनादि सर्व साधने मिळतात. अशी साधने अन्यत्र कोठेही मिळत नाहीत; असा अनुभव अद्यापही येतो. पुण्यक्षेत्रातच परमेश्वर सेवेची परिपूर्णता होऊन कार्याची सिद्धी सत्वर होते."

श्रीक्षेत्र कुरवपूरचा महिमा कथन केल्यावर श्रीस्वामीमहाराज सिद्धांच्या मुखातून श्रीपादश्रीवल्लभांचा अपरंपार महिमा वर्णन करताना द्विसाहस्री गुरुचरित्राच्या टीकेत असे कथन करतात की, "सिद्धमहायोगी नामधारकास असे म्हणाले की, अरे नामधारका! या भूतलावर जेथे कोठेही वाटेल त्या ठिकाणी जे कोणी भक्त, साधकलोक श्रीपादश्रीवल्लभ यांच्या चरणकमलांचे केवळ स्मरण करतात त्या सर्वांच्या मनकामना श्रीपादगुरू निश्चितपणे पूर्ण करतात आणि त्यांना इष्टफलही भरपूर देतात. ज्या लोकांना पुण्यक्षेत्रात जाणे जमत नाही अथवा शक्य होत नाही त्या लोकांनी सदासर्वदा श्रीपादश्रीवल्लभांचे चिंतन करीत राहावे म्हणजे त्यांना हवे ते सर्व मिळून त्यांचे सतत परमकल्याण होत राहील, यात काहीच शंका बाळगण्याचे मुळीच कारण नाही. साधकांनी विशेषेकरून ही गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे."

शेवटी श्रीस्वामीमहाराजांना आज्ञा करून श्रीक्षेत्र कुरवपूर हे स्थान प्रसिद्ध करण्याचा श्रीपादश्रीवल्लभांचा हेतू काय होता? अर्थात् श्रीदत्तात्रेयांचा प्रथम अवतार श्रीपादश्रीवल्लभ, द्वितीय अवतार श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज व तृतीय अवतार

योगिराज श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती-महाराज या सर्वांच्या अवतार धारण करण्याचे एकच एक दिव्य प्रयोजन कोणते होते ? व हे सर्व अवतारी महापुरुष एकाच दिव्य अशा प्रयोजनसूत्राने कसे सूत्रबद्ध झाले होते ? हे पाहिले की, श्रीस्वामीमहाराजांच्या अवतार प्रयोजनाचे सूत्र हाती येऊन, त्यांनी या सूत्रानुसार प्रवाहित केलेल्या साधनगंगेच्या प्रवाहात स्नान करण्याचे सौभाग्य आपल्यालाही श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांच्या कृपेने प्राप्त झाले आहे, याची मनोमन प्रचीती येऊन जीवन धन्य व कृतार्थ झाल्याचा आनंद झाल्याशिवाय राहात नाही. या सर्व आनन्दाचे एकमात्र कारण असे आहे की, माझे हृदयस्थ सद्‌गुरुनाथ श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या जीवनाचेही दिव्य प्रयोजन उपरोक्त अवतार कार्याच्या प्रयोजनाप्रमाणेच "दीक्षैव मोचयत्यूर्ध्वं शैवं धाम नयत्यपि।" व "क्षीणे तस्मिन् यियासा स्यात्परं निःश्रेयसं प्रति॥" या न्यायाने दीक्षाद्वारा साधकाच्या पाशांचा नाश करणारे साधन त्यांना देऊन मोक्षप्राप्ती करून देणे हेच होते. (श्रीसद्‌गुरू आपल्या दिव्य शक्तीचे शक्तिपातयोग सामर्थ्याने शिष्य देहात संक्रमण करून जेव्हा शिष्याच्या अनादि निद्रिस्त अशा संसारोन्मुख, भोगोन्मुख व वासनोन्मुख आत्म-शक्तीला अन्तर्मुख, शिवोन्मुख व आत्मस्वरूपोन्मुख करतात तेव्हाच या प्रक्रियेला दीक्षा असे म्हटले जाते ) ही दीक्षाच साधकाला मुक्त करणारी असून तीच त्याला वर शिवधामात घेऊन जाणारी आहे; कारण अशा प्रकारे दीक्षेने साधकाच्या पाशाचा नाश झाल्यावर त्याला परमनिःश्रेयसाकडे जाण्याची इच्छा होते. अशा तऱ्हेने ईश्वरसदृश श्रीमद्‌गुरूच दीक्षा म्हणजे कृपेद्वाराच मल, पाश, विक्षेप व आवरणाची निवृत्ती करीत असल्यामुळे मोक्ष हा आत्म-

कर्तृक नसून ईश्वरस्वरूप श्रीसद्गुरुकर्तृक आहे. ही दृष्टी एकदा पक्की मुरली म्हणजे श्रीभगवान् श्रीदत्तात्रेय, श्रीपादश्रीवल्लभ, श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज, श्रीस्वामीमहाराज व श्रीसद्-गुरुनाथमहाराज यांच्या द्वारा प्रकट झालेली त्यांच्या अवतार-कार्याच्या प्रयोजनाची सिद्धी व पूर्ती दिव्य, भव्य, अलौकिक व लोकोत्तर अशा अमानवीय आविष्कारांच्या द्वारा आजही होताना दिसते; हे नितान्त सत्य व सिद्ध आहे.

भगवान् श्रीदत्तात्रेयांचा प्रथमावतार श्रीपादश्रीवल्लभ यांनी, उपरोक्त चरित्र कथन करताना सांगितल्याप्रमाणे, घरातून बाहेर निघताना आपल्या साध्वी मातेस असे कथन केले होते की—

आमची अवज्ञा न करितां। निरोप द्यावा आम्हा त्वरिता।
जाणें असे उत्तरपंथा। दीक्षा द्यावयां साधुजनां ॥ ५.७४ ॥
दीक्षा करावयां भक्तजनां। तीर्थें हिंडणें आपणा।
मनोवेगें मार्गक्रमणा। आले तीर्थ गोकर्णासी ॥ ५.७७ ॥

यावरून हे स्पष्ट होते की, श्रीपादश्रीवल्लभांनी आपल्या मातेस स्वतःच आपल्या अवताराचे प्रयोजन सांगताना असे म्हटले आहे की, "हे माते! आम्हाला साधुजनांना व भक्तजनांना दीक्षा द्यावयाची आहे व त्यासाठीच आम्ही भारतभ्रमण करणार आहोत."

याचा स्थूलार्थ व सूक्ष्मार्थ प्रकट करताना श्रीस्वामीमहाराजांनी द्विसाहस्री गुरुचरित्राच्या टीकेत असे म्हटले आहे की, "लोक-कल्याणार्थच भगवन्ताचे अवतार होतात. याखेरीज त्याच्या अव-ताराचे दुसरे कोणतेही प्रयोजन असत नाही. मानवांच्या दुर्वासना व पातकी भ्रष्टाचार इत्यादि मलिन कृत्यांनी दूषित झालेल्या कलियुगात दीन, दरिद्री, हीनमती, दुर्वासनायुक्त, द्वेषयुक्त, मत्सर-ग्रस्त, दुर्बल व ब्रह्मचर्यादि पुण्याचरण नसलेल्या अशा प्रकारच्या

लोकांना जाणकार दृष्टीने पाहून त्यांचा उद्धार करण्यासाठीच भगवान् श्रीदत्तात्रेयांनी अवतार घेतला. सांगविद्याशक्ती, पूर्णज्ञान, अमर्याद बल, अमोघवीर्य, शुद्धसत्त्व, महातेजस्वी, सात्त्विकाचार इत्यादि विशिष्ट गुणयुक्तच हा अवतार होता आणि प्रेमळपणाने लोकांना भक्तिमार्गाचे ज्ञान समजावून सांगणे, हा हेतू या अवतारात साधावयाचा होता." श्रीपादश्रीवल्लभांच्या अवतारप्रयोजनाचा परार्थ सांगताना श्रीस्वामीमहाराज असे म्हणतात की, "दीनांचा उद्धार करणे हेच या अवताराचे प्रयोजन आहे."

या रीतीनेच श्रीदत्तात्रेयांनी "श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज" या नावाने द्वितीय अवतार घेतल्यावर या अवताराचे प्रयोजन "श्रीगुरुचरित्र" या ग्रंथात श्रीसरस्वतीगंगाधर यांनी त्यांचे गुरू श्रीकृष्णसरस्वतीस्वामीमहाराज यांच्या मुखातून स्पष्ट करताना असे म्हटले आहे की –

**लोकानुग्रहानिमित्त । हा होय गुरू समर्थ ।**
**याचे दर्शनमात्रें पतित । पुनीत होती यरियेसा ॥ १२.८८ ॥**
**लोकानुग्रहाकारणें । तुम्ही आतां संन्यास घेणें ।**
**आम्हालागीं उद्धरणें । पूजा घ्यावी आम्हांकरी ॥ ९१ ॥**

यावरून भक्त व साधू लोकांना अनुग्रह अर्थात् दीक्षा देऊन त्यांचा उद्धार करणे, हेच याही अवताराचे प्रयोजन आहे, हे स्पष्ट होते.

याप्रमाणेच श्रीस्वामीमहाराजांनीही उज्जयिनी येथे प. प. श्रीनारायणानंदसरस्वतीस्वामीमहाराजांकडून दण्डग्रहण केल्यानन्तर त्यांना श्रीदत्तप्रभूंनी अशी आज्ञा केली होती की, "आज सर्वत्र वर्णाश्रमधर्माचा लोप झालेला आहे; तरी यापुढे सर्व भरतखंडात पायीच संचार करून सर्व लोकांना उपदेश द्यावा म्हणजे सर्व लोकांवर कृपेचा अर्थात् शक्तिपाताचा वर्षाव करावा आणि धर्ममार्गाची

स्थापना करून ईश्वरनिष्ठा व स्वधर्मनिष्ठा जागृत करावी. " येथे तर श्रीदत्तप्रभूंनी आपल्या योगिराज या अवतारातील प्रयोजनाचे उद्‌घाटन स्वतःच केले आहे.

यासर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, भगवान् श्रीदत्तात्रेय, श्रीपादश्रीवल्लभ, श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज व श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज या चारही अवतारांचे प्रयोजन दीक्षाद्वारा अर्थात् कृपा करून म्हणजे भक्त व साधुजनांच्या ठिकाणी आपल्या दिव्य, अलौकिक व लोकोत्तर अशा शक्तीचा स्थूल, सूक्ष्म व पर पातळीवर दिव्य असा संचार करून अर्थात् शक्तिपात करून त्यांची अनादि निद्रिस्त आत्मशक्ती जागृत करून त्यांचे इहपर भोग व मोक्ष दानाने अखंड कल्याण करणे हेच आहे, हे स्पष्ट होते.

अशाप्रकारे लोकोद्धाराचे दिव्य प्रयोजन सिद्धीस जावे म्हणून श्रीदत्तात्रेयांनी श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने देहधारण करून संत, महात्मे, अवतारीपुरुष या रूपाने जे कार्य या भूतलावर केले त्याची शास्त्रीय चिकित्सा केली असता श्रीस्वामीमहाराजांच्या स्वरूपाचा व तदंगभूत प्रयोजनाचा उत्तम परिचय आपल्याला झाल्याशिवाय राहणार नाही. हे पाहत असताना विषयान्तर होत असले; तरी विषयानुरोधाने याचा परिचय करून घेणे आवश्यक आहे; कारण याशिवाय श्रीस्वामीमहाराजांच्या स्वरूपाच्या व जीवनधारणेच्या प्रयोजनान्तर्गत प्रवेश करून घेणे कदापीही शक्य होणार नाही.

या दृष्टीने " भारतीय संस्कृति और साधना " खण्ड दुसरा, या ग्रंथातील " सन्त परिचय " या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी या विषयाचे जे स्पष्टीकरण केले आहे ते मोठे उद्‌बोधक आहे. ते असे म्हणतात की, " सन्त कोणाला म्हणतात ? सन्त जीवनाचा वास्तविक आदर्श काय आहे ? आणि कोणकोणत्या

बाह्य व आभ्यन्तरिक लक्षणांच्या द्वारा संतभावाचा यथार्थ परिचय प्राप्त होऊ शकतो ? अशा प्रकारचे प्रश्न बहुतेकांच्या मनात उत्पन्न होतात. संसारतापाने तप्त झालेला मनुष्य नित्य आनंद आणि पराशक्तीच्या स्निग्ध छायेत विश्राम करण्याकरिता नेहमीच आसुसलेला असतो; परन्तु प्रवृत्तीचे तडाखे आणि बाह्य वासना शान्त झाल्याशिवाय चित्त अन्तर्मुख होत नाही आणि त्यामुळेच जरी शान्तीची इच्छा व आकांक्षा असली तरी बाह्य मोहामुळे ती इच्छा व आकांक्षा उत्तमरीतीने प्रकाशित होऊ शकत नाही. जेव्हा सांसारिक भोगांविषयी वैराग्य होते आणि चित्त निवृत्तिमुखी होऊन अन्तर्जगताच्या तत्त्वाच्या शोधात व्यग्र होते तेव्हा या जगताचे रहस्य शोधण्याकरिता प्रथप्रदर्शक सन्ताचे किंवा साधूचे आपणास दर्शन व्हावे व त्याचा अनुग्रह किंवा दीक्षा होऊन जीवन कृतार्थ व धन्य व्हावे म्हणून चित्तात व्याकुळता उत्पन्न होते. अशा अवस्थेत संतांचा परिचय आणि संतांची लक्षणे जाणण्याची तीव्र इच्छा अन्तःकरणात स्वाभाविकपणेच उत्पन्न होते. ही कोणत्याही विशिष्ट देशातील किंवा विशिष्ट कालातील गोष्ट नसून प्रकृतीच्या नियमानुसार सर्व कालात व सर्व देशात असे घडत असते. आपण लोक बाह्य गोष्टी पाहून अथवा बाह्य व्यवहाराचा विचार करून एखाद्या सर्वसाधारण मनुष्यालाही चांगल्या प्रकारे समजू शकत नाही; कारण की, ज्या जटिल शक्तींच्या प्रेरणेने मनुष्य एखादे विशेष कार्य करण्यास उद्युक्त होऊन ते करतो किंवा असे कार्य करणे त्याला भाग पडते, त्याचे स्वरूप आणि प्रभाव व्यवस्थितपणे लक्षात आल्याशिवाय कार्याच्या अथवा आचरण्याच्या नैतिक दायित्वाच्या विषयी निर्णय करणे शक्य होत नाही.

साधारण मनुष्य स्थूल अभिनिवेशाने बद्ध झालेला असल्यामुळे

त्याच्या कार्याचे विस्तारक्षेत्र अत्यन्त संकुचित असते; परन्तु जे महापुरुष असतात त्यांच्यावर अलक्ष्य शक्तिपुंजाचा प्रभाव सामान्यांपेक्षा अधिकच व्यापकरूपाने पडत असल्यामुळे त्यांना उत्तम प्रकारे जाणून व समजावून घेणे हे अधिकच दुःसाध्य होते. याकरिता आपल्या शास्त्रकारांनी "लोकोत्तर महापुरुषांच्या जीवनाचे सामान्य लोकांनी अनुकरण करू नये," असा सिद्धान्त प्रस्थापित केला आहे. ज्या निगूढ उद्देशाच्या सिद्धीकरिता एखादा महापुरुष कोणते तरी विशेष कार्य करतो, त्या कार्याचे अनुकरण करण्याचा प्रयत्न करणे एखाद्या क्षुद्रशक्ती व अल्पज्ञ अशा प्राकृत मनुष्याच्या दृष्टीने उपहासास्पद आणि हानिकारकच होते. त्यामुळे संतांचा, महापुरुषांचा अर्थात् अवतारी पुरुषांचा परिचय प्राप्त करून घेणे ही काही सामान्य गोष्ट नाही. ज्यांची अन्तर्दृष्टी उघडली आहे व जे स्वतः संतभावावर आरूढ होऊ लागले आहेत ते निश्चितपणे आपल्या स्वाभाविक विवेकशक्तीच्या द्वारा असत्याला सत्यापासून निराळे करून सत्य ग्रहण करू शकतात. त्यांच्या बाबतीत लक्षणनिर्देशाची किंवा त्यांच्या स्वरूपवर्णनाची आवश्यकता असत नाही; परन्तु साधारण माणसाकरिता त्यांच्या परिचयाची नितान्त आवश्यकता आहे असे लक्षात येते. ज्यांचा आश्रय घेऊन आपण अन्धकारातून ज्योतिर्मय राज्यात प्रवेश करण्याची आणि सिद्धी प्राप्त करण्याची इच्छा करतो, ते जर स्वतःच अपेक्षित आधाराने संपन्न नसतील तर अशा तथाकथित ( म्हणजे ज्यांना त्यांच्या श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी दीक्षा देण्याचा अधिकार दिला नसताना जे दीक्षादि देतात व जे जबरदस्तीने आपल्या बळाच्या जोरावर अर्थप्राप्तीसाठी दीक्षा देऊन अर्थप्राप्ती करतात त्या ) पुरुषांच्या

आश्रयाने आपली हानी होण्याशिवाय दुसरी कोणतीही इष्टसिद्धी होऊ शकत नाही; कारण शास्त्रकारांनी " अन्धेस्यैवान्धलग्नस्य विनिपातः पदे पदे।" म्हणजे अन्धळ्याला पकडून चाललेला अंधळा हा पावला–पावलावर पडतो, असे सिद्धान्तरूपाने कथन केले आहे.

खरोखर सन्त कोणाला म्हणतात? ज्यांनी सत्यस्वरूप अशा नित्यसिद्ध वस्तूचा साक्षात्कार करून घेतला आहे किंवा ज्यांनी अपरोक्षरूपाने ब्रह्मप्राप्ती केली आहे आणि या प्राप्तीचे फळ म्हणून जे अखण्ड सत्यस्वरूपात प्रतिष्ठित झाले आहेत तेच सन्त आहेत. आत्मा हा ब्रह्माशी अभिन्न आहे अथवा तो ब्रह्मापासून भिन्न आहे या विषयावर विचार करण्याचे येथे कारण नाही; परन्तु विकल्पभूमीत भेद, अभेद, अवस्था व अधिकारानुसार सर्वांना सत्य समजाविणे शक्य होते. या दृष्टीने ज्यांनी ब्रह्म किंवा आत्म्याच्या सर्व अवस्था साक्षात् रूपाने जाणून तदनुरूप स्थितीची प्राप्ती केली आहे तेच सन्त आहेत.

सन्तांच्या या प्रकारच्या संक्षिप्त परिचयामुळे ही गोष्ट लक्षात येते की, आत्मा किंवा ब्रह्माच्या परमभावात स्थिती प्राप्त केल्या-शिवाय यथार्थ रीतीने कोणीही संतपदाला योग्य ठरू शकत नाही. अनन्त शक्ति-शालिनी व अनन्तरूप अशा प्रकृतीच्या माहात्म्यामुळे बहिर्दृष्टीने सन्त हे असन्ताच्या रूपात दृष्टीस पडतात. परन्तु या बाह्य रूपांच्या द्वारा संतांची खरी ओळख होऊ शकत नाही. महापुरुषांपैकी कोणी जडवत्, कोणी उन्मत्तवत् आणि कोणी कदाचारी पिशाच्चा-प्रमाणे जगतात व विचरण करीत असतात. अशा अवस्थेत बाह्य-दृष्टीने सन्तांचे स्वरूप ओळखणे असम्भव आहे असे म्हटले तर काहीच अतिशयोक्ती होणार नाही. लौकिक व्यवहाराकरिता शास्त्रां-मध्ये साधूची लौकिक लक्षणे सांगितली आहेत; परन्तु शास्त्राच्या

द्वारा या कार्यक्षेत्रात कोठपर्यन्त तत्त्वनिर्णय होणे शक्य आहे, ही गोष्ट ज्यांनी कधी त्या गोष्टीची परीक्षा केली आहे, तेच सांगू शकतील. मात्र ज्यांची अन्तर्दृष्टी उघडली नाही त्यांच्या बाबतीत या लक्षणांचा प्रयोग करणे असम्भव आहे.

सन्त जीव कोटीत आहे किंवा ईश्वर कोटीत आहे या दृष्टीने विचार व परीक्षण केल्याने कोणताच फायदा होणार नाही. काही काही लोक संत हे वास्तविकपणे या दोन्ही कोटींपासून मुक्त आहेत असे सांगतात आणि त्यांचे हे सांगणे कोणत्याच प्रकारे असंगत नाही; कारण की, जे निर्गुण परमपदात प्रतिष्ठित झाले आहेत त्यांना वास्तविकपणे जीव किंवा ईश्वर असे काहीही म्हणता येत नाही. आपल्या देशात कबीर आदि निर्गुण सम्प्रदायामध्ये संतांचे स्थान हे फार उच्च आहे असे सांगितले आहे. काही काही लोक असे मानतात की, केवळ सत्य, ज्ञान आणि आनन्दात स्वतः प्रतिष्ठित होणे हा काही सन्तभावाचा पूर्ण आदर्श नाही; कारण की, दुसऱ्यांमध्येही सत्य, ज्ञान आणि आनन्दाचे स्फुरण होणे हे ही या आनन्दाच्या स्थितीमध्ये येते. याचा अर्थच असा आहे की, जो स्वतः सत्यात प्रतिष्ठित होऊनही दुसऱ्यांना सत्यात प्रतिष्ठित करण्याची इच्छा करीत नाही, करू शकत नाही किंवा करीत नाही, तो सन्ताचा पूर्ण आदर्श नाही. ज्ञान व आनन्दाच्या बाबतीतही हीच गोष्ट खरी आहे. दुसऱ्या प्रकाराने असे म्हणता येईल की, सत्य, ज्ञान आणि आनन्द प्राप्त करणे हेच केवळ मनुष्य जीवनाचे सर्वश्रेष्ठ उद्दिष्ट नसून त्या सर्व गोष्टी प्राप्त करून सर्व जगताला त्या सत्य, ज्ञान आणि आनन्दात प्रतिष्ठित करणे हेच मनुष्य जीवनाचे एकमात्र लक्ष्य आहे. परिच्छिन्न म्हणजे संकुचित जीवभावापासून क्रमशः अपरिच्छिन्न म्हणजे असंकुचित अशा शिवभावापर्यंन्त अग्रेसर होणे हेच महा-

पुरुषांच्या जीवनाचे यथार्थ लक्षण आहे. लोकोत्तर पुरुष स्वभावाच्या नियमानुसार अनादि कालापासून या आदर्शाचे अनुसरण करीत आले आहेत आणि कदाचित् अनियत कालपर्यन्त करीत राहतील. साधारण मनुष्य संकुचित फलाची इच्छा करून कर्मक्षेत्रात अग्रेसर होतात; परन्तु महापुरुष स्वाभाविकपणेच क्रमशः होणाऱ्या आत्मविकासाला अनुकूल असे आचरण करीत असतात.

स्थूल, सूक्ष्म आणि कारण जगत् हे परस्पर संबंधाने जुळलेले असल्याने कारण जगतापासून स्थूल जगताचे नियंत्रण होते. साधारणपणे अवतारादि कारण जगतातूनच प्रयोजनानुसार स्थूल जगतात अवतीर्ण होतात. अशा रीतीने संत पुरुष हे एक प्रकारे कारण जगताचे रहिवासी असल्यासारखे प्रतीत होत असले; तरी ते कारण जगताच्याही अतीत आहेत. येथूनच ऐश्वरिक शक्तीची धारा जीवाच्या प्रयोजनाच्या सिद्धीकरिता त्याच्या अवस्थेनुसार प्रवाहित होते अर्थात् जीवाच्या धारणाभेदानुसार शक्तीच अवतारी पुरुषांच्या द्वारा विभिन्न साधने प्रकट करीत ती जीवांना प्रदान करून त्यांना मोक्षप्राप्ती करून देतात. संत हे ऐश्वरिक भूमीच्या अन्तर्गतच आहेत असे समजल्यामुळे त्या कारण जगताचे रहिवासी मानणे भाग पडते आणि अनेक कारणांमुळे बहुतेक लोक हे बरोबर आहे असेच सांगतात; परन्तु सन्तांचे जीवन हे त्यांच्या जीवनाच्या प्रयोजनाच्याही वरच्या पातळीवर असलेल्या एकमात्र अशा स्वभावाच्या प्रेरणेनेच नियमित होते. या दृष्टीने पाहिले तर संतांना वस्तुतः कारण जगताच्या अन्तर्गत समजणे योग्य आहे असे वाटत नाही. स्थूल, सूक्ष्म आणि कारण जगत् ही सर्व मायेच्या अन्तर्गत आहेत, त्यामुळे स्वभावात म्हणजे परब्रह्मभावात स्थित असलेल्या मायातीत अशा संतांना किंवा अवतारी महापुरुषांना कारण

जगताच्या बरोबर ते सम्बन्धित आहेत असे न मानणे हेच युक्तिसंगत आहे असे वाटते. दुसऱ्या दृष्टीने असे म्हणता येईल की, सन्तांच्या जीवनात जो आत्मविकास होतो तो जरी कर्मफलभोगाच्या धारेनुसार होत नसला व ते मायातीत असले तरी ते महामायेच्या अन्तर्गतच आहेत असे म्हणणे शक्य आहे आणि जर एकच पूर्णसत्तेच्या स्वाभाविक स्फुरणामध्ये महापुरुषांचे जीवन सम्मिलित आहे असे मानले तर मग पुन्हा स्थूल, सूक्ष्म आणि कारण इत्यादींचा विचार करण्याची काहीच आवश्यकता राहात नाही; कारण की, पूर्णामध्ये सर्व काही आहे आणि काहीही नाही आहे.

ज्यांनी सत्याची प्राप्ती केली आहे, ते समर्थ असले तर आणि त्यांना आवश्यकता वाटली तर ते दुसऱ्यांना उपदेश देतात. हा उपदेश श्रेष्ठ अशा अधिकारी साधकाला प्रातिभ ज्ञानाच्या रूपात दिला जातो. हे प्रातिभ ज्ञान साधकाच्या हृदयामध्ये आपले आपणच उत्पन्न होते. हे प्रातिभ ज्ञान अनौपदेशिक असले; तरी एक प्रकारे ते उपदेशरूपच असते. बाह्य शब्दाचा आश्रय घेऊन या प्रातिभ ज्ञानाला अन्यत्र संचारित करण्याचे कारण पडत नाही. अशा प्रकारे विशुद्ध ज्ञानाच्या द्वाराच हृदयातील अर्थात् अन्तःकरणातील सर्व संशय सम्यक् रीतीने मिटून जातात. "गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यः संच्छिन्नसंशयः ॥" या शास्त्रकारांच्या सिद्धान्ताचेही हेच तात्पर्य आहे.

अवतारी संत-महात्मे-महापुरुष मध्यम अधिकारी साधकाला विशुद्ध चेतनाबरोबर उपदेश देतात. या चेतन शब्दात इतके सामर्थ्य असते की, तो शब्द कानामध्ये प्रवेश करताच तो मर्मस्थानात प्रविष्ट होतो आणि तो साधकाच्या हृदयाला अनन्यसाधारण अर्थात् तीव्र रूपाने आन्दोलित करतो. हा शब्द ऐकल्यानन्तर बाह्य जगतासंबंधीं

साधकाला आकर्षण राहू शकत नाही. त्यावेळी मन, प्राण आणि सर्व इन्द्रिये एकीभूत होऊन अत्यन्त प्रबल वेगाने आणि उद्दाम स्रोताने अर्थात् प्रवाहाने अन्तरात्म्याशी मिळून एकरूप होण्यासाठी धावत सुटतात. श्यामसुंदर श्रीकृष्णाच्या मुरलीचा ध्वनी ऐकल्यावर राधेचा किंवा अन्य गोपिकांचा भाव कसा होत होता या गोष्टीचे वैष्णव महापुरुषांनी आपल्या पदावलीमध्ये कवितेच्या द्वारा संक्षेपाने सांगितले आहे. तन्त्रशास्त्रातील मन्त्रचैतन्याची व्यवस्था सुद्धा याकरिताच आहे; कारण की, शब्द चेतन केल्याशिवाय त्या शब्दाच्या साहाय्यतेने परब्रह्माचा साक्षात्कार करणे ही नितान्त अशक्य अशी गोष्ट आहे. याचे एकमात्र कारण असे आहे की, अचेतन शब्दाला शब्दब्रह्म म्हणंता येणे शक्य नाही. पृथ्वीवरील सर्व धर्म-संप्रदाया-मध्ये ही चैतन्याची गोष्ट अत्यन्त गंभीरतेने कथन केलेली आहे. शब्द चेतन झाला की, कुण्डलिनी शक्ती जागृत झाली असेच म्हणणे योग्य आहे. अचेतन शब्दाचा वारंवार जप करण्याच्या एका विशेष प्रक्रिये-द्वारा अत्यन्त परिश्रमाने तो शब्द चेतन केला जाऊ शकतो. सन्त, महात्मे व अवतारीपुरुष यांनी इच्छा केल्यावर ते साक्षात् रूपाने चेतन शब्दाचा प्रयोग करू शकतात. ही मध्यम अधिकारी साधकाची गोष्ट आहे.

जो साधक अधम अधिकारी असतो त्याला सन्त–महात्मे–अवतारी पुरुष हे अचेतन शब्दाच्या द्वाराच उपदेश देतात. मात्र अशा प्रकारे उपदेश करताना ते त्या साधकाला अशा प्रकारची एखादी क्रिया सांगतात की, जी केली असता तो अचेतन शब्द क्रमशः चेतन शब्दाच्या रूपात परिणत होतो. काही विशेष अव-स्थेत क्रियाकौशल्याशिवाय दीर्घकालीन विचारादि चिन्तन, मनन व निदिध्यासनाच्या प्रभावामुळे अथवा अन्य दुसऱ्याही कारणांनी

तीव्र संघर्षवशतेमुळे अचेतन शब्द चेतन शब्दाच्या रूपात प्रस्फुटित होऊ शकतो.

अशा प्रकारे नाना प्रकारच्या उपायांनी शब्द जागृती म्हणजे कुण्डलिनी शक्तीचे जागरण होऊ शकते. व्यवहारभूमीच्या दृष्टीनें पूर्वजन्मार्जित संस्कारांच्या तारतम्यानुसार कोणाकोणाला साधन-भक्ती, कोणाकोणाला श्रवण, मननादि ज्ञानमार्गाचे अनुष्ठान आणि काहीकाहींना हठयोग, मन्त्रयोग अथवा राजयोगाचा दिर्घकाल-व्यापी अभ्यास या जागृतीला अनुकूल असे साधन म्हणून निश्चितच करावा लागतो. चित्ताची शुद्धी करणारी सर्व कर्मे ही कुण्डलिनी शक्ती जागृत होणाऱ्या साधनांच्या अन्तर्गतच आहेत, हे लक्षात घेतले पाहिजे. भिन्न भिन्न धर्मसम्प्रदायांमध्ये भिन्न भिन्न प्रकारच्या अनुष्ठानांचा आणि ध्यानादींचा जो निर्देष केला गेला आहे, त्या सर्वांचा उद्देश्य कुण्डलिनी शक्तीची जागृती हाच असतो, मग तो कळत असो अगर नकळत असो. या सर्व विवेचनाचे तात्पर्य हेच आहे की, कोणत्याही उपायाने का होईना जीवाला मायिक स्वप्नातून आणि निद्रेतून जागृत होऊन अर्थात् आत्मशक्ती कुण्डलिनी जागृत करून सत्याच्या मार्गात म्हणजे सुषुम्नापथात पदार्पण करावेच लागेल. विक्षिप्त भूमीपासून आपल्या वृत्तींना माघारी फिरवून त्यांना एकाग्रभूमीत स्थापित करावे लागेल. कुण्डलिनी शक्तीला किंवा शब्दाला चैतन्ययुक्त करण्याचा हाच एकमात्र मार्ग आहे. जगातील भिन्न भिन्न उपायांच्या वैचित्र्यामध्ये अनादिनिद्रिस्त आत्मशक्ती कुण्डलिनी जागृत करून सामरस्यावस्था प्राप्त करणं हाच एकमात्र मार्ग आहे असेच दृष्टिगोचर होते.

जोपर्यंन्त आत्मशक्ती कुण्डलिनीरूपी महाशक्ती ही सत्यमार्गाला आच्छादून घोर निद्रेत निमग्न झालेली असते, जोपर्यन्त जीव जड-

भावयुक्तच राहतो आणि शिव शवरूपात निष्क्रिय होऊन मृतवतच राहतो तोपर्यंन्त खोटचाचा प्रकोप अर्थात् क्षोभ, मायेचे प्रलोभन आणि विचित्र प्रपंचाची मोहिनी शक्ती प्रकट होतच राहते. कुण्डलिनी शक्ती जागृत झाली की, जीवाची घोर निद्रा तुटून जाते आणि जीव आपल्या स्वरूपाचे दर्शन घेण्यास समर्थ होतो. या आत्मशक्तीचे पूर्ण जागरण झाल्यावर जीवाच्या जडत्वाचा परिहार होऊन तो शिवत्व प्राप्त करतो अर्थात् त्याची अन्तर्निहित महाशक्ती जागृत होऊन नित्य जागृत अशा परशिवाबरोबर मिलन होण्यासाठी धावत सुटते. असे असले; तरी शिवशक्तीचे पूर्णपणे मिलन होण्यासाठी निश्चितपणे दीर्घकालाची आवश्यकता असते यात काहीच शंका नाही. एका दृष्टीने आत्मदर्शन झाल्याशिवाय या मिलनाची सुरवात होत नाही आणि दुसऱ्या दृष्टीने अशा प्रकारे पूर्ण मिलन झाल्याशिवाय सम्यक् प्रकाराने आत्मदर्शन होऊ शकत नाही. जर साधननिष्ठ वाचक या संबंधी विचार करतील तर त्यांना उपरोक्त कथनातील सत्यतेचा अनुभव येऊ शकेल. शिवशक्तीचे मिलन होऊन ते एकाच अद्वय ब्रह्मरूपात प्रकाशित झाल्यावर ब्रह्मपथाचा प्रारंभ होतो, असे म्हटले जाऊ शकते. यानन्तर असंख्य विचित्र अवस्थांमधून पुढे जाता जाता साधक जीवाला भगवन्ताच्या अप्राकृत नित्यलीलेमध्य प्रवेश करण्याचा अधिकार प्राप्त होतो. त्यानन्तर या लीलेच्या पलीकडे निरंजन आणि निष्कल तत्त्वाचे किंवा तत्त्वा तीताचे संधान आभासरूपाने प्राप्त होते. या अवस्थेचे वर्णन करणे शक्य नाही.

एक अखण्ड ब्रह्म आत्मविकासानुसार पाहिल्यावर साधकाला ते प्रथम सत्यरूपाने, नन्तर चिद्घनरूपाने आणि शेवटी आनन्दमय सत्तेच्या रूपाने प्राप्त होते. कुण्डलिनी जागृतीनन्तर त्याचे फल म्हणून

ज्या नित्य सत्तेची प्रतिष्ठा प्राप्त होते आणि ज्या स्थितीपासून कोणत्याही कारणामुळे खरे पाहता च्युत होण्याची शक्यता राहात नाही त्या स्थितीला किंवा अवस्थेला सत्याची स्थिती किंवा अवस्था असे समजले पाहिजे. या अवस्थेत साधक शान्त पदावर प्रतिष्ठित होऊन असे पाहू शकतो की, तो घोर अशा कल्लोळयुक्त अनन्त-प्रसारित मायातरंगाच्या उच्च स्थानावर आरूढ होऊन स्थिर झाला आहे. या अवस्थेच्या प्राप्तीबरोबरच आत्मदर्शनाची सूचना मिळत असल्यामुळे चैतन्यभावाचा उन्मेष होत राहतो आणि त्यानन्तर शिवशक्तीच्या मिलनाच्या अवस्थेपासूनच आनन्दाचा सूत्रपात होतो. शिव आणि शक्तीचे मिलन पूर्ण झाल्यावर साधकाच्या ठिकाणी जी ब्रह्मभावाची प्रतिष्ठा होते त्यालाच लौकिक भाषेत ब्रह्मानन्द असे म्हणतात. त्यानन्तर नित्यलीला व निरंजनपद असून ते प्राकृतिक बुद्धीला सर्वार्थाने अगोचर असल्यामुळे त्याचे वर्णन करणे शक्य व योग्य नाही.

ज्यांनी साधनबलाने, पूर्व पुण्याईच्या प्रभावाने आणि श्रीसद्‌गुरूंच्या कृपाकटाक्षाने या सर्व स्तरांचा भेद करून परमभावाची प्राप्ती केली आहे आणि जे अहेतुक करुणेच्या द्वारा निरन्तर जगताचे कल्याण करण्यात मग्न झाले आहेत तेच संत व साधू आहेत. या पदाच्या तुलनेमध्ये मोठमोठ्या देवतांचे पदही अत्यन्त तुच्छ असे समजले जाते. यामुळे बाह्य किंवा आन्तर अशा कोणत्याही लक्षणांच्या द्वारा वास्तविक सत्पुरुषाचा यथार्थ परिचय होऊ शकत नाही.

येथे एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे की, ज्याप्रमाणे शास्त्राचा अभ्यास न करता आणि दुसऱ्यांकडून कसलेही वर्णन न

ऐकता शिशू सहजज्ञानाने आपल्या आईला ओळखू शकतो त्याप्रमाणे ज्यावेळी सत्य प्राप्ती व्हावी म्हणून अत्यन्त प्रबळ इच्छा जागृत होते त्यावेळी सहजपणे सत्याचा परिचय प्राप्त होतो. त्याकरिता शास्त्रीय लक्षणे त्याच्याशी जुळवून पाहण्याची आवश्यकता असत नाही. ज्याप्रमाणे जे लोक सत्यप्राप्ती व्हावी म्हणून जिज्ञासू नसतात, ते त्या ज्ञानप्राप्तीचेही अधिकारी असत नाहीत त्याप्रमाणेच ज्यांना अंतःकरणापासून सत्यप्राप्तीची तीव्र तहान लागलेली नसते ते कधीही सत्य प्राप्ती करू शकत नाहीत. जे यथार्थपणे व्याकूळ होऊन सत्याचा शोध घेतात त्यांच्या समोर सत्यस्वरूप भगवान् कधीही लपून राहू शकत नाही. अशा स्थितीत साधकाच्या अधिकारानुसार भगवान् त्याच्या समोर स्वतःचे स्वरूप प्रकट करतात आणि साधकही स्वाभाविक ज्ञानाच्या प्रभावाने भगवन्ताला ओळखून निरन्तर धन्य व कृतार्थ होतो."

उपरोक्त लेखातील ७ व्या व १० व्या परिच्छेदाचे मनन केल्यास श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या जीवनाचे प्रयोजन कसे सिद्धीस नेले याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. या दृष्टीने श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या सर्व ग्रंथात परार्थाच्या दृष्टीने प्रकट केलेला योगाचा व ज्ञानाचा महिमा पाहिला म्हणजे मन स्तिमित झाल्याशिवाय राहात नाही. मुख्यतः योग म्हणजे चित्तवृत्तिनिरोध, चित्तसमाधान व चित्तैकाग्र्य असून वेदान्तशास्त्राचे अर्थात् ज्ञानाचे ते अन्तरंग साधन आहे. त्याचे वेदान्ताला वावडे नाही. योग ज्ञानासाठीही पाहिजे व ज्ञानानंतर जीवन्मुक्तीसाठीही पाहिजे. मात्र वेदान्तशास्त्र अनुभवगम्य होण्यासाठी श्रीसद्गुरूंनी शक्तिपात म्हणजे कृपा ही केलीच पाहिजे. श्रीस्वामीमहाराजांची आपल्या अवतारहेतूच्या पूर्तीसाठी अशीच धारणा होती. या दृष्टीनेच त्यांनी

आपल्या "वृद्धशिक्षा" या वेदान्त ग्रंथात "विशारदं ब्रह्मनिष्ठं श्रोत्रियं गुरुमाश्रयेत् ॥६॥" असे सांगितले असून त्यावर स्वतःच टीका करताना त्यांनी असे म्हटले आहे की, "श्रोत्रियम् अर्थात् शब्द-ब्रह्मनिष्णातम्, ब्रह्मनिष्ठम्–संजाता परोक्षसाक्षात्कारम्, विशारदं-लौकिकादि दृष्टान्तो–पपत्यादिना शक्तिपातेन च वाक्यार्थग्राहयितारं गुरुं आश्रयेत ॥" याचा अर्थ असा आहे की, ("सुख पाहतां जवापाडें। दुःख पर्वताएवढें ॥" या श्रीसंत तुकाराममहाराजांनी सांगितलेल्या न्यायाने सर्व प्रपंच दुःखमयच आहे. त्यामुळे अत्यन्त प्रिय असणारा कर्मकांडात्मक प्रवृत्तिमार्ग वैराग्यपूर्वक सोडून स्वार्थ-साधनतत्पर अशा मुमुक्षूने) शब्दब्रह्म व परब्रह्मात निष्णात आणि लौकिक दृष्टान्तादिकांनी व शक्तिपाताने म्हणजे कृपेने सर्वानर्थमूळ अज्ञान निवृत्त करण्यास समर्थ अशा श्रीसद्गुरूंचा आश्रय करावा असे ठरते.

याचप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या "द्विसाहस्रीगुरु-चरित्र" या ग्रंथात श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांनी स्वतः स्थापन केलेल्या पादुकांचे वर्णन करताना असे म्हटले आहे की–

कृष्णावेणीपंचनदीसंगमं सुमनोहरम्।
अष्टतीर्थान्वितं पुण्यं दृष्ट्वा तस्थौ परे तटे ॥ ११.११ ॥

याचा स्थूलार्थ असा आहे की, अत्यन्त मनोहर अशा कृष्णावेणी-युक्त पंचगंगा नद्यांच्या संगमावर व अष्टतीर्थांनी युक्त अशा पुण्य-स्थानाच्या परतीरावर भगवन्ताच्या पादुका आहेत. त्यांच्या दर्शनाने मनुष्य मुक्त होतो.

श्रीस्वामीमहाराजांनी सर्वसामान्य माणसासाठी पादुकांचे हे स्थूलरूप स्पष्ट केले असले; तरी या श्लोकावर टीका करताना मात्र त्यांनी त्याचा परार्थ स्पष्ट करून योगी स्वदेहातील पादुकांचे

पूजन करून सहस्रारात जाऊन मुक्त कसे होतात हे सांगताना असे म्हटले आहे की, "यथाष्टप्रकृत्यन्विते देहे चिच्छक्तिजीवशक्त्योर्योगे पंचनदीसंगमाख्य आज्ञाचक्रे सुतरां मनोहरं स्थलं दृष्ट्वा योगी ततः परे तटे ब्रह्मरन्ध्रे गतिनिवृत्तिं कुरुते ॥" याचा अर्थ असा आहे की, "अष्टप्रकृतियुक्त देहातील चिच्छक्ती कुण्डलिनी हीच जीवशक्ती असून तिच्या साहाय्याने योगी इडा, पिंगला, सुषुम्णादि पंचनाड्या-रूप नद्यांच्या संगमाप्रमाणे असलेल्या आज्ञाचक्रातील अत्यन्त मनोहर पादुका पाहून नन्तर परतटावर म्हणजे ब्रह्मरन्ध्रातील सहस्रारात आपल्या साधनाची गती संपवून तेथेच परपादुकात स्थिर राहतो."

अशा प्रकारे ज्या शक्तिपातयोगदीक्षेने साधक आपल्या आत्म-स्वरूप प्राप्तीच्या मार्गावरून चालत जाऊन सहस्रारात शिवाशी एकरूप होतो किंवा समरस होतो, ती दीक्षा अर्थात् श्रीगुरुकृपा कशी होते अर्थात् त्याची शास्त्रीय प्रक्रिया काय आहे याचा विचार परिशिष्ट क्रमांक दोनमध्ये श्रीस्वामीमहाराजांचे लोकोत्तर शिष्य व माझे हृदयस्थ श्रीसद्गुरुनाथ संतश्रेष्ठ महासिद्धयोगी श्रीगुळवणी-महाराज यांचा लेख देऊन प्रस्तुत केला आहे, तो वाचकांनी अवश्य पाहावा.

अशा रीतीने उपरोक्त प्रकारे वर्णन केलेल्या आपल्या अवतार-कार्याच्या प्रयोजनाची सिद्धी करण्याकरिता श्रीपादश्रीवल्लभांच्या आज्ञेप्रमाणे श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र कुरवपूर येथे आल्यावर प्रथम श्रीपादश्रीवल्लभांच्या पादुकांना वंदन करून तेथे राहिले. श्रीस्वामी-महाराज ज्यावेळी येथे आले त्यावेळी या स्थानात फारच थोडे सेवेकरी होते व आताही त्या स्थितीत विशेष काहीच फरक नाही. त्याचप्रमाणे गावात पुजारी व कुलकर्णी अशी ब्राह्मणांची दोनच घरे होती. खरे पाहता सहाशे वर्षांपूर्वी ज्यावेळी श्रीपादश्रीवल्लभ येथे

आले त्यावेळी श्रीक्षेत्र कुरवपूर हे एक अत्यन्त संपन्न असे गाव होते; कारण श्रीगुरुचरित्र ग्रंथात १० व्या अध्यायात श्रीवल्लभेशाची जी कथा आली आहे त्यातील उल्लेखावरून चार हजार ब्राह्मण, भोजन घालण्यासाठी त्यावेळी तेथे मिळत होते हे स्पष्ट होते. त्याचप्रमाणे संस्कृत, तेलगू व कानडी या भाषेत त्या ठिकाणी व्यवहार चालत असत. त्यावेळी या गावात ब्राह्मणआळी, सराफआळी अशा सारखे एक एक भाग त्या त्या व्यवसायांच्या लोकांचे होते. त्याचप्रमाणें अग्निहोत्री, वैदिक, शास्त्री, पुराणिक वगैरे भिन्न भिन्न प्रकारचा ब्रह्मवृंद त्यावेळी येथें वस्ती करून राहिला होता. ज्यावेळी श्रीपाद-श्रीवल्लभ आपल्या अवतारकार्याच्या अखेरच्या काळात श्रीक्षेत्र कुरवपूर येथें आले त्यावेळी त्यांच्यासाठी त्यांच्या भक्तमंडळींनी येथेंच मठ बांधला. या ठिकाणी काही काळ वास्तव्य करून पूर्व नियोजित साधकभक्तांना दीक्षा झाल्यावर अश्विन वद्य १२ ला अर्थात् श्रीगुरुद्वादशीला ते येथें गुप्त झाले.

श्रीपादश्रीवल्लभ या श्रीक्षेत्रातून तिरोहित झाल्यानन्तर हळूहळू ब्रह्मवृंदांची वस्ती उदरनिर्वाहार्थ इतर शहरी जाऊ लागली व तेथील वस्तीही कमी होऊ लागली. तेथील घरेही कालौघात पडून नाहीशी झाली. असे होता होता श्रीशके १८०० म्हणजे इ. स. १८७८ च्या सुमारास सर्व ब्राह्मणमंडळी तेथून बाहेर पडल्यामुळे श्रीस्वामीमहाराज शके १८३३ म्हणजे इ. स. १९११ मध्ये श्रीक्षेत्र कुरवपूर येथे ज्यावेळी आले त्यावेळी श्रीपादश्रीवल्लभांची पूजा अर्चा करणाऱ्यांचे फक्त एकच घर तेथे शिल्लक राहिले होते.

या पुजारी घराण्यातील कर्तबगार पुजारी ज्यावेळी कालवश झाले त्यावेळी त्यांना तीन मुलगे होते. त्यातील थोरल्या मुलाचे नाव श्री. भीमभट असून दुसऱ्याचे नाव श्री. शेषभट व धाकट्याचे नाव

श्री. वल्लभभट असे होते. ही तिन्हीही मुले श्रीपादश्रीवल्लभांची मनोभावे सेवा करीत असत. मात्र इतक्या लांबच्या व अडचणीच्या भागात आपली मुलगी देण्यास कोणी तयार होत नव्हते. त्याचप्रमाणे आसपास दुसरी ब्राह्मणवस्ती नसल्यामुळे श्री. भीमभट व श्री. शेषभट यांना ब्रह्मचारीच राहावे लागले. पुढे एका गृहस्थाने मोठे धारिष्ट करून आपली मुलगी श्री. वल्लभभटांना दिली. परंतु काही दिवसांनी श्री. वल्लभटांची पत्नी पुत्रप्राप्ती न होताच इहलोकीची यात्रा संपवून निघून गेली. अशा प्रकारे घरात बाई माणूस न राहिल्यामुळे या तिन्हीही पुजाऱ्यांच्या आचारात शिथिलता येत येत शेवटी त्या सर्वांचा अगदी शूद्रवत् असा आचार सुरू झाला.

अशा स्थितीत श्रीस्वामीमहाराजांची पहिल्या दिवशी भिक्षा झाली; परन्तु येथे ब्राह्मणांची दोनच घरे असल्यामुळे दुसऱ्या दिवशी त्यांना उपोषण घडले. याशिवाय पुजाऱ्यांचा तो शूद्रवत् आचार पाहून श्रीस्वामीमहाराजांना तेथे राहावेसे वाटेना. एकीकडे देवांच्या आज्ञेप्रमाणे आपण येथे आलो असल्यामुळे त्यांची आज्ञा नसताना व ती घेतल्याशिवाय हे स्थान कसे सोडून जावे? हा प्रश्न त्यांच्या मनात उभा राहात होता; तर दुसरीकडे पुजाऱ्यांचे आचारशून्य वर्तन सहन करून व त्यांच्या हातची भिक्षा घेऊन येथे राहणे कसे शक्य आहे? या विचाराने त्यांचे मन व्यापृत झाले होते. अशा प्रकारे कधी नव्हे ती द्वंद्वात्मक अवस्था उत्पन्न होऊन त्याचा निर्णय न होताच श्रीस्वामीमहाराज रात्री झोपले.

त्या दिवशी श्रीपादश्रीवल्लभ ब्रह्मचारी वेषाने श्रीस्वामीमहाराजांच्या स्वप्नात आले व त्यांनी त्यांना असे सांगितले की, "ही भूमी रजकभक्ताने मला दिली आहे. याच्या उत्पन्नातूनच येथील नैवेद्य व नंदादीप चालू आहे. त्यामुळे आपणास येथे भिक्षा घेण्यास

काहीच हरकत नाही. आपण येथील पुजाऱ्यांच्या आचाराकडे लक्ष देऊ नये. येथे मुख्यतः द्रव्यशुद्धी व भावशुद्धी असल्यामुळे यांचे आम्हाला चालते; तर तुम्हाला का चालू नये? यापुढे तुम्ही येथे कोणालाही आपल्या पायांचे तीर्थ देऊ नये व अनधिकारी साधकांना मंत्रही देऊ नये. येथे येणाऱ्या प्रत्येक साधकाने गाणगापूर व नरसोबावाडीप्रमाणे शुचितेने वागावे असे त्यांना सांगावे." एवढे सांगून ब्रह्मचारी वेषातील श्रीपादश्रीवल्लभ गुप्त झाले.

श्रीस्वामीमहाराज या स्वप्नानन्तर ज्यावेळी जागृत झाले त्यावेळी त्यांच्या मनातील सर्व द्वंद्वे विरघळून गेली होती. पुढे श्रीपाद-श्रीवल्लभांच्या सांगण्याप्रमाणे श्रीस्वामीमहाराज पुजाऱ्यांकडे भिक्षा घेऊ लागले. ज्या ब्रह्मज्ञानोपदेशकार्याकरिता व श्रीक्षेत्र कुरवपूर हे स्थान प्रसिद्ध करण्याकरिता श्रीपादश्रीवल्लभांनी श्रीस्वामीमहा-राजांना येथे आणले होते. त्यातील पहिला अडथळा अशा प्रकारे दूर झाल्यावर त्यांचा येथील चातुर्मास अत्यन्त सुखपूर्वक पार पडला.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र कुरवपूर येथे येण्यापूर्वी पाऊस अगदी बेताचा होता ही स्थिती पाहून लोककल्याणासाठी अर्थात् भूमी सस्यश्यामला होऊन सर्व लोक सुखी व्हावेत म्हणून श्रीस्वामीमहा-राजांनी ब्राह्मणांकडून ऋष्यश्रृंग मंत्राचा जप करवून घेतला. हे अनुष्ठान करताच सर्वत्र उत्तम पाऊस पडून धनधान्याची समृद्धी झाली. श्रीस्वामीमहाराजांची ही दृष्टी ऋषीची आहे; कारण ऋषींनीही ही भूमी सस्यश्यामला होऊन "सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयः। सर्वे भद्राणि पशन्तु मा कश्चित् दुःखमाप्नुयात्।।" या न्यायाने सर्व जण सुखी राहावेत व त्यांना कसलेही दुःख नसावे म्हणून इंद्रवरुणादि देवांच्या प्रार्थना केल्या आहेत. त्यातील पुढील एक दोन सूक्ते जरी पाहिली तरी आपल्याला श्रीस्वामीमहाराजांनी

उपरोक्त प्रकारे मंत्रजपद्वारा वरुण देवतेची किंवा पर्जन्यदेवतेची प्रार्थना करून हे सर्व भारतराष्ट्र सुखसंपन्न कसे होईल याचीच आमरण चिन्ता वाहिली हे स्पष्ट होते व त्यांच्या विशाल अशा करुणासंपन्न हृदयाची कल्पना येऊन मन अगदी स्तिमित होऊन जाते. ऋषी म्हणतात –

हे ऋषे ! ज्योतिर्मय अशा ॐकारपूर्वक ऋग्यजु:सामात्मक वेदवाणीचा सुमंगल घोष कर. हा वेदवाणीचा घोष वृष्टिदायक मेघाला उदकवर्षाव होईल असे करील. पर्जन्यदेव हा आपल्या बरोबर असलेल्या वैद्युताग्नीला चमकावयास लावून त्यालाच औषधीचा (अन्नाचा) गर्भ करतो आणि आपण स्वतः ताबडतोब प्रादुर्भूत होऊन मुसळधारांनी जलवृष्टी करू लागतो. त्यावेळी तो आकाशात गडगडाट व कडकडाट करीत असतो. (ऋग्वेद ७–१०१–१)

पर्जन्यदेव हा त्रैलोक्य व्यापी असून तो औषधींचा (अन्नाचा) व उदकांचा संवर्धक आहे. त्याची सत्ता सर्व जगावर चालते. तो पर्जन्यदेव आम्हाला राहावयास घर व त्याबरोबरच सुखही देवो ! तसेच वसन्तादि तीनही ऋतूत अभिलषणीय असे तेजही आम्हाला लाभेल असे तो करो. (ऋग्वेद ७–१०१–२)

या पर्जन्यदेवतेचे एक स्वरूप वांझ गाईसारखे पृथ्वीवर पाण्याचा वर्षाव न करणारे असून दुसरे स्वरूप सवत्स धेनूसारखे जलवर्षाव करणारे आहे. द्युलोक हा पिता असून पृथ्वी ही मातारूपाने त्या मेघोदकाचा स्वीकार करते. त्या उदकापासून उगवलेल्या हविर्द्रव्याने तो द्युलोक वर्धन पावतो आणि त्याच उदकापासून या पृथ्वीवर जन्मलेल्या जीवमात्राचेही संपोषण व संवर्धन होते. ( ऋग्वेद ७–१०१–३)

ज्यावर हे सर्व जीवमात्र अवलंबून आहेत; ज्याचा स्वर्गादि

लोक आश्रय करून आहेत व ज्याच्यापासून उदक हे पूर्वादि तीन दिशांकडे वाहत जाते, असे ते तीन दिशांमधून वर्षाव करणारे मेघ हे त्या थोर पर्जन्यदेवासमक्ष माधुर्यपूर्ण जलवर्षाव करू लागतात. ( ऋग्वेद ७–१०१–४)

हे स्तोत्र त्या स्वयंदीप्त अशा पर्जन्य देवाकरिताच केले आहे. ते त्याच्या अंतःकरणाला जाऊन भिडो व तो देव त्याचे सेवन करो ! सुखदायक अशा त्या जलधारा त्या पर्जन्यदेवाच्या अनुग्रहाने आम्हास यथाकाल लाभत जावोत आणि त्या पर्जन्याने सुसंवर्धित अशा औषधी (अन्न) आम्हासाठी फलपुष्पादिकांनी समृद्ध होवोत ! (ऋग्वेद ७–१०१–५)

तो पर्जन्यदेव बैलाप्रमाणे औषधींच्या ( अन्नाच्या ) बीजभूत उदकांचा उत्पादक आहे. त्यामुळे त्या पर्जन्यात स्थावर जंगमांचा आत्मा आश्रय करून राहतो. असे ते पर्जन्यदत्त उदक शंभर वर्षे जगण्याकरिता म्हणून माझे संरक्षण करो. (ऋग्वेद ७–१०१–६)

अहो ऋत्विज हो ! वर्षाव करणाऱ्या द्युलोकपुत्र अशा पर्जन्यदेवाची तुम्ही स्तुती करा ! तो आम्हाला व्रीहियवादी म्हणजे भात, सातू, इत्यादि धान्याच्या रूपाने अन्न देण्याची इच्छा करो. जो पर्जन्य औषधींमध्ये ( अन्नामध्ये ), गाईंमध्ये, घोड्यांमध्ये व स्त्रियांमध्ये गर्भाची उत्पत्ती करतो त्या पर्जन्यदेवासाठी म्हणून अग्नीमध्ये मधुर हवीचे हवन करा ! तो देव आम्हास अन्न तयार करून देवो. (ऋग्वेद ७–१०२, १, २, ३)

श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास श्रीक्षेत्र कुरवपूर येथे सुरू झाल्यावर हळूहळू ही वार्ता सर्वत्र समजून अनेक मंडळी दर्शनासाठी येऊ लागली. श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त श्रीगांडामहाराज यांना

श्रीस्वामीमहाराज कुरवपूर येथे चातुर्मासासाठी जाणार आहेत असे भडोचला समजल्यावर परमानन्द झाला होता. श्रीगांडामहाराजांना मध्यंतरी कितीतरी दिवसात श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झालेले नसल्यामुळे त्यांचे मन श्रीगुरुदर्शनासाठी अगदी आतुर झाले होते. त्यावेळी श्रीगांडामहाराज पूर्वी वर्णन केल्याप्रमाणे (खंड ४ पृ.२८२) श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे भडोच येथे अनुष्ठानासाठी गेले होते. त्यामुळे अनुष्ठान संपवून त्यांनी भडोच सोडले व पायीच मद्रासमार्गे श्रीकृष्णा–भगवती संगमावरून पुढे अति बिकट वाटेतून प्रवास करीत करीत श्रीक्षेत्र छायाभगवती येथें येऊन पोहोचले. (खण्ड ४ पृ. ३८८) तेथे आल्यावर त्यांनी ज्यावेळी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घालून डोळे भरून पाहिले त्यावेळी त्यांचा प्रवासाचा शीण एका क्षणात दूर होऊन ते परम समाधानी झाले. त्यानन्तर श्रीगांडामहाराज श्रीस्वामीमहाराजांच्या सेवेत मग्न झाले.

श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास सुरू झाल्यावर वर वर्णन केल्याप्रमाणे पर्जन्यवृष्टीकरिता अनुष्ठान केल्यामुळे जोरदार पाऊस पडला. त्यामुळे श्रीकृष्णानदीचा प्रवाह श्रीक्षेत्र कुरवपूर बेटाच्या चारही बाजूंनी दुथडी भरून वाहू लागला. अशी स्थिती असली; तरी श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास यथे होत आहे ही आनंदाची व जणू काही महापर्वणीच प्राप्त होणारी अशी वार्ता सर्वत्र कळल्यावर हजारो मंडळी त्यांच्या दर्शनासाठी येऊ लागली. या रीतीने लोकांची यें–जा वाढल्यामुळे त्यांच्या जेवण्याची व राहण्याची व्यवस्था करणं क्रमप्राप्तच होते; परन्तु श्रीक्षेत्र कुरवपूर येथे जीवनोपयोगी वस्तू व सामान-सुमान मिळण्याची काहीच सोय नसल्यामुळे मोठीच अडचण होत असे.

ही सर्व स्थिती लक्षात घेऊन श्रीस्वामीमहाराज श्रीगांडामहा-

राजांना असे म्हणाले की, "अरे! येणाऱ्या जाणाऱ्या सर्वांची येथे काही तरी राहण्याची व जेवणाची सोय केली पाहिजे. तू ही सर्व व्यवस्था पाहा." श्रीस्वामीमहाराजांची ही आज्ञा ऐकताच श्रीगांडा-महाराजांना परमानंद झाला. आपल्या हातून श्रीस्वामीमहाराजांची काहीतरी सेवा घडावी म्हणूनच ते येथे आले होते. ज्याप्रमाणे "श्रीराम" या एका अक्षराचा जयजयकार करीत श्रीहनुमान एकाच उड्डाणात सागर पार करून लंकेत गेले होते त्याप्रमाणेच "श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज" या महामंत्राच्या जयजयकाराने श्रीगांडामहाराजांकडून ही दुर्लंघ्य सेवा पार पडली. श्रीगांडामहाराजांनी प्रथम भोपळ्याच्या सांगडीवरून श्रीकृष्णानदी ओलांडून पलीकडे रायचूरला जाऊन प्रत्येक वस्तू आणण्याची व्यवस्था केली. त्याचप्रमाणे बेटावर एक चांगली जागा तयार करून तेथे सर्वांकरिता एकच स्वयंपाक करण्यास सुरुवात केली. त्या ठिकाणी प्रत्येकाला स्वयंपाकाला निरनिराळी जागा व स्वतंत्र भांडी मिळणे शक्य नव्हते म्हणून ही सोय त्यांनी केली होती. त्यावेळी रायचूर येथील व्यापारी आणि सर्व अधिकारी मंडळी श्रीक्षेत्र कुरवपूर येथे येऊन मदत करू लागली. श्री. तुळजाराम पतंगे हे तेलंगी ब्राह्मण पेशकार असून मोठे व्यापारी होते. त्यांनी येथील एकंदर गैरसोय पाहून धान्यादि सर्व सामान दिवाळीपर्यन्त वेळोवेळी येथे आणूना पोहोचते केले. त्यामुळे अशा जंगलातही येथे येणाऱ्या सर्व मंडळींन पक्वान्नाचे भोजन मिळू लागले. अशा दुर्गम स्थानीही त्यावेळी रोज दोनशे ते अडीचशे पान होत असे. ज्याचा खजीनदार कुबेर आहे त्याच्या दरबारी कशाची वाण पडणार? श्रीपादश्रीवल्लभांनी स्वतः होऊन श्रीस्वामीमहाराजांना येथे बोलावून घेतले होते. त्यामुळे ते आपल्या अतर्क्य लीलेने आपल्या भक्ताची व भक्ताच्या भक्तांची

काळजी स्वतःच "योगक्षेमं वहाम्यहं" या श्रीमद्भगवद्गीतोक्त न्यायाने वाहात होते यात काहीच शंका नाही.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीसद्गुरुनाथमहाराजांची सेवा किती कठिण असते याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. या दृष्टीनेच "सेवाधर्मो परमगहनो योगिनामप्यऽगम्य:।" म्हणजे सेवाधर्म हा परमगहन असून तो योग्यांनाही अगम्य आहे, असे जे शास्त्रकारांनी म्हटले आहे, ते अक्षरश: खरे आहे. या दृष्टीने साधकभक्तांनी "श्रीगुरुचरित्र" या ग्रंथात श्रीसरस्वतीगंगाधरांनी प्रकट केलेला श्रीगुरुसेवेचा महिमा ध्यानात घेऊन तो कृतीत कसा उतरेल याचा जरूर विचार करावा. हा महिमा कथन करताना सिद्ध नामधारकाला असे म्हणतात की–

ब्रह्मा म्हणे कलियुगासी। सांगेन तुज उपदेशीं।
कलियुगीं आयुष्य नरांसी। स्वल्प असे एक शत ॥ २.९० ॥
जे नर भजती हरिहरांसी। अथवा असती काशीवासी।
गुरुसेविती निरंतरेंसी। त्यांसी तुझा न लागे दोष ॥ १२३ ॥
गुरुसेवक असती नर। पुराण श्रवण करणार।
सर्व साधन धर्मपर। त्यांतें तुवां न बाधावें ॥ १२६ ॥
सुकृती शास्त्रपरायणांसी। गुरूतें सेविती वंशोवंशीं।
विवेकी धर्म करणारांसी। त्यांतें तुवां न बाधावें ॥ १२७ ॥
गुरु सेवितां सर्वसिद्धी। होती परियेसा त्रिशुद्धी ॥ १४९ ॥
गुरु म्हणजे अक्षरें दोन। अमृताचा समुद्र जाण।
तयामध्यें बुडतां क्षण। केंवि होय परियेसा ॥ २५९ ॥
ज्याचें हृदयीं गुरुस्मरण। तोचि त्रिलोकीं पूज्य जाण।
अमृतपान सदा सगुण। तोचि शिष्य अमर होय ॥ २६० ॥

जरी भक्ती असे दृढेंसी। त्रिकरणसह मानसीं।
तोचि लाधे ईश्वरासी। ईश्वर होय तया वश ॥ २७८ ॥

★ ★ ★

गुरू हरिहरविरंची जाण। स्वरूपें तोचि नारायण।
मन करूनी निर्वाण। सेवा करावी भक्तीनें ॥ १६.४० ॥
पूर्वीं गुरूंची ऐशी रीती। शिष्याकरवीं सेवा घेती।
अन्तःकरण त्याचें पाहाती। निर्वाण वरी शिष्याचें ॥ ४४ ॥
पाहोनियां अन्तःकरण। असे भक्ती निर्वाण।
कृपा करिती तत्क्षण। मनकामना पुरविती ॥ ४५ ॥
जयजयाची गुरुमूर्ती। तूंचि साधन परमार्थीं।
मातें निरोपिलें प्रीती। तत्त्वबोध कृपेनें ॥ १४१ ॥

★ ★ ★

ऐकोनी शिष्यांचें वचन। निरोप देती श्रीगुरु आपण।
जैसा भाव अन्तःकरण। तैसी सिद्धी पावेल ॥ ४०.४० ॥
गुरुवाक्य शिष्यासी कारण। सर्वथा न होय निर्वाण।
जैसें भक्ताचें अन्तःकरण। तैसी सिद्धी पावेल ॥ ४१ ॥
सूत म्हणे ऋषीश्वरांसीं। गुरुभक्ती असे विशेषीं।
तारावया संसारासी। आणीक नाहीं उपाय ॥ ४४ ॥
अयोग्य अथवा ज्ञानवन्त। म्हणोनि न पाहिजे अन्त।
गुरुमूर्ती मनीं ध्यात। सेवा करणें भक्तिभावें ॥ ४५ ॥
दृढभक्ती असे जयापासीं। सर्व धर्म साधती त्यासी।
संदेह न धरावा मानसीं। एकचित्तें भजावें ॥ ४६ ॥
श्रीगुरु नरू न म्हणावा। त्रैमूर्ती तोचि जाणावा।
गुणदोष न विचारावा। म्हणावा तोचि ईश्वर ॥ ४७ ॥

येणेंपरी धरोनि मनीं। जे जे भजती श्रीगुरुचरणीं।
प्रसन्न होय शूलपाणी। तात्काळिक परियेसा ॥ ४८ ॥
मंत्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भेषजे गुरौ।
यादृशीं भावनां कुर्यात् सिद्धिर्भवति तादृशी ॥ ४९ ॥
मंत्र तीर्थं द्विजस्थानीं। देवताभक्ती औषधगुणी।
गुरूसी पाहे शिवसमानीं। भाविल्यासारखें फल होय ॥५०॥

★ ★ ★

गिरिजा पुसे ईश्वरासी। गुरुभक्ति म्हणजे आहे कैसी।
विस्तारोनि आम्हांसी। सांगा म्हणे तये वेळीं ॥४१.८७॥
शिव सांगे गिरिजेसीं। सर्व साध्य गुरुभक्तीसीं।
करावें एक भावेंसीं। शिव जो तोचि गुरु होय ॥ ८८ ॥
गुरुभक्ति म्हणजे सुलभपणें। तत्काळीं साध्य होय जाणें।
अनेक जप अनुष्ठानें। करिती विलंब परियेसी ॥ ९० ॥
नानातपें अनुष्ठानें। करिती यज्ञ महादानें।
त्यांतें होती महाविघ्नें। साध्य होतां दुर्लभ। ॥ ९१ ॥
जो गुरुभक्ति करी निर्मळ। साध्य होईल तात्काळ।
यज्ञ दान तप फळ। सर्व सिद्धि त्यासी होती ॥ ९२ ॥
सुलभ असे अप्रयास। जो जाणे गुरुकुलवास।
एकभावें करोनि आस। आराधावें श्रीगुरूसीं ॥ ९३ ॥

★ ★ ★

श्रीगांडामहाराजांनी श्रीगुरुचरित्र'त कथन केलेला उपरोक्त महिमा आपल्या अंगात मुरवून श्रीक्षेत्र कुरवपूर येथे श्रीस्वामी-महाराजांची जी सेवा केली ती पाहिली म्हणजे साधकाच्या जीवनात निष्काम कर्माला व निस्सीम सेवेलाच प्राधान्य आहे हा बोध मनावर ठसतो. सकाम कर्मे जरी ब्रह्मार्पण केलेली असली तरी

ती गौणच असतात. सामान्यांना ईश्वरभक्तीची गोडी लावण्याचा तो एक मार्ग आहे, इतकेच त्याचे महत्त्व आहे. या दृष्टीने श्रीगांडा-महाराजांनी श्रीस्वामीमहाराजांची सेवा करता करता जी महान् शिकवण आत्मसात केली ती जणूकाही एखाद्या दिव्य संदेशाप्रमाणे साधकभक्तांसाठी पुढील सात वाक्यातून त्यांनी प्रकट केली आहे.

## ★ श्रीस्वामीमहाराजांचे सात दिव्य संदेश ★

१ ) वृत्ती स्थिरावली पाहिजे.
२ ) वासना मेली पाहिजे.
३ ) एकाग्रता वाढली पाहिजे.
४ ) देहाध्यास विरमला पाहिजे.
५ ) आत्मध्यास रंगला पाहिजे.
६ ) मनात ऊर्मी येताच ती मुळासकट कापली पाहिजे.
७ ) सम्यक् दृष्टी बनली पाहिजे.

श्रीस्वामीमहाराजांपासून श्रीगांडामहाराजांनी आत्मसात केलेली ही शिकवण म्हणजे वेद, उपनिषदे व सकल शास्त्रे यांचे सार असून ते जणू काही श्रीक्षेत्र कुरवपूरच्या मंगल वातावरणात ठायी ठायी दृग्गोचर होत असल्याची आजही प्रचीती येते, यात काहीच शंका नाही. श्रीपादश्रीवल्लभ यांच्या श्रीक्षेत्र कुरवपूरचे हेच वैशिष्टय आहे. हा लोण्याचा गोळा मिळविणाऱ्यांपेक्षा सांसारिक सुखांच्या ताकावरच राजी होणाऱ्यांची सर्वत्र भाऊगर्दी जास्त दिसत असते हेच खरे आहे.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथील या चातुर्मासाच्या काळात श्रीस्वामी-महाराजांच्या सेवेत श्रीगांडामहाराजांप्रमाणेच श्री. शंकरराव देशमुख आजेगावकर व त्यांच्या भगिनी गं. भा. काशीताई वगैरे

मंडळी होती. यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांना अशी ताकीद दिली होती की, “आपण देवळामध्ये असेपर्यन्त नरसोबावाडीतील पद्धतीप्रमाणे आपणास कोणीही नमस्कार करू नये व आपली पूजाही करू नये.”

एके दिवशी श्रीस्वामीमहाराज ज्यावेळी भिक्षा घेऊन आले त्यावेळी इतर सर्व मंडळींची पाने अद्याप वाढावयाची राहिली होती. श्रीस्वामीमहाराज सर्व लोक जेवावयास बसल्यावरच त्यांच्या बरोबर बसून भिक्षा ग्रहण करीत असल्यामुळे त्यांनी आपली भिक्षेची झोळी तशीच बाजूला ठेवून दिली व ते सर्वांची बसण्याची वाट पाहात थांबून राहिले. थोडयाच वेळात सर्वांची पाने वाढून झाल्यावर जेवावयास बसण्याची सिद्धता झाल्याबरोबर श्रीस्वामीमहाराज आपली भिक्षेची झोळी घेऊन आले. झोळीतून अन्न बाहेर काढून घेण्यासाठी त्यांनी झोळीत हात घालताच त्यांना एक काळा विंचू जोराने चावला. त्याक्षणी श्रीस्वामीमहाराजांनी आपला उजवा हात झोळीबाहेर काढून जोराने झटकला. त्यावेळी त्यांना विंचवाच्या विषाच्या वेदना होऊ लागल्या. त्यामुळे सर्वांनाच अत्यन्त वाईट वाटले. अशा प्रकारे विंचवाला दंश करावयाला लावून देवांनी शिक्षा का केली हे श्रीस्वामीमहाराजांच्या लगेच लक्षात आले. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी आपण स्वतः भिक्षा न करता सर्व लोकांना जेवण करून घेण्यास सांगितले; परन्तु जेवावयास आलेली सर्व भक्तमंडळी श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाली की, “महाराज! आपण आमच्या बरोबर भिक्षेला बसल्याशिवाय आम्ही काही जेवावयास बसणार नाही. शेवटी अत्यधिक आग्रह केल्यानन्तरही जेव्हा भक्तमंडळी जेवावयास बसण्यास तयार होत नाहीत असे पाहून श्रीस्वामीमहाराजांनी नित्य पाठाचे जे एक स्तोत्र गडबडीमुळे म्हणावयाचे राहून गेले होते ते म्हणून सर्व भक्त

मंडळींबरोबर ते भिक्षेस बसले. त्या दिवशी वेदनांनी बधिर झालेल्या हातानेच त्यांनी भिक्षा केली.

श्रीस्वामीमहाराजांची भिक्षा व सर्व लोकांची जेवणे झाल्यावर जेव्हा सर्व मंडळी एकत्र जमली तेव्हा लोकांनी त्यांना असे विचारले की, " आपल्या भिक्षेच्या झोळीत विंचू कसा गेला ? आपण त्याला काहीच केले नसता तो आपणास चावलाच कसा ? आपणास फार वेदना होतात का ? " लोकांचे हे सर्व प्रश्न ऐकून श्रीस्वामीमहाराज सर्व लोकांना उद्देशून असे म्हणाले की, " आज भिक्षेला जाण्यापूर्वी लक्ष्मणराव नाईक उमरेडकर यांना यंत्र तयार करून देण्याच्या गडबडीत नित्य पाठाचे एक स्तोत्र म्हणावयाचे राहून गेले. त्यामुळ देवांनी मला ही शिक्षा केली. " अशा प्रकारे विंचू चावण्याचे कारण सांगून श्रीस्वामीमहाराज सर्व भक्तमंडळींना उद्देशून असे म्हणाले की, " आमच्याकडून नित्यक्रमातील एक स्तोत्र म्हणावयाचे राहून गेले तर देवांनी रागावून आम्हाला विंचवाकडून दंश करवून शिक्षा केली. अशी जर आमची स्थिती आहे तर मग तुम्ही रोज देवाची कितीतरी कृत्ये विसरता. त्यासाठी देव तुम्हाला किती शिक्षा करतील याचा तुम्हीच विचार करा. तरी तुम्ही देवांच्या सेवेत कुचराई व कसूर करू नका. "

ही सर्व कथा वाचली म्हणजे देवांच्या सेवेत यत्किंचितही कुचराई करता कामा नये असे शिक्षण लोकांना देण्याकरता श्रीस्वामीमहाराजांनी विंचवाकडून चाववून घेऊन जे कष्ट भोगले व जो अद्भुत आदर्श उपस्थित केला तो पाहिला म्हणजे त्यांच्या सारखे खरे सन्त जगात फारच थोडे असतात याची प्रचीती येऊन त्यांच्या चरणाला मिठी मारण्याचे भाग्य आपणाला लाभले म्हणून धन्यता वाटते. या

दृष्टीने श्रीसन्ततुकाराममहाराजांचे पुढील तीन अभंग मोठे बोलके आहेत यात काहीच शंका नाही.

**आणिकांसी तारी ऐसा नाहीं कोणी । धड ते नासोनि भलता टाकी ।१।**
**सोनें शुद्ध होतें अविट तें घरीं । नासिलें सोनारीं अळंकारीं ।। २ ।।**
**ओल शुद्ध काळीं काळें जिरें बीज । कैंचें लागे निज हातां तेथें ।।३।।**
**एक गहूं करिती अनेक प्रकार । सांजा दिवसीं क्षीर घुगरिया ।।४।।**
**तुका म्हणे विषा रुचि एका हातीं । पाधानी नासिती नवनीत ।।५।।**

अर्थ :– या जगात सर्वांना भवनदीतून तारू शकेल असा कोणीही नाही. उलट एखादा ढोंगी महाराज चांगल्या मनुष्याला भोगासक्त व व्यसनासक्त करून त्याच्या हिताचा नाश करून टाकतो. ।। १ ।। जोपर्यन्त सोने घरी असते तोपर्यन्त ते चांगले शुद्ध असते; परन्तु तेच सोनाराच्या दुकानात गेले की, त्याचे तो अलंकार तयार करताना डाग देऊन हिणकस करून टाकतो. ।। २ ।। जमिनीमध्ये चांगली ओल व पेरणीचा हंगाम असला; तरी एखाद्या मूर्खाने काळ्या जिऱ्याचे बी पेरले तर त्यापासून त्याला अपेक्षित असलेले धान्य हाताशी कसे येईल? एकाच गव्हाचे अनेक प्रकार करता येत असल्यामुळे एखादी सुगरण त्या गव्हाचा सांजा, दिवसी म्हणजे गव्हाचा खाद्यविशेष किंवा खीर करते. मात्र एखादी मूर्ख स्त्री त्याच गव्हाच्या घुगऱ्याही करते. ।। ४ ।। श्रीसंततुकाराममहाराज असे म्हणतात की, एखाद्या चतुर बाईच्या हाताने कडू विषालासुद्धा गोडी येते आणि एखादी मूर्ख अजागळ बाई लोण्यासारख्या सुमधुर पदार्थालाही घाणेरडे करून नासून टाकते. त्याप्रमाणे स्वत: कष्ट घेऊन ( प्रसंग विशेषी श्रीस्वामीमहाराजांप्रमाणे स्वत:ला विंचू चाववून घेऊन) समाजाचा, लोकांचा, साधकभक्तांचा उद्धार करणारे संत जगात फारच थोडे असतात; पण ढोंगी, लबाड लोक मात्र

पुष्कळ असतात आणि ते काही तरी सांगून चांगल्या माणसालाही वाईट करून टाकतात. ॥ ५ ॥

वाटें या जनाचें थोर वा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥१॥
कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥२॥
काय मानुनियां राहिले निश्चिती । काय जाब देती यमदूतां ॥३॥
कां हीं विसरली मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥४॥
काय हातीं नाहीं करील तयासी । काय झालें यांसी काय जाणो ॥५॥
कां हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ॥ ६ ॥
काय मोल यासी लागे धन वित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ॥७॥
तुका म्हणें कां हीं भोगितील खाणी । कां त्या चक्रपाणी विसरली॥८॥

अर्थ :—या संसारी लोकांचे मला फार आश्चर्य वाटते; कारण हे लोक स्वतःच्या हिताचा विचार अर्थात् साधनाचा विचार का बरे करीत नसतील ? ॥१॥ यांच्या अंतःकरणात कोणते सुख मिळण्याची आशा आहे ? किंवा यांचे सामर्थ्य तरी असे काय आहे ? आणि अन्तकाळी स्त्रीपुत्रांपैकी कोण यांच्या कामाला येणार आहे ? ॥२॥ साधन न करता हे लोक कशाच्या आधारावर निश्चिन्त राहिले आहेत ? संसारातील सर्व भोग अशाश्वत असल्यामुळे हे लोक निष्काळजी तरी कसे राहतात ? भोगाकरिता करू नये ते पाप केल्यावर हे लोक यमदूतापुढे काय उत्तर देणार आहेत ? ॥३॥ हे सर्व गरीब बापडे लोक "आपण मरणार आहोत," हे विसरून गेले की काय ? यांना या संसारात कोणत्या सुखाची चटक लागली आहे, हे काही कळत नाही. ॥४॥ आपण स्वबलाने किंवा पौरुष प्रयत्नाने काही करू असे म्हटले तर यांच्या हातात काय नाही ? सर्व काही आहे. परन्तु इतके स्वातंत्र्य असूनही हे लोक स्वहिताचा विचार करीत नाहीत. या सर्व लोकांना असा भ्रम का झाला आहे, हे काही कळत

नाही. ।।५।। सर्व प्रकारच्या संसारबंधनातून सुटण्याकरिता देवकी-नन्दन श्रीकृष्णाला हे लोक का बरे आठवीत नाहीत ? ।। ६ ।। श्रीहरीचे चिंतन करण्याकरिता लोकांना खरोखर कोणत्या धन – वित्तांची किंमत द्यावी लागणार आहे ? यांच्या संसारातील सर्व क्रिया निष्फळ असूनही त्यांच्या चित्ताला परमार्थ करण्याचे का पटत नाही ? ।। ७ ।। श्रीसंततुकाराममहाराज असे म्हणतात की, पुढे नरकाच्या खाणी भोगावयाच्या आहेत म्हणून का हे लोक हरीला विसरले आहेत ? ।।८।।

**उपकारासाठी केले हे उपाय। येणेंविण काय चाड आम्हां ।। १ ।।**
**बुडतां हे जन न देखवे डोळां। येतो कळवळा म्हणउनि ।। २ ।।**
**तुका म्हणे माझे देखतील डोळे। भोग देते वेळे येईल कळों ।।३।।**

अर्थ :– आम्ही लोकांच्यावर उपकार करण्यासाठीच भक्ति-ज्ञानाच्या उपदेशाचे प्रयत्न केले. येऱ्हवी आम्हाला येवढ्या प्रयत्नांची काय गरज होती ? ( विंचू चाववून घेण्याचे खरेच काय कारण होते ? ) ।। १ ।। सर्व लोक भवसागरात बुडत असलेले माझ्या डोळ्यांना बघवत नाही. त्यामुळेच मला त्यांचा अत्यन्त कळवळा येतो. ।।२।। श्रीसंततुकाराममहाराज असे म्हणतात की, लोकहो ! तुम्ही आता जरी माझा उपदेश ऐकला नाही तरी पुढे दुःख भोगते-वेळी तुमची चूक तुम्हाला कळून येईल आणि ज्यावेळी माझे डोळे तुमची ती त्यावेळची दुःस्थिती पाहतील तेव्हा त्यावेळी माझ्या मनात तुमच्याविषयी पुन्हा अधिकच कळवळा निर्माण होईल. ।।३।।

एके दिवशी श्रीस्वामीमहाराज समाधिस्थितीत बसले असतानाच देवांनी त्यांच्या हातात मृत चिमण्या, पक्ष्यांची अंडी, विष्ठा इत्यादि पदार्थ टाकले. श्रीस्वामीमहाराज जोपर्यंत ध्यानमग्न होते तोपर्यंन्त त्यांना आपल्या अंगावर देवांनी काही घाण पदार्थ टाकले आहेत

याची जाणीव झाली नाही; मात्र ज्यावेळी ते वृत्तीवर आले त्यावेळी त्यांना या घाण पदार्थांची जाणीव होऊन त्यांनी ते फेकून दिले. श्रीस्वामीमहाराज देहभानावर येऊन त्यांनी आपण त्यांच्या अंगावर टाकलेले पदार्थ फेकून दिले हे पाहून देव श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, " हे असे गलिच्छ पदार्थ तर रोजच आमच्या अंगावर पडतात. ते आम्ही कसे सहन करीत असतो हे तुम्हाला कळण्याकरिता आम्ही हे पदार्थ तुमच्या अंगावर टाकले होते." अशा प्रकारे देवळात स्वच्छता राहावी व देवांच्या अंगावर घाण पडू नये म्हणून देवांनीच कृतीने व प्रत्यक्षपणे सांगून श्रीस्वामीमहाराजांना या कार्यासाठी उद्युक्त केले.

दुसऱ्या दिवशी श्रीस्वामीमहाराज स्नान करून नेहमीप्रमाणे ज्यावेळी देवांच्या दर्शनासाठी देवळात गेले त्यावेळी वटवाघळांनी मारलेली एक मृतचिमणी देवांवर पडलेली त्यांनी प्रत्यक्षपणे पाहिली. त्यावेळी आधल्या दिवशी देवांनी कृतीने व प्रत्यक्षपणे जे सांगितले ते आढळून आल्याने त्यांनी पुजाऱ्यांकडे त्यासंबंधी चौकशी केली. श्रीस्वामीमहाराजांनी अशी विचारणा करताच तेथील पुजारी त्यांना असे म्हणाले की, " देवळाला दरवाजा नसल्यामुळे रात्रीच्या वेळी वटवाघळे आत घुसतात व चिमण्या मारतात. त्यामुळे मेलेल्या चिमण्या देवावर पडतात." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी देवावर पडलेली मृत चिमणी काढून टाकून ती सर्व जागा स्वच्छ केली. त्याचप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी ताबडतोब व्यवस्था करून देवळाला दरवाजा बसवून घेतला. भिंतींना जेथे जेथे फटी होत्या त्या सर्व चुना लावून बुजवून घेतल्या. अशा रीतीने मंदिराची डागडुजी करून घेऊन श्रीस्वामीमहाराजांनी देवांच्या अंगावर कधीही घाण पडणार नाही व देव अखंड स्वच्छ

व प्रसन्न राहतील अशी कायमची व्यवस्था केली.

श्रीपादश्रीवल्लभांनी श्रीस्वामीमहाराजांकडून आपली जी व्यवस्था करवून घेतली ती पाहिली म्हणजे देवभक्तांच्या प्रेमाची, ऐक्याची व अभिन्नत्वाची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. देवभक्तांच्या या प्रेमाची ग्वाही श्रीसंतनामदेवमहाराजांनी पुढीलप्रमाणे दिली आहे. त्या प्रेमाची गोडी मोठी अविट आहे. ते असे म्हणतात की –

नामयाचें प्रेम केशवचि जाणे। केशवासी राहणें नाम्यापाशीं ॥१॥
केशव तोचि नामा नामा तोचि केशव। प्रेमभक्तिभाव मागतसे ॥२॥
विष्णुदास नामा उभा केशवद्वारीं। प्रेमाची शिदोरी मागतसे ॥३॥

★　　★　　★

तूं अवकाश मी भूमिका। तूं लिंग मी शाळुंका ॥
तूं समुद्र मी द्वारका। स्वयें दोन्ही ॥ १ ॥
तूं वृंदावन मी चिरी। तूं तुळशी मी मंजरी ॥
तूं पावा मी मोहरी। स्वयें दोन्ही ॥ २ ॥
तूं चांद मी चांदणी। तूं नाग मी पद्मिणी ॥
तूं कृष्ण मी रुक्मिणी। स्वयें दोन्ही ॥ ३ ॥
तूं नदी मी थडी। तूं तारुं मी सांगडी ॥
तूं धनुष्य मी भातोडी। स्वयें दोन्ही ॥ ४ ॥
तूं वेद मी स्तविता। तूं शास्त्र मी गीता ॥
तूं गंध मी अक्षता। स्वयें दोन्ही ॥ ५ ॥
नामा म्हणे पुरुषोत्तमा। स्वयें जडलों तुझ्या प्रेमा ॥
मी कुडी तूं आत्मा। स्वयें दोन्ही ॥ ६ ॥

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे चातुर्मास सुरू होण्यापूर्वी आषाढ शुद्ध एकादशीच्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांच्या स्वप्नात श्रीकृष्णामाई

एका शूद्र स्त्रीच्या रूपाने आली व ती त्यांना असे म्हणाली की, "आपण बरेच दिवस उपोषित आहोत; तरी आपण निदान डाळ तरी आम्हाला द्यावी अशी माझी प्रार्थना आहे." श्रीस्वामीमहाराज सकाळी जागे झाल्याबरोबर श्रीकृष्णामाईच शूद्र स्त्रीच्या रूपाने येऊन आपल्याकडे डाळ मागत होती हे त्यांच्या लक्षात आले. अशा प्रकारे श्रीकृष्णामाई आपणाकडे खावयास का मागत आहे? या प्रश्नाचा विचार करताच श्रीस्वामीमहाराजांच्या असे लक्षात आले की, "या वर्षी आपण श्रीमलप्रभानदीच्या तीरावरील मुरगोड गावी दशाहार केल्यामुळे श्रीकृष्णामाईला काही नैवेद्य इत्यादि दाखवून तिला संतुष्ट करता आले नाही. तिला आपल्याकडून काहीच न मिळाल्यामुळे ती ही मागणी करीत आहे." श्रीकृष्णामाईच्या मागणीप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी तिला संतुष्ट करण्याचा पक्का निश्चय केला.

श्रीस्वामीमहाराजांना वरील प्रकारे स्वप्नदृष्टान्त झाल्यावर चारच दिवसांनी आषाढ पौर्णिमेला त्यांनी व्यासपूजा केली व सायंकाळी श्रीक्षेत्र कुरवपुरातील सर्व शूद्र मंडळींना बोलाविले. ही सर्व मंडळी आल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीकृष्णामाईची शास्त्रोक्त रीतीने उत्तमप्रकारे महापूजा करून तिला भिजविलेल्या डाळीचा नैवेद्य दाखवून ती डाळ तेथे जमलेल्या शूद्र पुरुषमंडळींना भरपूर प्रमाणात वाटली. त्याचप्रमाणे श्रीकृष्णामाई येथे शूद्र स्वरूपात असल्यामुळे तेथे जमलेल्या शूद्र स्त्रियांची ओटी भरून त्यांनाही विपुल प्रमाणात डाळ वाटली. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी श्रीकृष्णामाईला संतुष्ट केले.

श्रीस्वामीमहाराजांनी श्रीकृष्णामाईची ज्या दिवशी महापूजा केली त्या दिवशी लागणाऱ्या फुलांची सोय देवांनीच केली होती.

श्रीक्षेत्र गाणगापूरच्या एका भक्ताला श्रीपादश्रीवल्लभ यांचा असा दृष्टान्त झाला की, "मी सध्या चातुर्मासानिमित्त कुरुगड्डी येथे राहात आहे. तेथे फुले पाठविण्याची व्यवस्था करावी." या दृष्टान्ता-प्रमाणे त्या भक्ताने चातुर्मास संपेपर्यन्त श्रीक्षेत्र कुरवपूरला पोष्टाने फुले पाठविण्याची व्यवस्था केली.

श्रीस्वामीमहाराजांनी श्रीकृष्णानदीच्या प्रार्थनेप्रमाणे श्रीक्षेत्र कुरवपूर येथे राहणाऱ्या शूद्रांचाही सत्कार केला; कारण पुण्य-क्षेत्रात राहणारे लोक पुण्यवान असतात. परमार्थात जातीशी काहीही कर्तव्य नसते व भगवान् उंचनीच हे काहीही न जाणता फक्त भावभक्तीच पाहतात. हे तीन महान् संदेश श्रीस्वामीमहाराजांना सर्वांना द्यावयाचे होते. या तिन्ही संदेशांचेच वर्णन करताना श्रीसंत-तुकाराममहाराज आपल्या अभंगात असे म्हणतात की—

कस्तुरीचें रूप अति हीनवर। माजीं असें सार मोल तया ॥ १ ॥
आणीकहि तैसीं चंदनाचीं झाडें। परिमळे वाढे मोल तया ॥ २ ॥
काय रूपें असें परीस चांगला। धातु केली मोला वाढ तेणें ॥ ३ ॥
फिरंगी आटितां नये बारा रूके। गुणें मोलें विके सहस्रवरी ॥ ४ ॥
तुका म्हणे नाहीं जाती सवें काम। ज्याचें मुखीं नाम तोचि धन्य ॥५॥

अर्थ :— कस्तुरीचे रूप मातीसारखे निकृष्ट असते; पण त्यात सारभूत सुगंध असतो आणि त्याला मोठी किमतही असते. ॥१॥ त्याचप्रमाणे चंदनाची झाडे देखील दिसण्यास सुंदर नसतात; पण त्यांच्या अंगी असलेल्या सुगंधामुळे त्यांचीही मोठी किमत असते. ॥२॥ परीस देखील रूपाने फार चांगला असतो काय? असे असले; तरी तो लोखंडाचे सोने करतो. त्यामुळेच त्याची किमत वाढली आहे. ॥३॥ एखादी उत्तम तलवार आटविली तर त्या लोखंडाला बारा पैसेही किमत येत नाही; पण ती तलवार तशीच राहिली

तर आपल्या गुणाने हजार रुपयांच्या वर किंमतीने विकली जाईल. ॥४॥ श्रीसंततुकाराममहाराज असे म्हणतात की, वरील दृष्टान्ता-प्रमाणे परमार्थात जातीशी कर्तव्य नाही. ज्यांच्या मुखात हरीचे नाम आहे, ( जे पवित्र तीर्थक्षेत्रात राहून आपले जीवन कृतार्थ करतात, ) ते धन्य होत. ॥ ५ ॥

**उंच नीच कांहीं नेणें भगवन्त । तिष्ठे भावभक्ती देखोनियां ॥ १ ॥**
**दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्या घरीं रक्षी प्रल्हादासी ।२।**
**चर्म रंगू लागे रोहिदासासंगें । कबिराचे मागें शेले विणी ॥ ३ ॥**
**सजन कसाया विकूं लागे मांस । माळ्या सांवत्यास खुरपूं लागे ।।४।।**
**नरहरी सोनारा घडूं फुंकूं लागे । चोखामेळचासंगें ढोरें ओढी ।।५।।**
**नामयाची जनीसवें वेंची शेणी । धर्मा घरीं पाणी वाहे झाडी ।।६।।**
**नाम्यासवें जेंवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगें ओढी ।।७।।**
**अर्जुनाचे रथीं होय हा सारथी । भक्षी पोहे प्रीतीं सुदाम्याचे ।।८।।**
**गौळियांचे घरीं अंगें गाई वळी । द्वारपाल बळीद्वारीं झाला ॥ ९ ॥**
**येकोबाचे ऋण फेडी हृषीकेशी । अंबऋषीचे सोशी गर्भवास ।।१०।।**
**मिराबाईसाठी घेतों विषप्याला । दामाजीचा झाला पाडेवार ।।११।।**
**घडी माती वाहे गोऱ्याकुंभाराची । हुंडी त्या मेहत्याची अंगें भरी ।१२।**
**पुंडलिकासाठीं अझूनि तिष्ठत । तुका म्हणे मात धन्य त्याची ।।१३।।**

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे श्रीपादश्रीवल्लभांच्या मंदिराच्या जवळच एक अनुष्ठानाची गुंफा अर्थात् गुहा असून तेथे एक मोठा नाग किंवा महा-भुजंग राहात असे. ज्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी ही गुहा पाहिली त्यावेळी ती आपल्याला ध्यानासाठी अत्यन्त योग्य अशी जागा आहे असे पाहून त्यांनी त्या महाभुजंगाला असे सांगितले की, " आम्हाला ध्यानासाठी ही गुहा हवी आहे; तरी चातुर्मास संपेपर्यंन्त तू येथून

निघून जा." श्रीस्वामीमहाराजांची ही आज्ञा शिरसावंद्य मानून तो नागराज गुहेतून बाहेर आला व त्यांना अत्यंत आदराने वंदन करून मोठ्या प्रेमाने श्रीस्वामीमहाराजांना ध्यानासाठी गुहा रिकामी करून देऊन जवळच असलेल्या पुरातन वटवृक्षाच्या ढोलीत राहण्यासाठी निघून गेला. पुढे श्रीस्वामीमहाराज जोपर्यन्त श्रीक्षेत्र कुरवपूर येथे होते तोपर्यन्त त्यांचा भक्त बनलेला तो नागराज त्यांना दररोज नमस्कार करून जात असे. अशा प्रकारे तो महाभुजंग रोज आपल्या दर्शनाला येतो हे पाहून श्रीस्वामीमहाराजांनी त्याला असे सांगितले की, "या पुढे येथे कोणासही पीडा देऊ नकोस. तुझा क्रोधी स्वभाव सोडून देऊन शान्त चित्ताने राहा." श्रीस्वामीमहाराजांच्या या आज्ञेप्रमाणे त्याने आजपर्यन्त कोणालाच पीडा दिली नाही व कोणालाही दुखविले नाही. तो महाभुजंग म्हणजे श्रीस्वामीमहाराजांचा महान् आज्ञाधारक शिष्यच होय! अद्यापही वटवृक्ष व गुंफा या परिसरात पुण्यवन्तांना या महाभाग्यवान् भक्ताचे दर्शन घडते. अशा प्रकारे या महाभक्ताचे दर्शन होणे ही श्रींची आपल्यावर कृपादृष्टी असल्याची एक पावतीच आहे असे श्रींच्या भोळ्याभाबड्या भक्तमंडळींना वाटले; तर ते यथार्थ नाही असे कोण म्हणेल? खरोखर! महाभुजंग म्हटला की, तो अत्यन्त क्रोधी, उग्र व भयानकच असणार; परन्तु श्रीगुरूंच्या या शिष्योत्तमाचे सौम्य, शान्त व अत्यन्त निरुपद्रवी असे दर्शन साधकाच्या मानससरोवरात अनन्दाचे कल्लोळ उठविते. अद्यापही पुष्कळदा अनेक साधक येथे अनुष्ठानास येतात व श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या वास्तव्याने पवित्र व सिद्ध केलेल्या गुहेत अनुष्ठानास बसतात. त्यावेळी श्रींच्या या लाडक्या भक्ताचे एकदा तरी दर्शन मिळून आपण धन्य व कृतार्थ व्हावे असे त्यांना वाटल्यास त्यात काहीच

आश्चर्य नाही. अशा प्रकारे तो नागराज महाभुजंग गुहेतून निघून गेल्यावर श्रीगांडामहाराजांनी ती गुहा श्रीस्वामीमहाराजांच्या ध्यानासाठी स्वच्छ करून दिल्यावर ते तेथे समाधीसाठी बसू लागले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे 'अहिंसा प्रतिष्ठायां तत्संनिधौ वैरत्यागः ॥ २.३५॥" या योगसूत्राचे स्मरण होऊन या सूत्रात म्हटल्याप्रमाणे अहिंसेची दृढतम प्रतिष्ठा अर्थात् सिद्धी झाली म्हणजे या अहिंसक योग्याच्या निकट आलेल्या सर्व प्राण्यांचे वैर दूर होते अर्थात् वैरभाव संपून जातो. याचा अर्थच असा आहे की, ज्यावेळी योगी अहिंसा पालनामध्ये दृढतम होतो त्यावेळी त्याच्या अहिंसेच्या प्रभावाने त्याच्या निकटवर्ती आलेल्या सर्व हिंसक प्राण्यांचीही अहिंसक वृत्ती होते. खरोखर ही एक अपूर्व व अलौकिक अशी सिद्धी आहे व ती प्राप्त होणे ही एक लोकोत्तर स्थिती आहे. श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी उपरोक्त अहिंसेच्या सिद्धीची पूर्णपणे प्रतिष्ठा झालेली होती हे वरील कथेवरून निभ्रान्तपणे सिद्ध होते. ही असाध्य सिद्धी अभ्यासाने कशी साध्य होते व चित्त शुद्ध अर्थात् अहिंसक झाल्यावर सर्व बाधक गोष्टी हितकारक होऊन सर्व जीव आपल्या जीवाप्रमाणे योग्याला कसे आवडतात हे श्रीसंततुकाराममहाराजांनी पुढील दोन अभंगात फारच मार्मिकपणे कथन केले आहे.

साधुनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकांते डोळां;न पाहवे ।१।
साधुनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ॥२॥
असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥३॥

अर्थ :– पुष्कळ दिवसांच्या अभ्यासाने काही लोक दररोज तोळा तोळा विष खातात. ते इतरांना डोळयांनी बघवत देखील नाही. ॥१॥ अभ्यासाच्या बळाने काही लोक मोठमोठे सर्प हातात धरतात.

इतर लोक ते दृश्य बघूनच थरथर कापतात. ।।२।। श्रीसंततुकाराम-महाराज असे म्हणतात की, असाध्य वाटणाऱ्या सिद्धी साध्य करण्यासाठी खूप परिश्रम करावे लागत असले; तरी देखील अभ्यासाच्या बळावर त्या साध्य करता येतात. ।। ३ ।।

चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्रही न खाती सर्प तया ।।१।।
विष तें अमृत आघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ।।२।।
दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतल अग्निज्वाळा ।।३।।
आवडेल जीवां जीवाचिये परी । सकळां अंतरीं एक भाव ।। ४ ।।
तुका म्हणे कृपा केली नारायणें । जाणिजे तें येणें अनुभवें ।। ५ ।।

अर्थ :– ज्याचे चित्त सर्वाभूती भगवद्भाव सिद्ध झाल्यामुळे शुद्ध अर्थात् अहिंसक म्हणजे रागद्वेषरहित झाले आहे त्याचे शत्रू देखील मित्र होतात. त्याला वाघही खात नाही आणि सर्पही चावत नाही. ।।१।। त्याला विष हे अमृताप्रमाणे होते व त्याच्यावर आघात झाले; तरी तेही त्याला हितकारकच होतात. त्याच्याकडून चुकून कर्तव्य पार पाडले गेले नाही; तरी तेही त्याला नीतियुक्त व धर्मयुक्त असे होते. ।।२।। अशा लोकांना दुःख देखील सुखकारक फळ देते आणि अग्निज्वाळाही शीतल होऊन त्यांना त्रास देत नाहीत. ।।३।। अशा साधूवर सर्व जीव आपल्या जिवाप्रमाणे प्रेम करतात किंवा असा साधू सर्व प्राणिमात्रांना आपल्या प्राणापेक्षाही आवडतो. सारांश सर्वांच्या अन्तःकरणात त्याच्याविषयी अत्यन्त आदरभाव निर्माण होतो. ।।४।। श्रीसंततुकाराममहाराज असे म्हणतात की, ज्याला असा चित्तशुद्धीचा अर्थात् परिपूर्ण अहिंसा सिद्धीचा अनुभव आलेला असतो त्याच्यावर श्रीनारायणाने पूर्ण कृपा केली आहे असे निश्चित जाणावे किंवा ज्याला असा अनुभव येतो त्याने त्या अनु-

भवावरून श्रीनारायणाने आपल्यावर पूर्ण कृपा केली आहे असे निश्चितपणे समजावे. ॥५॥

श्रीगांडामहाराज श्रीक्षेत्र कुरवपूर येथे आल्यावर ते श्रीपाद-श्रीवल्लभांच्या पादुकांवर पाणी घालू लागले. त्यावेळी श्रीदेवांनी श्रीस्वामीमहाराजांना असे सांगितले की, " गांडाबुवा जर नरसोबा-वाडीला पादुकांवर पाणी घालीत नाहीत तर मग ते येथेच पाणी का घालतात ? तरी त्यांना येथील पादुकांवर पाणी घालू नये असे सांगावे. " श्रीदेवांनी केलेली ही आज्ञा श्रीस्वामीमहाराजांनी श्रीगांडामहाराजांना सांगताच त्यांनी तत्काळ पादुकांवर पाणी घालणे बंद केले. त्यानन्तर ते श्रीपादश्रीवल्लभांच्या पादुकांसमोर उभे राहून त्यांना मनोभाभावाने प्रार्थना करताना असे म्हणाले की, " आपण श्रीगुरुचरणांकडून देवविलेल्या आज्ञेप्रमाणे आजपासून आपल्या पादुकांवर पाणी घालणे बंद केले आहे. इतक्या दिवस मी अनधिकाराने पाणी घातल्यामुळे आपल्याला जो त्रास झाला असेल त्याबद्दल मी आपली अन्तःकरणपूर्वक क्षमा मागतो. तरी आपण माझ्याकडून झालेल्या अपराधाबद्दल मला क्षमा करून माझ्यावर दया करावी. "

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीगांडामहाराजांना गुर्वाज्ञा ही आपल्या प्राणापलीकडे कशी प्रिय व शिरसावंद्य होती याचा प्रत्यय येतो. या दृष्टीने समन्वय महर्षी मधुराद्वैताचार्य श्रीगुलाबरावमहाराज विरचित सूक्तिरत्नावली एकादश यष्टी म्हणजेच " संप्रदायसुरतरु पूर्व विहार " या ग्रंथातील तृतीय कुसुम, गुरुतत्त्व निरूपण यातील पुढील ओव्या सर्व साधकभक्तांना अभ्यसनीय आहेत, यात तिलःप्राय शंका नाही.

नाहीं रूपाची जेथें सोयें। तेथे दिठीचें काई आहे ? ॥
आम्हा फळले पाये। ऐसी दशा ॥ अमृतानुभव ॥ २.५० ॥
जे तोचि चेता तोचि चेववी। तेवि हाचि बुझे हाचि बुझावी।
गुरुशिष्यत्व नांदवी। ऐसेंनि हा ॥ ६७ ॥

अर्थ :– श्रीगुरूला रूपच नाही. तेथे आमच्या दृष्टीचा काय उपयोग आहे ? आमचा शिष्यपणा सर्वस्वाने नाहीसा होण्यासाठी श्रीसद्गुरूंचे पाय म्हणजे त्यांनी आपल्या कृपेने अर्थात् दैवी शक्तीच्या संक्रमणानें म्हणजे शक्तिपाताने अनादि निद्रिस्त आत्मशक्ती जागृत करून ती सुषुम्नामार्गाने ऊर्ध्वगामी केल्याने तिची ही गतीच शिवरूप होण्यासाठी फळास आली. ॥ २.५० ॥ ज्याप्रमाणे परमात्मा हा शिवरूपाने योगनिद्रेतून जागा होणार असतो आणि तोच शक्तिस्वरूप जीवरूपाने स्वतःला जागे करणाराही आपणच असतो अर्थात् जीव-रूपाने मूलाधारात निद्रिस्त असलेली अनादि आत्मसत्तारूप महामाया कुंडलिनी शक्ती श्रीसद्गुरुकृपेने शक्तिपातयोगदीक्षाद्वारा जागृत झाली की, ती आपली आपणच संकुचित जीवरूप सोडून देऊन शिवरूप होते त्याप्रमाणे श्रीगुरू आपण स्वतः नाहीसे होऊन शिष्य-रूपाने आपणास जाणतात आणि शेवटी शिष्याच्या रूपाने श्रीगुरू होऊन राहतात. ॥ २.६७ ॥

म्हणवोनी याचिया ठाया। निर्गुणीं सगुणीं साविया।
शिष्यासह खेळणें तया। सुलभचि होय ॥८५॥
"स्वप्नचि हे तुकले साचासारिखे"। येणें तातवचने निके।
सांपडले आंगिके। गुरुपदसौंदर्य ॥८६॥
म्हणोनिया आपुलिया हातीं। गुरु अलंकाराची बुंथी।
तेथ गुरुआज्ञाचि पुरती। कारण होय ॥८७॥

त्याचप्रमाणे आपण उपरोक्त ग्रंथातील नवम कुसुम "गुरुदोष-

दर्शनाक्षेप परिहार" या नावाच्या प्रकरणात श्रीगुलाबरावमहाराज यांनी कथन केलेल्या दोन कथांचा साक्षेपपूर्वक अभ्यास केला तर वरील कथेचे अंतरंग रहस्य किती घनगंभीर आहे याचा उलगडा होईल.

जरी परतंत्र ईश्वर भक्त रक्षणीं ।
तरी भक्ति आवडे ही लीलाच म्हणोनी ।
परी भक्तशक्तीच्या भयेंकरूनीं । परतंत्र चक्रपाणि कदा नोहे ॥५३॥
जरी नायकतां भक्तवचन । तरी तो मज नरकीं घालेल नेवोन ।
ऐसा भिऊन भगवान । कवणा कदा वश झाला ? ॥ ५४ ॥
आतां प्रारब्धमतें कीं लीलामतें । शिष्यप्रीति समान असते ।
यांविषयीं दोन तूतें । इतिहास सांगू ॥ ५५ ॥
गुरुचरित्रीं ऐसी कथा । कोणी संदीपक सच्छिष्य होता ।
गुरु तयासी झाला बोलतां । मज प्रारब्धें होईल रोग ॥ ५६ ॥
तैं त्वां मातें रक्षावें । तेव्हां संदीपक म्हणे बरवे ।
मग वाराणसींत जाऊनी स्वभावें । राहिला तो ॥ ५७ ॥
आधीच रोगी क्रूर असती । वरी परीक्षा पाहणें होते चित्तीं ।
तेणें उसंत सच्छिष्याप्रती । दिवसराती घेवो नेदी ॥ ५८ ॥
सेवितां श्रीगुरूचे चरण । उसंत नसे एकही क्षण ।
तेणें वाराणसींत असोन । विश्वेश्वरमाधवदर्शन नाहीं झाले ॥५९॥
ऐसे लोटले दिवस किती । विधिहरिहर भाविती चित्तीं ।
म्हणती आमुच्या दर्शनाप्रती । भक्त संदीपक कां नये ॥ ६० ॥
आम्हांसी तयावांचुनी । गोड न लागे अन्नपाणी ।
चला जाऊं तयांचे सदनीं । मग आले मिळोनी अवघे जण ॥६१॥
संदीपकास गाठोनी एकान्तीं । आपुली ओळख स्पष्ट सांगती ।
कांहीं वर माग म्हणती । तंव तो चित्तीं न मानी ॥ ६२ ॥

अत्यंत आग्रह करती देव। तदा म्हणे उद्यां सांगोन सर्व।
मग गृहीं जावोन स्वयमेव। सांगे अनुभव श्रीगुरूते ॥ ६३ ॥
म्हणे आजी मज एकान्तीं। हरिहर भेटले वर माग म्हणती।
आज्ञा असेल तरी विनंती। स्वामीच्या आरोग्यार्थ करितो तया ॥
तदा संतोष निरोधून। श्रीगुरु म्हणती आपण।
माझा रोग निवारावया कारण। ईश्वरालागून प्रार्थू नको ॥६५॥
प्रारब्धभोग चुकविता। जगीं कवणा नाही सत्ता।
बळें करोनी राखोनी ठेविता। तरी विघ्न करिती मुक्तीते ॥६६॥
ऐसें ऐकोनिया वचन। शिष्य धरोनी राहिला मौन।
तंव दुसरे दिवशीं हरिहर येऊन। तया कारण भेटले पुनः ॥६७।
म्हणती वर माग कांहीं। तो म्हणे मज कामना नाहीं।
ऐसें लोटले दिवस कांहीं। परि आग्रह लवलाही न सोडती ॥६८॥
नवल सिद्धींची रीती। न मागता दासी होती।
तैसें हरिहर तोषोनी सद्गुरुभक्ती। वर माग म्हणती संदीपका ।६९।
शेवटीं आग्रह किटकिटी कंटाळोन। म्हणे सद्गुरुसेवेशी उल्हास पूर्ण।
क्षुधादि विसरोन रात्रंदिवस। असें हें वरदान द्यावे ॥७०॥
तथास्तु म्हणोन हरिहर। अंतर्धान पावले सत्वर।
संदीपका पावला गुरुद्वार। लाजेने अंतर मौनावले ॥७१॥
म्हणे न विचारितां सद्गुरुराया। वर मागितला मी कायसा।
तिही नाहीं म्हणता वाया। आज्ञाभंग मी केला ॥७२॥
संदीपक कां नये म्हणोनी। हें श्रीगुरु चिंतोनी मनीं।
मग स्वमुखें हांक मारोनी। म्हणती नवल नयनीं देखिलें तें सांग ।७३।
तें संदीपकें वर्तमान। आघवे केलें निरूपण।
म्हणे हरिहरा ग्रहा कंटाळोन। घडला मजकडोन प्रमाद हा ॥७४॥

तैं संतोष न मावे सद्‌गुरुहृदयीं । उठोनी आलिंगन देती लवलाही ।
म्हणती तुज ऐसा आन नाहीं । गुरुभक्त देखिला म्यां ॥७५॥
मज वाटे तुझ्याचि तपेंकरून । माझें अंग निर्मळ जाहलें पूर्ण ।
मग आपुला प्रारब्धभोग संपूर्ण । स्वयोगबळेंकरून अभिभविला ॥
एवं गुरुप्रारब्ध । सेवेत न करी प्रतिबंध ॥
आता गुरुलीला ही प्रसिद्ध । प्रतिबंध न करी ऐशा बहुत कथा ॥७७॥
कोणी एक सच्छिष्य होता । तो श्रीगुरुजवळीं शयीत असतां ।
तेथ सर्प आला अवचिता । शिष्यालागीं डंखावया ॥७८॥
तैं श्रीगुरु म्हणती तूं कवण । सर्प म्हणे मी याचा पूर्व शत्रु दारुण ।
याचे कंठरक्त प्यावया कारण । पावलो येथ महाराजा ॥ ७९ ॥
तव श्रीगुरू म्हणती येणें तुज । ब्रह्महत्त्या लागेल सहज ।
मी रक्त काढोन देता आज । कार्य भागेल कीं नाहीं तुझें ॥८०॥
संतदर्शन संप्राप्तसंमती । सर्प बरवे म्हणे श्रीगुरुप्रती ।
मग शिष्याचिया उरावरुती । बैसोनी कंठ चिरती श्रीगुरू ॥ ८१ ॥
तदा शिष्य कासाविस । होवोनी उघडी नयनास ।
हृदयीं पाहतां श्रीगुरूस । नयन लावोन निजला सुखें ॥ ८२ ॥
पुढे रक्त दिधलिया सर्पाप्रती । तो निघोन गेला शीघ्र गती ।
सकाळीं श्रीगुरू शिष्यास म्हणती । तूं राती दचकलासी कां ? ॥८३॥
म्हणे मी कासाविस जाहलो म्हणून । नेत्र पाहिले उघडोन ।
श्रीगुरु म्हणती नेत्र लावोन । निजलासी कैसा सुखें मग ॥ ८४ ॥
तैं शिष्य म्हणे हृदयावरुती । मिया पाहिले तुम्हाप्रती ।
आपण सर्वथा निरत माझिया हिती । हे जाणोनी सुषुप्ति
सेविली म्यां ॥८५॥
आपुली लीला माझें हित । हें माझिया अंतरीं जागे नित ॥ ८६ ॥



★ ★ ★

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे चातुर्मास चालू असताना श्रीस्वामीमहा-राजांच्या दर्शनासाठी व त्यांच्या सहवासात काही दिवस राहण्या-साठी त्यांचे एक भक्त बरेच पैसे घेऊन तेथे आले होते. तेथे आल्यावर एके दिवशी ते आपले कपडे व पैशाची थैली वगैरे सामान किनाऱ्यावर ठेवून श्रीकृष्णानदीत स्नानासाठी उतरले. ते गृहस्थ आपली पैशाची थैली किनाऱ्यावर ठेवून स्नानास गेले आहेत असे पाहून एका बाईने ती पैशाची थैली लांबविली. ते गृहस्थ स्नान करून वर आल्यावर कपडे घालताना आपली पैशाची थैली कोणीतरी चोरून नेल्याचे त्यांच्या लक्षात आले. आपली पैशाची पिशवी परत कशी मिळवावी या विवंचनेत असताना त्या गृहस्थांच्या हे लक्षात आले की, येथे पोलीस चौकी किंवा तक्रार करण्याची अन्य काही सोय उपलब्ध नाही. शेवटी त्यांनी मोठ्या धैर्याने ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर घातली. हे ऐकताच श्रीस्वामीमहा-राजांनी एका पिशाच्चाला त्या चोरीचा शोध करण्याची आज्ञा केली. त्याने तत्काळ जाऊन त्या बाईला भिती दाखविताच ती बाई श्रीस्वामीमहाराजांकडे आली व तिने ती पैशाची थैली त्यांच्या पुढे ठेवून आपल्या अपराधाची क्षमा मागितली.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे येणाऱ्या यात्रेकरूंची सोय व्हावी म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी रायचूरकर मंडळींना असे सांगितले की, "येथे येणाऱ्या सर्व यात्रेकरूंना राहण्यासाठी एक चांगली धर्मशाळा बांधावी." श्रीस्वामीमहाराजांच्या या आज्ञेप्रमाणे राचूरमधील मंडळींनी धर्मशाळा बांधण्याच्या कामाला सुरुवात केली. या कामी रायचूर येथील श्री. शंकरराव यांनी पुढाकार घेऊन बरीच मेहनत घेतली. या वेळीच श्रीक्षेत्र कुरवपूरला कोल्हापूरचे श्री. शेषो कारदगेकर हे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी सहकुटुंब आले

होते. त्यांना संतती होत नव्हती व कर्जही बरेच झाले होते. त्यांची श्रीस्वामीमहाराजांवर एकांतिक श्रद्धा होती. "त्यामुळे आपली दुःखे आपल्या देवाजवळ सांगावयाची नाहीत तर दुसऱ्या कोणाजवळ सांगावयाची ?," या विचाराने त्यांनी या दोन्ही गोष्टी श्रीस्वामी-महाराजांच्या कानावर घातल्या. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी श्री. शेषो कारदगेकर यांच्या मंडळींच्या ओटीत प्रसादाचा नारळ घातला व संतती होईल आणि कर्ज फिटेल असा आशीर्वाद दिला. त्याप्रमाणे पुढे त्यांना एक मुलगा व एक मुलगी अशी दोन अपत्ये झाली आणि त्यांचे सर्व कर्जही फिटले.

या प्रकारे आपल्या सर्व अडचणी दूर करून घेतल्यावर आपल्या-प्रमाणेच सर्व लोकांचे कष्ट दूर व्हावेत, सर्व लोक सुखी राहावेत आणि सर्वांना अखंड मंगलाची प्राप्ती व्हावी म्हणून एक दिवशी श्री. शेषो कारदगेकर यांनी श्रीस्वामीमहाराजांना अशी प्रार्थना केली की, "माझ्याप्रमाणेच सर्व लोकांचे कष्ट निवारण व्हावेत म्हणून श्रीपादश्रीवल्लभांचा धावा करता येईल असे एखादे स्तोत्र सर्वांसाठी करून द्यावे." श्री. शेषो कारदगेकर यांच्या इच्छेप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी पुढीलप्रमाणे "घोरसंकटनिवारणपूर्वक श्रीदत्तप्रीतिकारकस्तोत्र" रचून त्यांना दिले.

॥ घोरसंकटनिवारणपूर्वक श्रीदत्तप्रीतिकारकस्तोत्रम् ॥

श्रीपादश्रीवल्लभ त्वं सदैव ।<br>
श्रीदत्तास्मान्पाहि देवाधिदेव ॥<br>
भावग्राह्य क्लेशहारिन्सुकीर्ते ॥<br>
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ १ ॥

त्वं नो माता त्वं पिताऽऽप्तोऽधिपस्त्वम् ।।
त्राता योगक्षेमकृत्सद्‌गुरुस्त्वम् ।।
त्वं सर्वस्वं नोऽप्रभो विश्वमूर्ते ।।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।। २ ।।
पापं तापं व्याधिमाधिं च दैन्यं ।।
भीतिं क्लेशं त्वं हराऽशुत्वदन्यम् ।।
त्रातारं नो वीक्ष ईशास्तजूर्ते ।।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।। ३ ।।
नान्यस्त्राता नापि दाता न भर्ता ।।
त्वत्तो देव त्वं शरण्योऽकहर्ता ।
कुर्वात्रेयानुग्रहं पूर्णराते ।।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।। ४ ।।
धर्मे प्रीतिं सन्मतिं देवभक्तिम् ।
सत्संगाप्तिं देहि भुक्तिं च मुक्तिम् ।।
भावासक्तिंचाखिलानन्दमूर्ते ।।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।। ५ ।।
श्लोकपंचकमेतद्यो लोकमंगलवर्धनम् ।।
प्रपठेन्नियतो भक्त्या स श्रीदत्तप्रियो भवेत् ।। ६ ।।

।। इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वती विरचितं अघोरकष्टोद्धरणस्तोत्रं संपूर्णम् ।।

या स्तोत्राला कै. पंडित श्री. आत्मारामशास्त्री जेरे यांनी या स्तोत्राचे महत्त्व व माहात्म्य कथन करणारी एक अभ्यासपूर्ण

प्रस्तावना लिहिली असून त्यातील श्लोकांचा अन्वय, अर्थ व विवरणही लिहिले आहे. सर्व साधक, वाचक व अभ्यासूंच्या सोयीसाठी ते पुढे देत आहे.

**॥ घोरसंकटनिवारणपूर्वक श्रीदत्तप्रीतिकारकस्तोत्रम् ॥**

**प्रस्तावना :-**

कलियुगातील चतुर्थ दत्तावतार प्रात:स्मरणीय परमपूज्य परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमत् वासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराज यांचे वास्तव्य "कुरुगड्डी" क्षेत्री असताना त्यांनी हे स्तोत्र अंत:प्रेरणेने निर्माण करून श्रीक्षेत्र नरसोबाच्या वाडीस त्यांच्या आज्ञेने वास्तव्य करून असणारे त्यांचे पट्टशिष्य श्रीमत् प. प. नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज म्हणजेच प्रसिद्ध श्रीदीक्षितस्वामीमहाराज यांच्याकडे पोष्टाने श्रीस्वामीमहाराजांनी पाठविले. श्रीस्वामीमहाराजांचे बहुतेक सर्व लिखाण प. प. श्रीदीक्षितमहाराजांकडे असलेले मूळ लिखित ग्रंथ श्रीदीक्षितमहाराजांच्या समाधीनंतर अमरापूरचे ट्रस्टी श्री. कडेकर यांच्याकडे कोल्हापुरात आहेत. मी श्रीक्षेत्र नरसोबावाडीचाच राहणारा व तेथील पुजारी कुलातच जन्माला आलेला असल्याने व लहानपणापासूनच सहज भाग्योदयाने श्रीदीक्षितस्वामीमहाराजांचे सान्निध्य लाभल्याने शाळा सुटल्यानंतर सायसंध्या झाल्यावर श्रीमहाराजांच्या सान्निध्यात पंचपदी भजन करण्याचा लाभ मला होत असे. श्रीमहाराजांच्या दिव्य मूर्तीचे दर्शन व त्यांची कृपा इतर मुलांप्रमाणे माझ्यावरही होती. श्रीमहाराजांच्याजवळ बसावे, त्यांचे सान्निध्य असावे व असे त्यांचे स्वरूप किंवा महत्त्व न जाणताच मला वाटत होते. त्यांच्याजवळ असेच काही विलक्षण आकर्षण होते. अशा या सहवासात असतानाच हे स्तोत्र "कुरुगड्डी" हून श्रीदीक्षितस्वामी-

महाराजांकडे आले व श्रीमहाराजांनी लगेच रात्रीच्या भजनानंतर मलाहि ते दिले व हे पाठ करून ये अशी आज्ञा केली. त्यांच्या आज्ञेप्रमाणे ते मी पाठ केले व इतर एकादोघांना ते लिहूनही दिले. हे स्तोत्र रोज म्हणण्याची त्यांची आज्ञाही मला झाली व त्याप्रमाणे ते मी म्हणतही असतो. हल्ली तर श्रीक्षेत्र नरसोबाच्या वाडीस रोजच वारवार हे स्तोत्र म्हटले जाते. या स्तोत्राचा अनुभव अनेक लोकांना आला आहे व येतही आहे. आता हे स्तोत्र सर्वत्र अत्यंत प्रसिद्ध झाले आहे व सर्व भाविक लोक याचा अपूर्व अनुभव घेत आहेत. काहीजण तर याचा १०८ वेळा पाठ रोज करणारे आहेत व त्यांचे ऐहलौकिक व पारलौकिक कल्याण झालेले दिसत आहे. हे स्तोत्र संस्कृत आहे व हल्ली मलाही काही थोडे संस्कृत काशीतील परमपूज्य पंडित न्यायाचार्य महामहोपाध्याय श्री. वामाचरण भट्टाचार्य गुरुमहाराजांच्या सान्निध्याने 'र' 'ट' 'फ' का होईना येते. वाडीतील पुजारी कुलोत्पन्न श्री. शिवराम हरि पुजारी यांनी या स्तोत्राचे भाषांतर मराठीत करण्याविषयी शके १८५९ साली प्रेरणा केली. माझ्या बुद्धिमांद्यास अनुसरून श्रीस्वामीमहाराजांची सेवा म्हणून मी हे भाषांतर त्यावेळी करून ठेवले. '**यदेवविद्ययाकरोति**' या श्रुतीने अर्थ जाणून केलेल्या स्तोत्रपाठाचा अधिक उपयोग होतो असे आहे. '**योऽर्थज्ञइत्सकलभद्रमश्नुते**' या निरुक्तकारांच्या उक्तीप्रमाणेही अर्थज्ञानाचे महत्त्व आहेच. या स्तोत्रपाठाचा अनुभव मला व इतरांनाही आलेला आहे असे सहर्ष लिहावेसे वाटते. परमपूज्य श्रीगुळवणीमहाराजांच्या वासुदेव निवासातून प्रसिद्ध होणाऱ्या 'पंथराज' त्रैमासिकात भाषांतरासहित हे स्तोत्र प्रसिद्ध व्हावे अशी प्रेरणा श्री. केशवराव जोशी, संपादक पंथराज, यांना श्रींनी दिली व त्यांच्या आदेशा-

प्रमाणे मी हे भाषांतर माझे परमभाग्य उदयाला आले असे समजून, त्यांना प्रसिद्ध करण्यास देत आहे.

या स्तोत्रातील दुसऱ्या श्लोकात '**नो प्रभो**' असे वाक्य आहे. वाडीतील एका शास्त्रीबोवांनी '**नः नभो**' असे येथे असते तर व्याकरणदृष्टचा बरे झाले असते असा माझ्याजवळ प्रश्न उपस्थित केला. प. प. श्रीटेंबेस्वामीमहाराज हे दत्तावतार आहेत. त्यांची वाणी वज्रलेपाप्रमाणे पक्की आहे. तेव्हा यात काही आणखी अर्थ गूढ असला पाहिजे असे मनात आणून मी विचार करू लागलो. तो '**अप्रभो**' असे पद येथे काढले म्हणजे "**नास्तिप्रभुर्यस्य सोऽप्रभु तत्सबुद्धौ अप्रभो सर्वत्र इत्यर्थं नः अप्रभो नोप्रभो,**" असे वाक्य होऊन मला व त्यांना दोघांनाही आनंद झाला. पुढे काही दिवसांनी पूज्य श्रीगुळवणीमहाराजांच्या भेटीत सहज बोलता बोलता नोऽप्रभो-बद्दल विषय निघाला असता श्रीगुळवणीमहाराजांनी असे सांगितले की, "प्रत्यक्ष श्रीस्वामीमहाराजांना एका संस्कृततज्ज्ञ भक्ताने हाच प्रश्न विचारला व श्रीस्वामीमहाराजांनी अप्रभो असे येथे पद काढावे; कारण याच श्लोकात प्रभु या अर्थी "अधिप" असे पद आले आहे. "**त्वंपिताप्तोऽधिपः**" असे लिहून पुनः प्रभो लिहिण्यात पुनरुक्ती होईल म्हणून "**अप्रभो**" असे येथे संबोधन आहे, असे उत्तर दिले व ते पत्र आम्ही पाहिले आहे." असे श्रीमहाराजांचे वाक्य ऐकून मला परमानंद झाला. मला शंका विचारणारे शास्त्रीबुवा आधीच स्वर्गवासी झाल्याने त्यांना हे वृत्त कळविता आले नाही. एवढ्या-बद्दलच थोडा विषाद वाटला. असो. काही लोक आपल्या बुद्धि-प्रमाणे या स्तोत्रात "**न प्रभो**" असे म्हणणारे आहेत. त्यांनी या सर्व गोष्टींचा विचार करावा म्हणून हे सर्व विस्ताराने येथे लिहिले आहे. आता स्तोत्राच्या भाषांतरास आरंभ करू.

प्रथम या स्तोत्राचा श्लोक, त्याचा अन्वय व संक्षिप्त भाषांतर देऊन त्याचे विवरण नंतर केले आहे. यापासून भाविक भक्तांना आनंद झाला; तर भक्ताहून अभिन्न असणारे श्रीदत्तमहाराज यांनाच तो आनंद झाला असे मला वाटेल. श्रीदत्तमहाराज सर्वांचे अखंड कल्याण करोत अशी त्याच्या चरणी प्रार्थना आहे.

वास्तविक पाहता कोणत्याही ग्रंथाचा खरा अभिप्राय ग्रंथ-कर्त्यालाच समजत असतो. परंतु तो अर्थ आता मला श्रीस्वामी-महाराज कसे सांगणार ? म्हणून त्यांचे स्मरण करून " अकरणान्मंद-करणंश्रेयः ।, " या न्यायाने यथामती स्तोत्राचा अर्थ देत आहे. तो श्रीस्वामीमहाराजांनी मान्य करून घ्यावा.

## श्लोक पहिला

श्रीपादश्रीवल्लभ त्वं सदैव । श्रीदत्ताऽस्मान् पाहि देवाधिदेव ।।
भावग्राह्य क्लेशहारिन्सुकीर्ते । घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।।१।।

**अन्वयः** – भो देवाधिदेव श्रीदत्त श्रीपाद श्रीवल्लभ भावग्राह्य क्लेशहारिन् सुकीर्ते त्वं सदैवाऽस्मान् पाहि अस्मान् घोरात्कष्टात् उद्धर ते नमः ।। १ ।।

**अर्थ** :– हे देवाधिदेवा ! श्रीदत्ता ! श्रीपादा ! श्रीवल्लभा ! भावग्राह्या ! क्लेशहारका ! सुकीर्ते ! तू सर्वदा आमचे रक्षण कर. आमचा या घोर कष्टातून उद्धार कर. तुला नमस्कार असो. ।। १ ।।

**विवरण** – सकल ऐश्वर्यांनी संपन्न सर्व सत्ताधीश असे जे ब्रह्मा, विष्णू, महेश व तदधीन इंद्र, वरुण, यम, वायू प्रभृती तेहेतीस कोटी देव या सर्वांना आपल्यापासूनच हे महान् ऐश्वर्य प्राप्त झाले असल्यामुळे आपणच सर्व देवांचे अधिदेव आहात. याकरिता इतर सर्व देवांची स्तुती करण्याचे सोडून हे देवाधिदेवा आम्ही आपल्या

चरणाजवळच आपल्या श्रीचरणांची स्तुती करण्याकरिता आलो आहोत.

सहस्रार्जुन, अलर्क, आयु. यदुराजा, विष्णुदत्त प्रभृती अनेक भक्तांना आपण ऐहलोकी साम्राज्यादि लक्ष्मी, स्वर्गादि पारलौकिक संपत्ती व परमनिःश्रेयसरूप मोक्षलक्ष्मीरूप श्री दिली आहे. त्यामुळे श्रीदत्त हे आपले अन्वर्थक नाम आहे. हे ऐकून आम्ही आपल्या चरणाजवळ आलो आहोत.

श्रुतिस्मृतिपुराणात आपले " आप्तकाम " असे ब्रीद आहे. सर्व सद्‌गुणांना मंडन करणारे असे आपले चरणकमल आहेत, असा विचार करून महामाया लक्ष्मी हिने आपल्या पायांचा आश्रय केला. आपल्यापेक्षा या जगात श्रेष्ठ कोणीही नाही असे पाहून श्रीविषयी आपण विरक्त असताही श्रीनेच आपणास वरले आहे. म्हणून श्री आपल्या पायांचा आश्रय करीत आहे. अतएव आपणास श्रीपाद, श्री ज्यांच्या पायाचा आश्रय करते, हे नाव आहे. भक्तांना श्री देण्यास आपणास कठिण पडणार नाही हे जाणून आम्ही आपल्या चरणांजवळ आलो आहोत.

श्रीलक्ष्मी मातेने आपला विरह होऊ नये म्हणून आपल्या चरणांचा आश्रय केला. ती लक्ष्मीरूप श्री आम्हास दिल्यास आपल्या चरणांचा तिला वियोग होईल अशी शंका येऊ नये; कारण आम्हीही आपले अनन्य भक्त असल्याने आपल्या चरणांजवळच राहू. अर्थात् श्रीला आपल्या चरणांचा वियोग होणार नाही. शिवाय साध्वी स्त्रियांचे कर्तव्य पती आज्ञा पालन करणे हे आहे. महालक्ष्मी ही महासाध्वी असल्याने अस्मदनुग्रहरूप आपली आज्ञा ती मोडणार नाही. हे सर्व लक्षात आणून श्रीवल्लभ असे आपण आपले नाव ठेऊन घेतले

आहे. हे ऐकूनच आम्ही आपल्या चरणांजवळ याचनेकरिता आलो आहोत.

"आचाराच्छ्रियमाप्नोति" आचारापासून लक्ष्मीची प्राप्ती होते, असे मनुस्मृतिकारांचे वचन आहे. कलिकालातील लोक अनाचारी असल्यामुळे त्यांना श्री देता येत नाही अशी शंका घेण्याचे कारण नाही; कारण कर्माचरण यथासांग घडणे फार कठिण आहे. समर्थांनी "यथासांग तें कर्म कांहीं घडेना" असे उद्गार काढले आहेत म्हणूनच त्यांनी व इतर साधुसंतांनी सोप्या अशा भक्तिमार्गाचाच प्रसार कलिकालात चहूकडे केला. आपणास जाती, आचार, वय, रूप, कुल व शील हे काहीच प्रिय नसून केवळ भक्ती हीच प्रिय आहे. "भक्त्याहमेकयाग्राह्यः" असे उद्धवास आपण वचन दिले आहे. अजामिल, गणिका, गृध्र, व्याध वगैरे अनाचारी व दुराचारी लोकांवरही आपण त्यांची भक्ती पाहूनच अनुग्रह केला व आपले भावग्राह्य म्हणजे भक्तिवश असे ब्रीद गाजविले. तरी आमचा दुराचार व अनाचार यांकडे दुर्लक्ष करून आमच्या भोळ्या भावास आपण वश व्हाल या आशेने आम्ही आपल्या चरणी शरण आलो आहोत.

देहादिकांच्या ठिकाणी अहंपणा व पुत्रस्त्रियादिकांवर ममतारूप अज्ञान म्हणजे अविद्या, अस्मिता म्हणजे गर्व, विषयाच्या ठिकाणी आसक्ती म्हणजेच राग, शत्रुत्व म्हणजे अहितकर्ते जे लोक त्यांच्यावर क्रोध म्हणजे द्वेष, जाती कुलशीलादिकांचा अभिमान म्हणजे अभिनिवेश, हे अविद्याअस्मितारागद्वेषाभिनिवेशरूप पाच क्लेश आमच्या अंगी पूर्णपणे वास करीत असल्याने आम्ही कृपेस पात्र नाही. हे जरी खरे असले तरी या सर्व क्लेशांचे समूळ उच्चाटण करणें हे आपले ब्रीद आहे. हे ऐकून भो क्लेशहारिन् आपल्या चरणास आम्ही शरण

आहोत. आपण शरणागताची उपेक्षा केलेली ऐकिवात नाही व "मी शरणागताची उपेक्षा करणार नाही," अशी आपली प्रतिज्ञा आहे. तरी आपण ती प्रतिज्ञा मोडणार नाही अशी आमची पूर्ण खात्री आहे.

देवा ! आपण मृत सतीपतीला उठविले, अंत्यजाचे मुखातून वेद वदविले, साठ वर्षांच्या वंध्येला कन्यापुत्र दिले, शिरोळग्रामस्थ द्विजस्त्रीला पुत्र देऊन तो मृत झाला असता त्याला पुन्हा जिवंत केले, चोरहत वल्लभद्विजरूप उदिमास वाचविले, दीनकुष्टी विप्राचे अंग सुवर्णमय केले, त्रिविक्रमभारतीला विश्वरूप दाखविले, किडलेल्या काष्ठाचा प्रफुल्लित तरू केला, दीपावळीस अष्टरूप धारण करून स्वभक्तवांछा पुरविली, कुलवाडी शूद्र भक्तास हजारो खंडी धान्य दिले, अमरापुरस्थद्विजाचे दारिद्र्य हरण करून सुवर्ण कुंभ दिला, तंतुकाला एका क्षणात श्रीशैल्यास नेऊन आणले व नरकेसरीला सर्वदेवस्वरूप मीच आहे असे प्रत्ययास आणले. हे आपले गुणवर्णन करता करता शेषादिक सुद्धा थकले अशी आपली सुकीर्ती आहे. तरी हे सुकीर्ते गुरुराया ! या सर्व भक्तांप्रमाणे आमच्यावरही आपण कृपादृष्टी करा व आमची आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक अशी जी सर्व दुःखे, या दुःखांपासून व घोर कष्टांपासून आमचा उद्धार करा. आमच्या जवळ आपणास वश करण्याकरिता इतर भक्तांप्रमाणे काहीच साधने नाहीत. आमचा केवळ आपणास नमस्कार आहे. आपण नमस्कार प्रिय आहात. त्यानेच आपण संतुष्ट व्हावे व आम्हा दीनांवर अनुग्रह करावा अशी आपल्या चरण कमलापाशी आमची अनन्यभावाने प्रार्थना आहे. ॥ १ ॥

### श्लोक दुसरा

त्वं नो माता त्वं पिताऽऽप्तोऽधिपस्त्वम् ।
त्रातायोगक्षेमकृत्सद्गुरुस्त्वम् ॥

त्वं सर्वस्वंनोऽप्रभो विश्वमूर्ते ।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।। २ ।।

**अन्वय :–** हे अप्रभो विश्वमूर्ते त्वं नो माता त्वं नः पिता त्वंनप्त-स्त्वंनो आऽधिप स्त्वं नो योगक्षेमकृत् त्वं नः सद्‌गुरुस्त्वं नः सर्वस्वं अस्मान् घोरात्कष्टादुद्धर ते नमः ।। २ ।।

**अर्थ :–** हे अप्रभो ! ( नाही प्रभू ज्याला तो अप्रभू म्हणजे सर्वप्रभो ) सर्वप्रभो विश्वमूर्ते ! तू आमची माता पिता मालक योगक्षेम चालविणार सद्‌गुरू व सर्वस्व आहेस म्हणून आमचा या घोर कष्टातून उद्धार कर. तुला नमस्कार असो. ।। २ ।।

**विवरण :–** ज्याला दुसरा प्रभू असतो त्याला सप्रभू म्हणतात. देवा ! आपण सर्वांचे प्रभू असल्यामुळे नाही प्रभू ज्याला असे आपण अप्रभू आहात. सर्वेश्वर आहात. सर्व चराचरविश्व ही आपली मूर्ती असल्यामुळे आपण विश्वमूर्ती आहात. भूतभविष्य वर्तमान सर्व विश्व हे आपले सगुणरूप आहे. आपले स्वरूप या विश्वाहून वेगळे असे जरी दिसत असले; तरी " सर्वं खल्विदंब्रह्म " या श्रुती वाक्याने ते आपले स्वरूपच आहे.

हे सर्वेश्वरा ! विश्वमूर्ते ! मातापिता, आप्तेष्ट, राजा व रक्षक योगक्षेम करणारे म्हणजे प्रपंचात व परमार्थात भक्तास अपेक्षित असेल ते देऊन त्याचे रक्षण करणारे सद्‌गुरू या सर्व स्वरूपाने आपणच नटलेले आहात व त्या त्या रूपाने सर्व प्रजांचे पालन आपणच करीत आहात. हे मातापितादि सर्व लोक निमित्तमात्र आहेत. आपल्या सत्ते शिवाय जगात कोणतेही कार्य होत नाही. आपण पर्जन्य वृष्टीच केली नाही तर प्रजांचे जीवन कोण करील ? मातेच्या स्तनात दुग्धो-त्पत्तीच केली नाही तर माता शिशूचे रक्षण कसे करील ? जर आपण सामर्थ्य व ज्ञान दिले नाही तर रक्षक लोक रक्षणं कसे करतील ?

व शिक्षक तरी शिक्षण कसे करतील ? तर देवा ! आपणच खरे मातापिता वगैरे आहात. विश्व हे आपले नाटक आहे. त्याचे सूत्रधार आपण आहात. हे सर्व लोक खांबसूत्री बाहुल्याप्रमाणे परतंत्र व भवदधीन आहेत. असे आम्ही पूर्णपणे ओळखले असल्याने, आमच्या रक्षणाची किंवा योगक्षेमाची अथवा ज्ञानोपदेशाची याचना इतरांस न करता आमचे सर्वस्व आपण आहात असे जाणून आपल्या चरणास आम्ही शरण आलो आहोत. तरी हे सर्वेश्वरा आम्हाला या घोर संकटातून पार करा. आपल्या चरणाला आमचा नमस्कार असो. ॥ २ ॥

## श्लोक तिसरा

पापं तापं व्याधिमाधिं च दैन्यं ।
भीतिं क्लेशं त्वं हराऽशुत्वदन्यम् ॥
त्रातारं नो वीक्ष ईशास्तजूर्ते ।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ ३ ॥

अन्वय :—हे ईश त्वं पापं तापं व्याधिं आधिं दैन्यं भीतिं क्लेशं च आशु हर हे अस्तजूर्ते त्वदन्यं त्रातारं नो वीक्षे अस्मान् घोरात् कष्टात् उद्धर ते नमः ॥ ३ ॥

अर्थ :— हे ईश्वरा ! तू आमचे पाप, ताप, शारीरिक व्याधी, मानसिक आधी, दारिद्र्य, भीती व क्लेश यांचे सत्वर हरण कर. हे पीडानाशका ! तुझ्यावाचून अन्य त्राता आम्हाला दिसत नाही. याकरिता आमचा या घोर संकटातून उद्धार कर. तुला नमस्कार असो. ॥ ३ ॥

विवरण :— हे ईश्वरा ! आमच्याकडून या जन्मी पदोपदी घडत असलेल्या कायिक, वाचिक, मानसिक, सांसर्गिक, ज्ञात, अज्ञात

अशा सर्व पापांचे हरण करा. तसेच पूर्वीच्या अनंत जन्मांमध्ये साठलेल्या कायिकादि सर्व पापांचे समूळ उच्चाटन करा. तसेच पांचभौतिकांपासून होणारे आधिभौतिक ताप, भूत, प्रेत, पिशाच्च यक्षराक्षसादिकांपासून होणारे आधिदैविक ताप, शरीरास व्याधि-रूपाने व मनास आधिरूपाने जे पीडा करतात त्यांचा समूळ उच्छेद करा. सर्व सद्‌गुणांवर आच्छादन घालणारी दरिद्रता, व्याघ्रादि हिंस्रप्राणी व शत्रू, यमधर्म इत्यादिकांपासून वाटणारी भीती व पूर्वी वर्णन केलेले व त्याहून इतर सर्व क्लेश आम्हास फार पीडा देतात. त्या सर्वांचा नायनाट करा. पूर्वी रोगांनी सर्व प्रजा व्याप्त झाल्या असता अत्रिऋषी व पतंजलींचा अवतार धारण करून औषध योजनेने सर्वांची शारीरिक पीडा आपण नष्ट केली. भूतप्रेत-समंधादिकांपासून होणारी मानसिक व शारीरिक आधिव्याधी आपण घालविली. याबद्दल शिरोळ ग्रामीची द्विजस्त्री प्रभृतींची कथा ऐकिवात आहे व प्रत्यही आरतीसमयी शेकडो लोकांची बाधा दूर होत असलेले अनुभवात आहे. याकरिता आपणच खरे नष्ट झाली आहे जूर्ती पीडा ज्यांच्यापासून असे अस्तजूर्ती आहात. हे जाणून आम्ही आपणास शरण आलो आहोत. आमच्या शरीरात आजन्म वास करीत असलेले आधिव्याधी व कामक्रोधादि समंध यांचा समूळ उच्छेद करा. आपल्यावाचून दुसरा कोणीही त्राता आम्हास दिसत नाही. “ भय नाशन ” असे आपले ब्रीद आहे. तरी हे अस्तजूर्ते ! आमचा या घोर संकटातून उद्धार करा. आपणाला आमचा नमस्कार असो ॥ ३ ॥

## श्लोक चवथा

नान्यस्त्राता नापि दाता न भर्ता ।
त्वत्तो देव त्वं शरण्योऽकहर्ता ॥

कुर्वात्रेयानुग्रहं पूर्णराते ।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ ४ ॥

**अन्वय :–** हे देव त्वत्तोऽन्यस्त्राता न, दाता न, भर्ताऽपि न, त्वं शरण्यः अकहर्ताऽसि हे अत्रेय अनुग्रहं कुरु हे पूर्णराते घोरात्कष्टा-दस्मानुद्धर ते नमः ॥ ४ ॥

**अर्थ :–** हे देवा ! आम्हास तुझ्यावाचून दुसरा त्राता नाही. दाता नाही. भर्ताही नाही. तू शरणागत रक्षक व दुःखहर्ता आहेस. हे अत्रेया ! आमच्यावर अनुग्रह कर. हे पूर्णकामा ! घोर संकटापासून आमचा उद्धार कर. तुला नमस्कार असो. ॥ ४ ॥

**विवरण :–** हे देवा ! आम्हाला आपल्याशिवाय दुसरा त्राता कोणीही नाही. जगामध्ये आई, बाप, बंधू, बहीण वगैरे पुष्कळ त्राते आहेत, अशी सर्वांची समजूत आहे; परंतु खरा त्रातेपणा आपल्याच ठिकाणी आहे. श्रीतुकाराममहाराजांनी आपल्या अभंगात " काळाची ही उडी पडेल बा जेव्हां ॥ सोडविना तेव्हां मायबाप ॥ सोडविना बंधू पाठीची बहीण ॥ शेजेची कामीण दूर राहे ।। सोडविना राजा देशीचा चौधरी ॥ आणीक सोयिरी भली भली ।। तुका म्हणे तुज सोडविना कोणी ॥ एका चक्रपाणी वाचोनियां ॥ " असे वर्णन करून आपल्याशिवाय दुसरा त्राता नाही असे दर्शविले आहे. अंती धन जागच्या जागी राहते. पशू गोठ्यात, भार्या गृह-द्वारात, जन स्मशानापर्यंत व देह चितेपर्यंत येतो. सर्वदा बरोबर राहून रक्षण करणारे आपणच आहात. आपण धन–धान्यादिकांची समृद्धी व सद्बुद्धी दिल्यास इतर लोक दानशूर होतात. म्हणून आपल्यावाचून दाताही कोणी नाही. याप्रमाणे अन्नादिकाने दीन जनांचे पोषण करणारे लोक केवळ निमित्तमात्र आहेत. खरे पोषक भर्ता आपणच आहात. भगवन् ! आपण शरणागतांचे रक्षक व

आश्रय असे आहात. आजपर्यंत अनेक शरणागतांना आपण आश्रय देऊन त्यांचे रक्षण केले म्हणून आपले शरण्य हे ब्रीद आहे. आपण पूर्णराती म्हणजे पूर्ण काम नित्यतृप्त आहात आमच्यापासून आपल्यास कोणत्याही गोष्टीची अपेक्षा नाही. तरी हे अत्रिसुता! अत्रिऋषी व अनुसूया यांच्या भक्तिभावास भुलून जशी त्यांच्यावर कृपा केली तसाच अनुग्रह आपण आमच्या ठिकाणी भक्ती वगैरे काही नसताही करावा व आम्हास या घोर कष्टातून उद्धरावे. आमचा आपल्याला नमस्कार असो. ॥ ४ ॥

## श्लोक पाचवा

धर्मे प्रीतिं सन्मतिं देवभक्तिं ।
सत्सगाप्तिं देही भुक्तिं च मुक्तिम् ॥
भावासक्तिं चाखिलानन्दमूर्ते ।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ ५ ॥

**अन्वय :–** हे अखिलानंदमूर्ते देव धर्मेप्रितिं सन्मतिं भक्तिं सत्संगाप्तिं भुक्तिं मुक्तिं भावासक्तिं च देही अस्मान् घोरात्कष्टा-दुद्धर ते नमः ॥ ५ ॥

**अर्थ :–** हे अखिलानंदकारकमूर्ते देवा! आम्हाला धर्माच्या ठिकाणी प्रीती, भक्ती, मुक्ती व भक्तीच्या ठिकाणी आसक्ती देऊन सर्व घोर कष्टातून आमचा उद्धार कर. तुझे चरणारविंदी आमचे शतशः प्रणाम असो. ॥ ५ ॥

**विवरण :–** हे देवा! अखिलांना आनंद देणारी आपली मूर्ती आहे. आपण धारण केलेल्या सगुणरूपाकडे पाहात बसले असता सर्वांना परमानंद होतो. सर्वानंदाचा अंतर्भाव ज्यामध्ये होतो असा जो ब्रह्मानंद त्या ब्रह्मानंदाची आपण मूर्ती आहात. आपल्या मनोहर

निर्गुण पादुकांकडे व वदन कमलाकडे पाहणाऱ्यांची क्षुधा, तृषा, हरून जाऊन "ब्रह्मानंदी लागली टाळी। कोण देहाते सांभाळी॥" अशी अवस्था होते. तेथून चित्तवृत्ती बाहेरच येत नाही. यदाकदाचित् प्रारब्धवशात् जर ती चित्तवृत्ती बाहेर आलीच तर देवा पुन्हा ती आपल्या आनंदमय स्वरूपात लीन होण्याकरिता आपल्या भागवत धर्माच्या ठिकाणी व तदनुकूल श्रुतिस्मृत्युदित धर्माच्या ठिकाणी आमच्या अंतःकरणात प्रीती असावी. दुर्बुद्धीचा लय होऊन सर्वदा सत्स्वरूपाच्या ठिकाणी चित्तवृत्ती ठेवण्यास आम्हास चांगली बुद्धी असावी आणि ती बुद्धी सती म्हणजे पतिव्रतेसारखी एकनिष्ठ व अव्यभिचारिणी अशी व्हावी. प्रारब्धकर्मवशात् कोणत्याही योनीत जरी वारंवार जन्म आले; तरी आपल्या चरणारविंदी आमची दृढ भक्ती असावी. आपली अखंड सेवा आमच्या हातून घडावी. आपल्या स्वरूपात अखंड लीन असणारे संत व सद्गुरू यांची अखंड संगती असावी. दारिद्र्यादिकांपासून संतसंगतीत विघ्न न यावे म्हणून भुक्ती म्हणजे जं पोटभर अन्न व वस्त्र अर्थात् प्रपंचातील कोणत्याही गोष्टीची उणीव नसावी. सर्व सांसारिक बंधनांचा नाश होऊन अखंड, अद्वितीय, परिपूर्ण, सच्चिदानंद अशा आपल्या स्वरूपाशी ऐक्यरूप जी मुक्ती तीही व्हावी व मुक्तीच्या नंतरची जी भक्ती तिच्या ठिकाणी सर्वात्मना अंतःकरणात आसक्ती असावी. आपल्या यशः-कीर्तनाने व नामस्मरणाने ब्रह्मांड गाजविण्याचे सामर्थ्य जिच्या ठिकाणी आहे अशी जी भावासक्ती, ज्ञानोत्तर भक्ती, ती निरंतर हृदयात असावी, अशी आमची अखेरची व निर्वाणाची प्रार्थना आहे. तरी देवा ! श्रीपादश्रीवल्लभा !! श्रीनृसिंहसरस्वते !! आमचा घोर संकटातून उद्धार करून आमच्या सर्व कामना परिपूर्ण कराव्यात.

आमच्याजवळ आपणास संतुष्ट करण्यास दुसरे काहीच नाही म्हणून आपल्या चरणकमलास आमचे अनंत प्रणाम असोत. ।। ५ ।।

### श्लोक सहावा

श्लोक पंचकमेतद्यो लोकमंगलवर्धनम् ।।
प्रपठेन्नियतो भक्त्या स श्रीदत्तप्रियो भवेत् ।। ६ ।।

अन्वय :– लोकमंगलवर्धन मेतच्छ्लोकपंचकं नियतः
यः भक्त्याप्रपठेत् स श्रीदत्तप्रियोभवेत् ।।

अर्थ :– श्रीसद्गुरुमहाराज म्हणतात– सर्वांचे कल्याण करणारे हे श्लोकपंचक नियमपूर्वक नित्यशः भक्तिभावाने जो पठण करील तो मनुष्य श्रीदत्ताला अत्यंत प्रिय होईल व श्रीदत्तही उत्तरोत्तर या भक्ताला प्रिय होतील असा माझा आशीर्वाद आहे. ।। ६ ।।

।। श्रीगुरुदेवदत्त ॐतत्सत् श्रीगुरुदेवदत्त ।।

।। श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ।।



अशा रीतीने हे स्तोत्र श्रीस्वामीमहाराजांकडून करून मिळाल्यावर श्री. शेषो कारदगेकर यांनी आपली उपास्य देवता श्रीव्यंकटेश्वर यांवरही एक पद करून देण्यासंबंधी श्रीस्वामीमहाराजांची प्रार्थना केली. त्यांच्या प्रार्थनेप्रमाणे त्यांनी पुढील पद तयार करून दिले.

## ।। श्रीवेंकटरमणाचे पद ।।

शेषधरावरि जो हरि राहे । वेंकट ईश्वर मेश्वर नोहे ।।
निद्रित जो द्रुतकामित दे हा । मुद्रित जेथिल भावित देहा ।१।
जो नवकोटयधिपेश्वर वित्त । अक्षय राहत जेथिल वित्त ।
मत्त खलान्तक पातकहर्ता । चित्तचमत्कृतिकारक कर्ता ।। २ ।।

**जो जगदीश रमेश मुकुंद। कुड्मलदन्त लसत मुकुंद।**
**मुक्त करो निज भक्तजनांते। भक्तिविना न च जो धरि नातें ॥३॥**

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे जाताना श्रीकृष्णानदीत नाव न घालता भोपळ्याच्या सांगडीवर बसून किंवा भोपळे बांधलेल्या बाजेवर बसून जाण्याची प्रथा आहे. ही सर्व प्रथा माहीत असूनही रायचूरचे मामलेदार ज्या दिवशी श्रीक्षेत्र कुरवपूर येथे जाण्यास निघाले त्या दिवशी त्यांनी तेथे पडलेल्या एका जुन्या नावेतूनच जाण्याचा आग्रह धरला. त्यावेळी तेथील नावाड्याने त्यांना असे सांगितले की, " साहेब ! श्रीकृष्णा नदीला इतके भयंकर पाणी असताना नावेतून कुरवपूरला जाणे योग्य ठरणार नाही आणि आपण सांगता ती नाव तर जुनी झाली आहे. तरी कृपा करून आपण असा आग्रह धरू नका. एखाद्यावेळी नाव बुडण्याचा संभव आहे. " इतके सांगितले तरी मामलेदारांनी आपला आग्रह सोडला नाही. शेवटी अधिकाऱ्यांपुढे आपले काहीही चालणार नाही हे लक्षात घेऊन नावाड्याने नाईलाजाने मामलेदारांच्या बायकामुलांसह नाव पाण्यात घातली. ती नाव पाण्याच्या मध्यभागी येताच एका भोवऱ्यात सापडल्यामुळे सर्व जणांवर बुडण्याचे भीषण संकट कोसळण्याचा प्रसंग उपस्थित झाला. त्यावेळी नावेत बसलेले मामलेदार व त्यांची बायकामुले अगदि हवालदिल झाली. त्यामुळे मामलेदारांनी देवांची अशी प्रार्थना केली की, " प्रभो ! नावाडी आमच्या हिताचे सांगत असतानाही मी त्याचे ऐकले नाही. तरी आपण आमची नाव पुन्हा ऐलतीरावर लागू द्या म्हणजे बाजेवरून येऊन आपली महापूजा करू. आपण आमचा अंत पाहू नये. माझ्या अपराधाची आपण क्षमा करावी. " अशा प्रकारे मामलेदारांनी देवांची प्रार्थना व नवस करताच हळूहळू मोठ्या अकल्पितपणे नाव भोवऱ्यातून बाहेर निघाली व सुखरूप-

पणे पुन्हा अलीकडच्या तीराला लागली. त्यानन्तर तेथील प्रथेप्रमाणे ते मामलेदार व त्यांची बायकामुले बाजेवर बसून श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र कुरवपूर बेटावर गेली.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे आल्यावर मामलेदारांनी व त्यांच्या कुटुंबीय मंडळींनी प्रथम देवदर्शन केले व नन्तर ते श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी गेले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज श्रीपादश्रीवल्लभ ज्या वटवृक्षाखाली ध्यानाला बसत असत तेथे बसले होते. श्रीस्वामीमहाराजांनी डोक्यावर केस ठेवलेले मामलेदार आपल्याकडे नमस्कारासाठी येत असल्याचे पाहिल्याबरोबर ते तेथून उठून दुसरीकडे निघून गेले. आपल्याला पाहून श्रीस्वामीमहाराज दर्शन न देताच निघून गेले हे पाहून मामलेदारांना अत्यन्त खेद झाला; परन्तु त्याचे कारण मात्र त्यांना कळले नाही. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांचे परमप्रिय भक्त श्रीगांडामहाराज तेथेच उभे होते. त्यावेळी मामलेदारांनी श्रीगांडामहाराजांना असे विचारले की, " श्रीस्वामीमहाराजांनी आम्हाला दर्शन का दिले नाही ?" त्यावेळी श्रीगांडामहाराज मामलेदारांना असे म्हणाले की, " आपण ब्राह्मण असूनही डोक्यावर केस ठेवले आहेत. श्रीस्वामीमहाराज डोक्यावर केस ठेवलेल्या ब्राह्मणाचे मुखही पाहत नाहीत व त्याला आपले दर्शनही घेऊ देत नाहीत. " हे ऐकताच मामलेदार श्रीगांडामहाराजांना असे म्हणाले की, " आपण श्रीस्वामीमहाराजांकडे जाऊन मला केव्हा व कसे दर्शन होईल ते तरी विचारून घ्या. ते सांगतील त्याप्रमाणे मी करीन. "

मामलेदारांनी केलेली ही विनंती ऐकून श्रीगांडामहाराज श्रीस्वामीमहाराजांकडे गेले व त्यांनी मामलेदारांची प्रार्थना श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी निवेदन केली. ती ऐकल्यावर

श्रीस्वामीमहाराज श्रीगांडामहाराजांना असे म्हणाले की, " मामले-दारांना सांगा की, आज उपोषण करून उद्या क्षौर करा. असे केले तरच दर्शन होईल. अन्यथा आलात तसेच परत जा."

श्रीगांडामहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांचा हा निरोप मामलेदा-रांना जसाच्या तसा कथन केला. त्यांनीही श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा शिरसावंद्य मानून त्या दिवशी उपोषण केले. मात्र त्या दिवशी त्यांच्या सर्व मंडळींनी जेवण केले. दुसऱ्या दिवशी मामलेदार क्षौर करून श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेल्यावर त्यांना त्यांचे दर्शन झाले व जेवण्यासही परवानगी मिळाली; पण क्षौर केल्यामुळे त्या दिवशी शास्त्रनियमाप्रमाणे त्यांना श्रीस्वामीमहाराजांची पूजा करता आली नाही. मात्र तिसऱ्या दिवशी मामलेदारांनी श्रीस्वामीमहा-राजांची व श्रीदेवांची महापूजा करून सर्वांना भंडारा केला. त्या दिवसापासून ते मामलेदार फार भाविक व आस्तिक बनले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांचा आचारा-बद्दल किती पराकाष्ठेचा आग्रह होता हे स्पष्ट होईल. या दृष्टीनें महर्षी श्रीवसिष्ठ, श्रीपराशर व श्रीदक्ष यांच्या स्मृतीतील पुढील वचने मोठी अभ्यसनीय अशी आहेत. श्रीस्वामीमहाराजही कृतिशील स्मृतिकार होते हेच यावरून स्पष्ट होते.

आचारः परमो धर्मः सर्वेषामिति निश्चयः ।
हीनाचार परीतात्मा प्रेत्य चेह विनश्यति ॥ वसिष्ठ स्मृति ॥१६६॥
नैनं तपांसि न ब्रह्म नाग्निहोत्रं न दक्षिणाः ।
हीनाचारमितो भ्रष्टं तारयन्ति कथंचन ॥ १६७ ॥
आचारहीनं न पुनन्ति वेदा यद्यप्यधीताः सह षड्भिरंगैः ।
छन्दांस्येनं मृत्युकाले त्यजन्ति नीडं शकुन्ता इव जातपक्षाः ॥१६८॥

आचारहीनस्य तु ब्राह्मणस्व वेदाः षडंगास्त्वखिलः सयज्ञाः ।
कां प्रीतिमुत्पादयितुं समर्था अन्धस्य दारा इव दर्शनियाः ।।१६९।।
नैनं छन्दांसि वृजिनात्तारयन्ति मायाविनं मायया वर्तमानम् ।
द्वेप्यक्षरे सम्यगधीयमाने पुनाति तद्ब्रह्म यथावद्दिष्टम् ।। १७० ।।
दुराचारी हि पुरुषो लोके भवति निन्दितः ।
दुःखभागी च सततं व्याधितोऽल्पायुरेव च ।। १७१ ।।
आचारात्फलते धर्ममाचारात्फलते धनम् ।
आचाराच्छ्रियमाप्नोति आचारो हन्त्यलक्षणम् ।। १७२ ।।
सर्वलक्षणहीनोऽपि यः सदाचारवान्नरः ।
श्रद्दधानोऽनसूयश्च शतं वर्षाणि जीवति ।। १७३ ।।

अर्थ :– आचार हाच सर्व लोकांचा परमधर्म आहे हे नितान्त सत्य आहे. जो हीनाचाराने वागतो तो या संसारात व मेल्यावर परलोकातही नाश पावतो अर्थात् त्याची दुर्गती होते. ।। १६६ ।। आचारहीन पुरुषाला तप, वेद, अग्निहोत्र आणि दक्षिणा इत्यादि सर्व गोष्टी कोणत्याही प्रकारे तारू शकत नाहीत; कारण की, आचारहीनतेमुळे तो अत्यंत भ्रष्ट होऊन जातो. ।। १६७ ।। जो पुरुष आपल्या आचारापासून च्युत होतो त्याने षडंगासहित उत्तमप्रकारे वेदाध्ययन केले असले; तरीही वेद त्याला पवित्र करू शकत नाहीत. ज्याप्रमाणे पंख उत्पन्न झाल्यावर पक्षी आपल्या घरट्यांचा त्याग करतात त्याप्रमाणे मृत्यूसमयी आचारहीन पुरुषाचा वेद त्याग करतात. ।। १६८ ।। ज्याप्रमाणे पाहण्यास योग्य असलेली अशी सुन्दर पत्नी आंधळ्या पतीला आपल्या रूपलावण्याने कोणत्याही प्रकारे आनन्द देऊ शकत नाही त्याप्रमाणे जो ब्राह्मण आचारशून्य किंवा आचारहीन होतो त्याला यज्ञ व षडंग वेद हे कोणत्याही प्रकारचे प्रेम देण्यास समर्थ होऊ शकत नाहीत. ।। १६९ ।। मायेने युक्त

असलेल्या मायावी ब्राह्मणाचा वेद पापापासून उद्धार करीत नाहीत. विधिपूर्वक व उत्तमप्रकारे वेदाचे अध्ययन केल्यावरही वेद पूर्ण आचाराने सम्पन्न अशा पुरुषालाच पवित्र करतात. ॥ १७० ॥ दुराचारी मनुष्य संसारात निन्देला पात्र होतो. त्याचप्रमाणे तो अत्यन्त दुःख भोगणारा व सर्व व्याधींनी ग्रस्त व अल्पायुषी होतो. ॥ १७१ ॥ आचारामुळेच धर्माचे फळ मिळते आणि आचारामुळेच धनही सफल होते. आचारामुळेच मनुष्य लक्ष्मीची प्राप्ती करू शकतो. जर ह्याच आचार दुष्ट स्वरूपाचा असला तर तो लक्षणहीन पुरुषाला नष्ट करतो. ॥ १७२ ॥ जर समस्त लक्षणांनी विरहित असा पुरुष सदाचार संपन्न असेल तर तो श्रद्धायोग्य व निन्दारहित होतो आणि शंभर वर्षेपर्यन्त जिवन्त राहतो. ॥ १७३ ॥

आचारः प्रथमो धर्मः श्रुत्युक्तःस्मार्त एव च ।
तस्मादेत्समायुक्तं गृण्हीयादात्मनो द्विजः ॥ दक्षस्मृति ॥ १ ॥
आचाराल्लभ्यते पूजा आराल्लभ्यते प्रजा ।
आचारादन्नमक्षय्यं तदाचारस्य लक्षणम् ॥ २ ॥
आचारात्प्राप्यते स्वर्गं आचारात्प्राप्यते सुखम् ।
आचारात्प्राप्यते मोक्षं आचारार्त्कि न लभ्यते ॥ ३ ॥
तस्मात्—चतुर्णामपि वर्णानामाचारो धर्मपालकः ।
आचारभ्रष्टदेहानांभवेद्धर्मः पराङ्मुखः ॥ पराशरस्मृति ।३७।

अर्थः—श्रुती म्हणजे वेद व स्मृती यांनी कथन केलेल्या आचाराचे काटेकोरपणे पालन करणे हाच पहिला धर्म आहे. याकरिता ब्राह्मणाने हा आचार शिकून घेऊन त्याप्रमाणे वागणे हे त्याचे कर्तव्य आहे. ॥ १ ॥ आचारामुळेच पूजा, प्रजा व निरन्तर अन्नाची प्राप्ती होत असते. ॥ २ ॥ त्याचप्रमाणे आचारामुळेच स्वर्ग, सुख व

मोक्ष प्राप्त होतो. खरोखर आचारामुळे कोणती गोष्ट प्राप्त होणार नाही ? ।। ३ ।।

याकरिता चारही वर्णांचा आचार हाच धर्माचे पालन करणारा असतो. आचारापासून भ्रष्ट झालेल्या पुरुषाचे किंवा स्त्रीचे शरीर हे धर्मविरुद्धच असते अर्थात् अशा स्त्रीपुरुषांची काया ही धर्महीन व बुद्धी ही धर्मभ्रष्ट असते. ।। ३७ ।।

या दृष्टीने उपरोक्त कथेला अनुसरून श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीकृष्णालहरी स्तोत्रातील ११ व्या श्लोकावर श्रीक्षेत्र नरसोबा-वाडी येथील पंडित श्रीवामनशास्त्री उपाध्ये यांनी जे टीकात्मक विवरण केले आहे ते पाहण्यासारखे आहे. ते असे म्हणतात की, " मुंडनाच्या योगाने मस्तकावरील केसांचा आश्रय करून वास्तव्य करणारी पापे दूर होतात. त्यामुळे मस्तकावरील केस हे पापांचे आश्रयस्थान आहे हे सिद्ध होते. परन्तु साम्प्रतकाली पाश्चात्य लोकांच्या संसर्गाने किंवा सौंदर्य नष्ट होईल या भीतीने –

यानि कानि च पापानि ब्रह्महत्यासमानि च ।
केशानाश्रित्य तिष्ठन्ति तस्मात्केशान्वपाम्यहम् ।।

असा मंत्र म्हणून मस्तकावरील केस तसेच ठेवून दाढीमिशांचे वपन केले जाते ते यथाशास्त्र होते काय ? याचा विचार करणे आवश्यक आहे. " शिखाकक्षोपस्थवर्ज्यं केशश्मश्रुलोमनखानि-वापयित्वा, क्षौरं तु दक्षिणकर्णमूलमारभ्य हनुश्मश्रुवामकर्णमूलशिरो-भागस्थ केशकृंतननखच्छेदमेव " अशी नारायणभट्टीतील वाक्ये आहेत. यातील श्मश्रू या शब्दाने दाढी व मिशा एवढेच ग्रहण करण्याबद्दल रघुवंश व छांदोग्योपनिषद् यामध्ये प्रमाण आहे व " तद् वृद्धौ श्मश्रुपुंमुखे " असा अमरकोश आहे. म्हणजे पुरुषाच्या मुखावर वाढलेले रोम यांना श्मश्रू अशी संज्ञा आहे. यावरून

श्मश्रू या पदाने मुखभागावरील केश ( म्हणजे दाढी व मिशा ) यांचेच ग्रहण होत असल्यामुळे केवळ या केसांच्या वपनाने मुंडन होते असे मानले तर वरील वाक्यामध्ये " शिखाकक्षोपस्थवर्ज्यं केशश्मश्रुलोमनखानि " असे जे भिन्न शब्द आहेत त्यातील शिखा वर्ज्यं करून केसांचे वपन सांगणे व्यर्थं होईल. यावरून असे सिद्ध होते की, मस्तकावरील केसांचेही वपन झाले पाहिजे. दुसऱ्या वाक्यामध्ये शिरोभागस्थ केस असे स्पष्ट म्हटलेच आहे; कारण मुंडन यातील मूळ शब्द मुंड असा असून याचा अर्थं " मुंडं शिरः " असा केला आहे व त्यापासून वपनार्थंक मुंडन असा शब्द झाला आहे. मस्तकावरील केस काढणे म्हणजे मुंडन करणं असा याचा अर्थं होतो. मुंडन, वपन, क्षौर हे शब्द एकाच अर्थाचे आहेत व पापेही मस्तकावरील केसांचा आश्रय करून राहतात असे पूर्वी सांगितलेच आहे. यावरून मुंडन, वपन अथवा क्षौर हे मस्तकावरील केसांसुद्धा श्मश्रुलोमादिकांचे झाले पाहिजे असे धर्मशास्त्र आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेला सश्रद्ध–अश्रद्ध आणि आस्तिक–नास्तिक इत्यादि सर्वच लोक पात्र असत. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेचे फळ चाखल्यावर तर अश्रद्ध माणसेही सश्रद्ध बनत असत यात काहीच शंका नाही. सोलापूर येथील एका ब्राह्मणाची बायको फार आजारी होती. श्रीस्वामीमहाराज अत्यन्त गुणकारी अशी औषधे देतात व असाध्य रोगांवर दैवी उपाय सांगतात अशी त्यांची कीर्ती ऐकून ते गृहस्थ आपल्या पत्नीला घेऊन श्रीक्षेत्र कुरवपूर येथे आले. त्या स्त्रीला पाहताच तिच्या रोगाचे निदान करून श्रीस्वामीमहाराजांनी तिच्या हातात बांधण्यासाठी एक यंत्र तयार करून दिले. त्यामुळे त्या स्त्रीची प्रकृती उत्तम झाली. त्यानन्तर

ती स्त्री श्रीक्षेत्र कुरवपूरला एक दोन दिवस थांबून पुन्हा सोलापूरला परत आली. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी दिलेल्या यंत्रामुळे त्या स्त्रीची प्रकृती विनासायास व सहजासहजी सुधारल्यामुळे तिला त्याची विशेष किंमत वाटली नाही. विशेष पैसा खर्च न करता मिळालेल्या यंत्रामुळे तिची प्रकृती बरी झाली होती; तरी त्या स्त्रीने अधिक सावधगिरीच्या दृष्टीने पुन्हा डॉक्टरांचे औषध सुरू केले. ज्या दिवशी तिने औषध घेतले त्याच रात्री श्रीदेवांनी तिला स्वप्नामध्ये येऊन असे विचारले की, " तुझा आमच्यावर विश्वास नाही तर आम्ही दिलेले ते यंत्र हातात कशाला बांधले आहेस ? ते आमचे आम्हाला परत दे. " असे सांगून श्रीदेवांनी ते यंत्र तिच्या हातातून काढून जवळच टाकून दिले.

दुसऱ्या दिवशी सकाळी जाग आल्यावर त्या स्त्रीने आपल्या हाताकडे पाहिले, तर हातात यंत्र नाही, हे तिच्या तत्काळ लक्षात आले. त्याबरोबर आपणास रात्री पडलेले स्वप्न खरे होते याची तिला जाणीव झाली. त्यानन्तर अंथरुणावरून उठून तिने शोधाशोध करताच ते यंत्र दूर अंतरावर जाऊन पडलेले सापडले. त्यानन्तर तिच्या यजमानांनी ही सर्व हकीकत श्रीस्वामीमहाराजांना पत्राने कळवून त्यांच्याकडून दुसरे यंत्र मागितले. हे पत्र मिळताच श्रीस्वामी-महाराजांनी त्या गृहस्थांना असे कळविले की, " श्रीदेवांनीच आपल्या सौ. पत्नीच्या हातातून यंत्र काढून घेऊन ते दूर टाकून दिल्यामुळे त्यांना ही गोष्ट पसंत नाही हे स्पष्ट आहे. तरी श्रीदेवांनी ही गोष्ट नाकारल्यामुळे आता यापुढे आपल्याला दुसरे यंत्र मिळणार नाही. "

श्रीस्वामीमहाराजांनी लिहिलेले हे पत्र वाचून दोघेही पतिपत्नी सुन्न झाले. त्यातच ती स्त्री पुन्हा आजारी पडली. त्यामुळे ते ब्राह्मण-गृहस्थ आपल्या सौ. मंडळींना घेऊन श्रीक्षेत्र कुरवपूर येथे आले. त्या

उभयतांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेऊन त्यांची अंतःकरणपूर्वक क्षमा मागितली व पुन्हा असे घडणार नाही म्हणून आश्वासन दिले. त्यांनी क्षमायाचना करताच श्रीस्वामीमहाराजांचे कोमल हृदय तत्काळ द्रवले व ते त्यांना असे म्हणाले की, " श्रीदेवांची क्षमा मागा व त्यांना शरण जा. " श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे उभयतांनी श्रीदेवांची क्षमा मागितल्यावर त्यांनी त्या स्त्रीला पुन्हा एक यंत्र व स्तोत्र करून दिले. त्यामुळे त्या स्त्रीची प्रकृती बरी होऊन तिचा संसार सुखाचा झाला.

ही सर्व कथा वाचली म्हणजे स्थूलार्थाने प्रकृतीसाठी व परार्थाने मोक्षप्राप्तीसाठी श्रद्धेची किती नितान्त आवश्यकता आहे याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. शास्त्रकारांनी नित्यानित्य-वस्तुविवेक, वैराग्य, शम, दम, उपरती, तितिक्षा, श्रद्धा व समाधान ही षट्संपत्ती व ममुक्षत्व हे साधन चतुष्टय सांगितले असून त्यातील श्रद्धारूपी साधनसंपत्तीचा श्रीस्वामीमहाराजांना अभिप्रेत असलेला अपरंपार महिमा पुढील विवेचनामुळे आपल्या मनावर ठसून त्याप्रमाणे आपले आचरणघडून आले; तर ईश्वरप्राप्तीचा मार्ग सुलभ झाल्याशिवाय राहणार नाही.

साधन षट्संपत्तीतील पाचवा गुण श्रद्धा हा आहे. " सर्ववेदान्त-सिद्धान्तसारसंग्रहामध्ये " श्रीमदाद्यशंकराचार्यांनी श्रद्धेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

गुरुवेदान्तवाक्येषु बुद्धिर्या निश्चयात्मिका ।
सत्यमित्येव सा श्रद्धा निदानं मुक्तिसिद्धये ।। २१० ।।

श्रीगुरू व वेदान्त वाक्य ह्या मुक्तीच्या सिद्धीला कारणीभूत होणाऱ्या सत्य गोष्टी आहेत अशी ज्याची निश्चयात्मक बुद्धी असते तिला श्रद्धा असे म्हणतात. वेदांनी " श्रद्धापत्नी व श्रद्धावित्तौ "

म्हणून श्रद्धेचा गौरव केला आहे. " श्रद्धावीर्यस्मृतिसमाधिप्रज्ञापूर्वक इतरेषाम् ।। ३० ।।" असे भगवान् पतंजलींनी " योगदर्शनातील " समाधिपादात सूत्र घालून ज्यांना नैसर्गिक, स्वयमेव व काही साधन केल्याशिवाय निरोध होत नाही ते लोक श्रद्धा, वीर्य, स्मृती, समाधी आणि प्रज्ञा या पाच गुणांच्या साहाय्याने कैवल्य अवस्था प्राप्त करून घेतात, असे म्हटले आहे. श्रीगुलाबरावमहाराजांनी श्रद्धेला माता असे म्हटले असून तिच्यामुळेच ऋतंभरा प्रज्ञा प्राप्त होते, हे स्पष्ट केले आहे.

श्रीभगवंताच्या प्राप्तीसाठी श्रद्धेची साधनसंपत्ती साधकाजवळ असणे नितान्त आवश्यक असल्याने श्रीकृष्णनाथांनी " श्रीमद्-भगवद्गीतेत " अन्वय-व्यतिरेक अशा दोन्ही पद्धतींनी श्रद्धेची आवश्यकता प्रतिपादन करताना असे म्हटले आहे की–

श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ।।४.३९।।
अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ।।४०।।
योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।
श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः ।।६·४७।।
अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परन्तप ।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ।।९·३।।
सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ।।१७·३।।
अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत् प्रेत्य नो इह ।।१७·२८।।

अर्थ :– श्रद्धावान्, श्रीसद्गुरूंनी दिलेल्या साधनेत व उपासनेत

अत्यन्त आसक्त व तत्पर असलेल्या आणि जितेन्द्रिय म्हणजे विषयांपासून इंद्रियांना ज्याने निवृत्त केले आहे अशा साधकालाच ज्ञान प्राप्त होते. असे ज्ञान प्राप्त होताच त्या साधकाला तत्क्षणी भगवत् प्राप्तिरूप परम शांती प्राप्त होते. आत्म्याला अर्थात् भगवत् विषयाला न जाणणारा, त्याचप्रमाणे श्रद्धारहित व संशयी पुरुष परमार्थापासून भ्रष्ट होतो. त्यातही संशयी पुरुषाला तर सुख होत नाही. तसेच त्याला हा लोकही नसतो व परलोकही साधत नाही. अर्थात् असा साधक दोन्ही लोकी भ्रष्ट होतो. सर्व साधक योग्यांमध्ये जो माझ्या ठिकाणी अन्तःकरण लावून श्रद्धेने मला निरन्तर भजतो तो योगी मला सर्वात् श्रेष्ठ वाटतो. हे शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना ! ज्यांच्या अन्तःकरणात उपासनारूपी किंवा साधनरूपी धर्मावर श्रद्धा नसते त्यांना माझी प्राप्ती होत नसल्यामुळे ते जन्ममृत्युरूप संसारचक्रामध्येच भ्रमण करीत राहतात. हे अर्जुना ! सर्वांची श्रद्धा ज्यांच्या त्यांच्या प्रकृतिस्वभावानुसार बनलेली असते. हा मनुष्यप्राणी श्रद्धाशीलच आहे. ज्याची जशी श्रद्धा असेल तशाच प्रकृतीचा तो असतो. हे अर्जुना ! अश्रद्धेने केलेले हवन, दिलेले दान, आचरलेले तप किंवा इतर कोणतेही कर्म असत् असे म्हटले जाते.

श्रीमद् भगवद्गीतेतील उपरोक्त श्लोकांवर योगिराज श्रीश्यामाचरण लाहिडी महाशयांनी आपल्या "आध्यात्मिक दीपिकेत" प्रकाश टाकून श्रद्धेचा जो गूढार्थ स्पष्ट केला आहे तो सर्व साधक वाचकांनी लक्षात घेतला तर श्रीस्वामीमहाराजांनी व श्रीदेवांनी उपरोक्त कथेत ज्या कृतिद्वारा श्रद्धेच्या नितान्त आवश्यकतेचे प्रकटीकरण केले त्यातील परार्थ लक्षात येऊन प्रत्येकाचा आपला साधन मार्ग सुकर झाल्याशिवाय राहणार नाही.

"श्रद्धापूर्वक इंद्रियसंयम करून साधन केल्याने साधनाच्या परावस्थेत राहून "मी कोणीही नाही, माझे काहीही नाही," अशी अवस्था अत्यन्त लवकर प्राप्त होते. धर्मसाधनाकरिता श्रद्धा ही इतर सर्वांपेक्षा उपयुक्त अशी वस्तू आहे. ज्या साधकाच्या ठिकाणी श्रद्धा व विश्वास असत नाही, तो हा साधन समुद्र पार करून श्रीभगवन्ताच्या चरणी शरणागत होऊ शकत नाही. त्याच्या जीवनातील अशान्ती कधीही संपू शकत नाही या दृष्टीनेच योगी याज्ञवल्क्य महर्षी असे म्हणतात की–

श्रद्धाविधिसमायुक्तं कर्म यत्क्रियते नृभिः ।
सुविशुद्धेन भावेन तदानन्त्याय कल्पते ।।

कोणतेही कर्म असले तरी जर मनुष्य ते श्रद्धापूर्वक विशुद्धभावाने करू शकला तर ते कर्म त्याला अनन्त फल दिल्याशिवाय राहात नाही.

महाभारतामध्ये असे लिहिले आहे की, श्रद्धाहीन मनुष्याचे अन्न कधीही खाऊ नये. श्रद्धाविरहित माणसाला यज्ञानुष्ठामध्ये कसलाही अधिकार असत नाही. ज्याप्रमाणे एका बाजूला अश्रद्धा हे सर्वात् मोठे पाप आहे त्याचप्रमाणे श्रद्धा हा सर्वश्रेष्ठ पापनाशक उपाय आहे. श्रद्धावान् माणसालाच ज्ञान प्राप्त होते. श्रद्धापूर्वक साधनाभ्यास केल्यावर साधनाची परावस्था निश्चित प्राप्त होते. या परावस्थेपेक्षा परम शान्तिमय अशी दुसरी कोणतीही वस्तू नाही. याचे कारण काय आहे ? याचे कारण असे आहे की, साधक साधन तर करतात; परन्तु आपले श्रीसद्गुरू आणि त्यांनी केलेल्या उपदेशावर त्यांची उत्कट श्रद्धा असत नाही. श्रीसद्गुरूंनी शक्तिसंक्रमणपूर्वक दीक्षादान करून दिलेले साधन करता करता ते इतरही निरनिराळ्या प्रकारची साधने करीत राहतात. अशा प्रकारे इतर

साधने करीत राहणे हे अश्रद्धधान पुरुषाचे लक्षण आहे. असा मनुष्य साधनाचा महिमा समजू व जाणू शकत नाही. काही काही साधकांची साधनावर श्रद्धा व विश्वास असल्यामुळे मधून मधून त्यांना खूप फळ मिळते; परन्तु अशा साधकांचीही तीव्रतम निष्ठा असत नाही. बहुतांशी साधकांमध्ये आळस सोडून देऊन दररोज नियमितपणे साधन करण्याचे सामर्थ्य असत नाही. साधक साधनात तत्पर व आळसरहित झाल्याशिवाय श्रद्धा असली; तरी त्याला चांगले फळ मिळत नाही. काही काही साधक श्रद्धाळू व साधनात तत्पर असतात; परन्तु त्यांच्या ठिकाणी इन्द्रियसंयमाचा अभाव असतो. त्यामुळे अपेक्षित ज्ञान किंवा साधनाची परावस्था प्राप्त करणे शक्य होत नाही. श्रद्धा, तत्परता आणि इंद्रियसंयम या तिन्ही गोष्टी असल्या तरच ज्ञानाची प्राप्ती होते किंवा साधनाच्या परावस्थेचा तत्काळ उदय होतो. साधनाची परावस्था प्राप्त झाल्यावर परमानन्द किंवा अनन्त शान्ती साधकाला प्राप्त होते. याकरिता श्रीगुरूंवर आणि शास्त्रवाक्यांवर ज्यांची अचल श्रद्धा असते, जे निष्ठायुक्त असतात अर्थात् जे नियमपूर्वक साधन करतात आणि ज्यांची इंद्रिये ताब्यात आहेत त्यांना ज्ञानप्राप्ती होण्याला वेळ लागत नाही. ।। ४.३९ ।।

मूर्ख व श्रद्धाहीन व्यक्ती संशयात राहात असल्यामुळे त्याला इहकालात व परकालात सुख होत नाही. तीन प्रकारचे लोक साधनाभ्यास करीत नाहीत. (१) जे लोक मूर्ख आहेत ते परम-तत्त्व उत्तम प्रकारे समजू शकत नाहीत; कारण कोणत्या प्रकारे मनुष्य जीवनाची सार्थकता होते यासंबंधी कसलीही भावना किंवा विचार त्यांच्या मनात उदित होत नाही. हे लोक पशुवत् आहार, निद्रा, भय, मैथुन आदि गोष्टींमध्येच जीवन व्यतीत करतात.

(२) जे लोक श्रद्धाहीन आहेत, ते बुद्धिमान् जरी असले; तरी त्यांची श्रीभगवन्तावर किंवा श्रीभगवत्प्राप्तीच्या उपायांवर श्रद्धा असत नाही. कधीकधी ते (बुद्धिमान् असल्यामुळे) साधनाचे रहस्य जाणूनही त्यावर आस्था ठेवीत नाहीत आणि त्यासाठी परिश्रम करण्याकरिता उद्युक्त होत नाहीत. "हे सर्व केल्याने काय होईल?" असेच ते म्हणतात आणि त्यांच्या ठिकाणी आत्माभिमान अर्थात् अहंकार खूप असतो. (३) जे लोक संशयात्मा असतात त्यांचा परलोकासंबंधी निश्चय असत नाही अर्थात् नुसता संदेह त्यांच्या मनाला सतत व्याकुळ करीत असतो. या लोकांच्या मनात श्रीगुरुवाक्याबद्दल सन्देह, शास्त्रवाक्याबद्दल सन्देह आणि परलोक आहे किंवा नाही याबद्दलही सन्देह असल्यामुळे परलोकाला साधनभूत असलेले अनुष्ठान केल्याने कोणता लाभ होईल? अशा प्रकारचे सर्व सन्देह होतात. असे लोक संसारातही पुत्र, मित्र, पत्नी, श्रीगुरू इत्यादि कोणावरही विश्वास ठेवू शकत नाहीत. त्यांना सर्वांच्या व्यवहाराबद्दल सतत संशय वाटत राहतो. हे संशयी लोक जरी लोकांना दाखविण्यासाठी श्रीगुरूंपाशी जाऊन उपदेश घेत असले; तरी त्यांची त्यांच्यावर श्रद्धा असत नाही. असे संशयी साधक श्रीगुरूंमध्ये आणि त्यांनी दिलेल्या साधनामध्ये दोष काढीत बसतात. त्यानन्तर बहुतेक करून एक दिवस ते असा प्रश्न विचारतात की, "हे सर्व तुच्छ व क्षुद्र असे दगडधोंडे खेळून काय होणार आहे? आमचे श्रीगुरुमहाराज तर आमच्या सारखेच खातात-पितात, हिंडतात-फिरतात आणि सुखाकरिता धावपळ करतात. त्यांनाही काही प्राप्त होत नाही ते सांगतात त्या गोष्टी होताना काही दिसत नाहीत. हे लोक संसारातील लोकांना फसवीत फक्त फिरत असतात." असे त्यांच्या मनात भाव

व विचार असतात. या तीन प्रकारच्या लोकांपैकी कोणीही साधन करीत नाही. या लोकांमधील अज्ञ माणसाला गती प्राप्त होणे सहजसाध्य, सुकर किंवा सुखसाध्य आहे, अश्रद्धाळू माणसाला गती प्राप्त होणे बहुयत्न साध्य आहे; परन्तु संशयी माणसाला गती प्राप्त होणे हे बिल्कुल असाध्य आहे. जो संशयात्मा असतो त्याला इहलोकात सुख होत नाही; कारण की, तो कोणावरही अन्तःकरणा-पासून विश्वास करीत नाही. या माणसाचे आपले स्वतःचे नातेवाई-कही त्याच्या मनाच्या दोषांमुळे नेहमी अशान्ती भोगतात आणि अशान्तचित्त असल्यामुळे तो सांसारिक सेवाही उत्तम प्रकारे करू शकत नाही. सर्वांबद्दल त्याला संदेह वाटत असल्यामुळे त्याचा कोणावरही विश्वास बसत नाही. त्यामुळे त्याचा कोणी बंधू किंवा आत्मीय होऊ शकत नाही. संशयी माणसाला घरातील किंवा बाहेरील कोणत्याही माणसापासून कसलेही सुख मिळण्याची आशा असत नाही. त्याचा परलोकावरही विश्वास असत नाही. त्यामुळे धर्मानुष्ठान न केल्यामुळे परलोकाचे सुखही त्याच्या भाग्यात असत नाही. जर त्याचा तसा विश्वास असता तर त्याने तदनुरूप कार्य केले असते. त्यामुळे संशयी माणसाला इहलोकी व परलोकी कोठेही सुख होत नाही. ॥ ४.४० ॥

साधनाच्या परावस्थेत राहिल्यामुळे ज्याचे मन नेहमी ब्रह्मामध्ये राहते तो मला जाणू शकतो. मला जाणल्यावरच सर्व इंद्रियसंयम होतो. योग्यांमध्ये भक्तयोग्यालाच श्रीभगवन्ताचा श्रेष्ठ योगी असे म्हटले आहे. याचे कारण असे आहे की, जोपर्यंत मनात अगाध श्रद्धा असत नाही तोपर्यंत सुदुर्गम अशा योगपथाचे कोणीही अतिक्रमण करू शकत नाही. "यथा देवे तथा गुरौ" या न्यायाने ज्याचे प्राण

सहस्राराकडे अधिक प्रमाणात खेचले जातात त्याच्या समोर श्रीभगवन्ताचे स्वरूप प्रकाशित होते. भक्त निराळा आणि योगी निराळा असे होऊ शकत नाही. जो योगी आणि श्रीभगवद्भक्त आहे त्यालाच योगाभ्यास सुगम होतो. श्रीभगवन्ताला जाणण्यासाठी योगी होणे आवश्यक आहे. परन्तु योगी जर भक्त असेल अर्थात् त्याला श्रीभगवन्ताबद्दल अत्यधिक आसक्ती असेल; तर त्याला योगाभ्यास सुखकर होतो. ज्यावेळी साधकाच्या मनात "मी इतका कठोर अभ्यास किंवा प्रयत्न कोणाकरिता करतो आहे ?" असा प्रश्न उपस्थित होतो तेव्हा त्याला "प्रेष्ठो भवान् तनुभृतां किल बन्धुरात्मा" म्हणजे जो प्रियतम जीवमात्रात्म्याचा बन्धू व परम सुहृद आहे त्याच्यासाठीच सर्व प्रयत्न मी करतो आहे; कारण की, तो सर्वांचा "आत्मा" आहे, असे उत्तर मिळते. आत्मसंस्थ झाल्याशिवाय कोणालाही आत्मसाक्षात्कार होणे शक्य नाही. ज्याच्यामुळे साधक आत्मसंस्थ होतो त्या उपायालाच योगाभ्यास असे म्हणतात. श्रीभगवन्ताला योग्याचे चित्त ही मोठी आदराची वस्तू असते. त्या चित्तामध्ये श्रीभगवंताशिवाय इतर कोणत्याही विषयाचा तरंग किंवा संस्कार असत नाही. त्याचे चित्त केवळ स्वभावात परिपूर्ण राहते व ते आपल्या निजानन्दात मग्न असते. जीवात्मा परमात्म्याच्या सर्वात जवळ असतो. ज्यावेळी जीवात्मा विषय व्याकुळ होऊन देहादिच्या संबंधामुळे बांधला जातो त्यावेळी आपण कोण आहोत आणि कोणाचे आहोत हे काहीही त्याच्या लक्षात येत नाही. अचिन्त्य अशा भाग्याचे फळ म्हणून जेव्हा प्राणांना स्थिर करणाऱ्या अभ्यासाच्या द्वारा प्राणापासून उत्पन्न होणारे संस्कारक्षीण होतात त्यावेळी त्याच्या बरोबर मनाची संसार प्रवृत्तीही कमी कमी होत जाते. ज्यावेळी मनातून संसार पूर्णपणे निघून जातो त्यावेळी मन व आत्मा

यांच्यामध्ये कोणताच पडदा किंवा अडथळा राहात नाही. विषयांपासून निःशेषपणे मुक्त झालेले मन, ज्यावेळी " यथागङ्गाम्भसोऽम्बुधौ " म्हणजे श्रीगंगानदी सागराला जाऊन मिळते त्यावेळी ती जशी सागराशी एकरूप होते त्याप्रमाणे परमात्म्याशी अविच्छिन्न भावाने एकरूप होते. हीच युक्ततम आणि भक्ताची अवस्था आहे; कारण की, या अवस्थेत आत्म्याला परमात्म्याशिवाय आणखी दुसरा कोणताही आधार किंवा आश्रय राहात नाही. हेच सर्वात्मक भावाचे आत्मसमर्पण आहे. ज्याप्रमाणे समुद्रात मिळाल्यावर श्रीगंगानदीचे निराळे नामरूप राहात नाही त्याप्रमाणे आत्मसमर्पण करणाऱ्या योगयुक्त झालेल्या योग्याचे चित्त पुन्हा निराळे असे राहात नाही. परमात्म्याशी ते एकरूप होते. हेच परमपद आहे. असे अनेक मतांचे लोक आहेत की, जे योगशास्त्रानुसार योगाभ्यास करतात आणि योगफळ म्हणून काही ना काहीतरी बाह्य विभूती–ऐश्वर्य प्राप्त करतात; परन्तु श्रीभगवन्ताची प्राप्ती केल्याशिवाय खरे प्राण जोडलेच जात नाहीत. त्यामुळे नास्तिक योगी काही ना काही तरी योगैश्वर्य प्राप्त केल्यानंतरही परमपद किंवा मोक्षपद प्राप्त करू शकत नाहीत. याकरिता असे लक्षात घेतले पाहिजे की, श्रीभगवन्तांनी साधक-योग्याला सावध करताना असे म्हटले आहे की, योगाभ्यास केल्यावरही जर श्रीभगवन्तावर पूर्ण श्रद्धा, विश्वास व निर्भरता राहिली नाही तर इतका योगाभ्यास केल्यावरही कोणताही विशेष लाभ होणार नाही. ॥ ६.४७ ॥

जे पुरुष ब्रह्मात राहात नाहीत व साधन करीत नाहीत ते मला प्राप्त होत नाहीत. मला प्राप्त न केल्यामुळे ते आत्म्यापासून निवृत्त होऊन अन्य वस्तूंमध्ये आसक्तिपूर्वक दृष्टी ठेवून विषयभोगात अर्थात् फलाकांक्षेसाठी कर्मांचा व्यापार करतात. या फलाकांक्षेच्या भोगा-

साठीच जन्म आणि मृत्यू यांचे चक्र सुरू राहते. द्रष्टा आणि दृश्य यांचा जेव्हा एकत्रित सम्बन्ध येतो तेव्हा त्याला द्रष्टयाचा भोग असे म्हणतात. जेव्हा या जगत् आदि विषयांबरोबर " मी " चा सम्बन्ध होतो तेव्हाच जगदादि विषय " मी " च्या भोगाच्या रूपाने सम्बन्धित होतात. त्यातील काही विषय सुखरूपाने व काही नियम दुःखरूपाने प्रकाशित होतात. या विषयांचे संस्कार चित्तामध्ये मुळातच निहित असल्यामुळे दुःखाबद्दल द्वेष आणि सुखाबद्दल आसक्ती होते. या आसक्तीमुळे व द्वेषभावामुळेच जीवाला बन्धन प्राप्त होते. जरी पुरुषामध्ये म्हणजे आत्म्यामध्ये केवळ दृष्टत्वभाव असला तरी हा भाव बुद्धीच्या विरुद्ध अर्थात् बुद्धी न जाणणारा असल्या कारणाने बुद्धीच्या बन्धनामुळे आपल्याला बन्धनग्रस्त समजतो. ज्ञानेन्द्रियांच्या व कर्मेन्द्रियांच्या द्वारा ज्या प्रकारचे विषय ग्रहण केले जातात त्या प्रकारचीच चित्तात त्या विषयांसंबंधीची धारणा उत्पन्न होते. त्या धारणेमुळे सुख – दुःखाचा संस्कार उत्पन्न होतो. त्यामुळे काही विषयांचा त्याग आणि काही विषयांचे ग्रहण करण्याची प्रवृत्ती उत्पन्न होते. व्युत्थित चित्तात हे संस्कार जागृत होऊन ग्रहण आणि त्याग बुद्धीला प्रवृत्त करतात. मलिन बुद्धीत द्रष्टा आणि दृश्याच्या भेदाचे ज्ञान होते आणि त्या बुद्धीत निश्चयात्मक वृत्ती असल्याकारणाने भेदज्ञान नाहीसे होत नाही. यामुळेच संसार प्रवाह अविरत गतीने चालत राहतो. या चित्ताच्या द्वारा धर्मसाधन केले; तरी तो धर्माचा व्यापारच होतो. त्यामुळे यथार्थ भगवन्मुखीप्रवृत्तीचा उदय होत नाही. या अवस्थेत सांसारिक विषयभोग त्याज्य आहेत असे वाटत नाही. उलट ते ग्राह्य व उत्कृष्ट आहेत असे वाटते. सत्संग आणि शुद्ध बुद्धीच्या प्रभावाने द्रष्टा व दृश्याचा निराळेपणा निश्चित झाल्यावर मनोवेगाचा ऱ्हास होतो; परन्तु पूर्वसंचित

विषयज्ञानाचे संस्कार प्राणामध्ये राहात असल्यामुळे चंचल प्राणाच्या आवागमनाबरोबर ते सर्व संस्कार मनात आणि तेथून इंद्रियांमध्ये पुनरावर्तित होतात. यामुळे चित्ताला शुद्ध करावयाचे असेल; तर प्रथम प्राणाला शुद्ध करावे लागते. साधनाच्या द्वारा प्राणाचे हे सर्व संस्कार क्षीण केले जातात. प्राणामधील कोणत्याही चिन्तनाचा संस्कार नष्ट झाल्यावर तो पुन्हा मनामध्ये येऊ शकत नाही. या कारणामुळे शुद्ध प्राणांमध्ये विषयासक्ती असत नाही. त्यावेळी चित्ताचे स्पंदनही राहात नाही. अशा प्रकारचे निरूद्ध चित्तच जीवाच्या जन्ममरणाचा बाध करणारे असते. प्राण शुद्ध करणे किंवा चित्ताला स्पंदनरहित करणे हेच साधनाचे एकमात्र उद्दिष्ट असते. जो साधक साधन करीत नाही त्याचे चित्त एकाग्र होऊन आत्म्यामध्ये स्थिर राहू शकत नाही. हे चित्त आत्म्याबरोबर योगयुक्त होऊ न शकल्यामुळे ते विषयांमध्ये राहण्याचा प्रयत्न करते. त्यामुळे अशा प्रकारचे श्रद्धाभक्तिशून्य जीव परमानन्दाच्या लाभापासून वंचित राहिल्यामुळे पुनःपुन्हा जन्ममृत्यूच्या चक्रात सापडतात. जीवांचा प्राणप्रवाह बहिर्मुख असल्या कारणाने जीवांची विषयासक्ती दूर होत नाही. त्यामुळे त्यांचा अज्ञानान्धकार कायम राहतो.

**न साम्परायः प्रतिभाति बालं प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम् ।**
**अयं लोको नास्ति पर इति मानी पुनः पुनर्वशमापद्यते मे । कठ. उ. ।**

विवेकहीन मनुष्याच्या समोर साम्पराय म्हणजे परलोकात सद्‌गती प्राप्तीचे निमित्त होणारे साधन–विशेष प्रकट होत नाही. ज्या मनुष्याचे चित्त प्रमादी म्हणजे पुत्रधनादिमध्ये आसक्त झालेले असते व जो पैशांमुळे उत्पन्न होणाऱ्या मोहाने अत्यन्त मूढ झालेला असतो. अशा मनुष्याच्या समोरही साम्पराय प्रकट होत नाही आणि जे लोक असे मानतात की, हे विशेषपणे दिसणारे जगतच खरे आहे

व अप्रत्यक्ष असे कोणतेच लोक नाहीत ते अभिमानग्रस्त जीव वारंवार होणाऱ्या मृत्यूने मला ( यमाला ) वश होतात. ते आस्तिक्य बुद्धीने युक्त असले; तरी आत्मज्ञानाच्या प्राप्तीचा मार्ग जाणत नसल्याने या जन्ममरणयुक्त अशा सुखदु:खाच्या अग्निमय ज्वाळांमध्ये निरन्तर दग्ध होत राहतात. ॥ ९.३ ॥

जो सत्त्वगुणात राहतो अर्थात् साधन करतो तो ब्रह्माच्या अणूमध्ये राहतो. त्यालाच पुरुषोत्तम म्हणतात. तो ब्रह्ममय आहे. साधनाच्या परावस्थेत जो राहतो तो ब्रह्मच होतो. विशिष्ट संस्कारयुक्त अन्तःकरणालाच सत्त्व असे म्हणतात. अन्तःकरणाच्या प्रकाशस्वभावाच्या कारणामुळे त्याला सत्त्व असे म्हणतात. ज्या अंत:करणात ज्या प्रकारचा संस्कार प्रबल असतो त्या संस्कारानुसार माणसाची श्रद्धा असते. गुण-संमिश्रणामुळेही निरनिराळ्या प्रकारची अंत:करणे होतात. या कारणामुळे श्रद्धेत विभिन्नता दिसून येते. श्रद्धा अन्त:करणाचा धर्म आहे. त्यामुळे कोणीही पूर्णपणे श्रद्धाहीन असू शकत नाही. जीवात जरी कोणताही गुण प्रबल असला तरी सत्त्वगुण थोडा तरी असतोच. त्यामुळे त्याच्या ठिकाणी थोडीतरी श्रद्धा राहतेच. यामुळेच जीवाला श्रद्धामय म्हणतात. हे निश्चितच खरे आहे की, अत्यन्त तम:प्रधान लोकांमध्ये सत्त्वगुण अत्यन्त अस्फुट राहत असल्यामुळे त्यांच्या ठिकाणी सात्त्विक वृत्तीचे कार्य अत्यन्त थोडे असे दृष्टीस पडते. जे लोक केवळ लोकाचाराच्या मात्रेचे अनुसरण करून कार्य करतात त्यांच्या श्रद्धेचा उत्कर्ष होत नाही. श्रद्धेचा उत्कर्ष करण्याकरिता शास्त्रज्ञान आणि साधनाची आवश्यकता असते. श्रीसद्गुरू आणि वेदान्तवाक्य यांच्यावरील दृढ विश्वासालाच श्रद्धा असे म्हणतात; परन्तु अन्त:करण अशुद्ध राहिले तर सात्त्विक अशा दृढ श्रद्धेचा उदय होत नाही. साधकाच्या

दृढ श्रद्धेमुळेच साधनविषयामध्ये त्याचे चित्त दृढतापूर्वक जडून राहते. श्रीमद्भगवद्गीता असे सांगते की, श्रद्धावान् लोक अर्थात् जे तत्पर आणि संयतेन्द्रिय आहेत तेच ज्ञान प्राप्त करतात. ज्ञान-प्राप्तीनन्तरच परमशान्ती प्राप्त होते. जो साधक जितके मन लावून साधन करील तितकी त्याची सत्त्वसंशुद्धी होईल. सुषुम्णेमध्ये प्राणधारा प्रवाहित झाल्यावर ब्रह्माणूमध्ये साधकाला स्थिती प्राप्त होते आणि त्यानन्तर साधनाच्या परावस्थेमध्ये साधक ब्रह्मरूप होऊन जातो.

साधनाच्या परावस्थेमध्ये ब्रह्मभावाशिवाय इतर कोणताही भाव राहात नाही. त्यावेळी साधक गुणातीत होतो. परन्तु साधनाच्या परावस्थेच्या खालच्या पातळीवर अथवा साधन करता करता जेव्हा मन काही प्रमाणात स्थिर होते; परन्तु पूर्ण निरोधावस्थेची प्राप्ती होत नाही त्यावेळी मनात विषयांचे चिन्तन न राहिल्यामुळे ती सत्त्वगुणाचीच अवस्था असते. त्या अवस्थेची प्राप्ती झाल्यावर साधनामध्ये जो उग्र प्रयत्न होतो त्यामुळे ध्यान आणि ध्यानामुळे समाधी प्राप्त होते. मुक्तीकरिता अत्यधिक तीव्र इच्छेमुळे मुक्तीच्या प्राप्तीचा जो प्रयत्न होतो तीच सात्त्विकी श्रद्धा आहे. श्रद्धा ही "चेतसः सम्प्रसादः।" आहे म्हणजे श्रद्धेमुळे चित्ताची प्रसन्नता होते. या स्थितीत चित्तामध्ये मलाचा अंश अधिक प्रमाणात राहत नसल्यामुळे साधनात प्रयत्नाचे प्राबल्य राहते. या प्रयत्नाच्या प्राबल्यामुळे चित्त महास्थिरतेमध्ये प्रवेश करते. ज्याप्रमाणे समुद्राच्या घनगंभीर तळाशी बुडी मारून लोक रत्नसंग्रह करतात त्याप्रमाणेच समाधिमग्न योगी ज्ञानरत्न प्राप्त करून कृतकृत्य होतात. जितक्या प्रमाणात सत्त्वगुणाची वृद्धी होते तितक्या प्रमाणात अणुसदृश ब्रह्माची अनुभूती होऊ लागते. सात्त्विक, राजस आणि

तामस गुणांपासून समुद्भूत झालेली प्रकृती ही ब्रह्माचाच विलास आहे. साधक जितक्या अधिक प्रमाणात साधन करील तितक्या अधिक प्रमाणात तो तमोगुणाचे अतिक्रमण करून गुणातीत अवस्थेत पोहचू शकेल. ।। १७.३ ।।

ब्रह्मामध्ये न राहता होम करणे अर्थात् साधनातील आपोआप होणाऱ्या ॐकाराच्या क्रियेला वाव देणे, दान म्हणजे साधनदान करणे आणि तपस्या करणे अर्थात् कूटस्थानामध्ये राहणे ही सर्व कर्मे ब्रह्मामध्ये न राहता केल्याने ती असत् होतात. यामुळे साधकाचे इहलोकात व परलोकात कल्याण होत नाही. कर्म जर तदर्थीय झाले नाही तर ते असत् होते. कर्म तदर्थीय कसे होते ? श्रद्धेसहित साधन केल्याने अभिमान नष्ट होतो. अभिमानपूर्वक केलेले कर्म शुभ असले; तरी ते शुभ फल देत नाही. जे लोक श्रीगुरूपदेश आणि शास्त्रोपदेश अमान्य करून स्वेच्छाचाराने कार्य करतात त्यांचे कार्य कधीही सात्त्विक असत नाही अर्थात् त्या कार्यामुळे साधकाचे प्राण कधीही सुषुम्नेत प्रविष्ट होत नाहीत. प्राण सुषुम्नेत चलित झाल्यावर जर साधकाने कार्याचे अनुष्ठान केले; तर ती सर्व सात्त्विक कर्मे होतात.

अशा प्रकारे जे कर्म सात्त्विक असत नाही त्यात प्रवृत्ती प्रबळ राहत असल्याने असे कर्म इहकालात आनन्ददायक आणि परकालात मंगलप्रद होत नाही. सात्त्विक भावाने कर्म होणे आवश्यक आहे; कारण की, सात्त्विक भाव अर्थात् सुषुम्नेत प्राण प्रवाहित झाल्याशिवाय कोणालाही आत्मसाक्षात्कार होत नाही आणि कोणीही स्थूलसूक्ष्म देहादिंच्या पलीकडेही जाऊ शकत नाही. जोपर्यंन्त स्थूल आणि सूक्ष्म देहरूप उपाधी राहतात तोपर्यंन्त कोणाच्याही ठिकाणी मूळच्या ज्ञानभक्तीचा उदय होत नाही.

ज्यांचा श्वास इडा पिंगलेतून प्रवाहित होतो ते ज्ञानप्राप्तीचे अधिकारी असत नाहीत. याकरिता ज्यामुळे श्वास सुषुम्नेत प्रवाहित होतील, अशा प्रकारच्या साधनेचा प्रयत्न करणे आवश्यक आहे. यामुळे ब्रह्मात स्थिती प्राप्त होईल. ब्रह्मात स्थिती झाल्याशिवाय वाटेल तर ॐकार क्रिया करा किंवा कूटस्थात राहा अगर हजारो-हजार लोकांना क्रियादान करा, यामुळे कोणतेही महत्त्वाचे कल्याण प्राप्त होणार नाही. या सर्व क्रियांचे फल म्हणून बाह्यसिद्धी प्राप्त होऊ शकते; परन्तु कामोपभोगाचे अतिक्रमण करू न शकल्यामुळे सर्व गोष्टी असत्य ठरतात अर्थात् मूलतः कल्याण होत नाही. परन्तु जे साधक सांसारिक लाभहानीची उपेक्षा करून प्राणपणाने प्रीतिपूर्वक नियमितरूपाने साधन करतात त्यांचे परिश्रम सफल होतात. त्यांचे कर्म भगवत्प्रीत्यर्थ होते. त्यामुळे त्यांची जागतिक फलाकडे दृष्टी राहात नाही. ते शुद्ध अशा श्रीअच्युताच्या चरणांकडे दृष्टी ठेवून धावत जातात. अशा प्रकारे साधकांच्या सर्व कर्मांचे अनुष्ठान श्रीभगवन्ताच्या उद्देशानेच होते. याकरिता त्याच्याकडून केला गेलेला आहार, विहार, पूजा, साधन करणे व साधन देणे इत्यादि सर्व कर्मे सात्त्विक होतात. अशा प्रकारे योगी सत्त्वशुद्धीची अवस्था प्राप्त झाल्यावर भक्ती आणि ज्ञानप्राप्तीचे अधिकारी होतात. या अधिकार प्राप्तीसाठीच श्रीभगवन्तांनी "ॐ तत् सत्" या मंत्राचा उपदेश केला आहे. हा मंत्र जे जाणतात व त्याचे साधन करतात त्यांनाच अधिकाराची प्राप्ती होते, अन्यथा लोकांना दाखविण्याकरिता केलेल्या साधनाने कोणतेच फल हाताला लागत नाही. ॥ १७·२८ ॥

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे श्री. श्रीपादराव या नावाचे एक ब्राह्मण

सेवेकरी राहात होते. ते आपल्या आईवडिलांचे श्राद्ध करीत नव्हते. एके दिवशी श्रीस्वामीमहाराज वटवृक्षाखाली एकान्तात ध्यानाला बसले असताना श्री. श्रीपादराव यांचे वडील ब्राह्मण-रूपाने श्रीस्वामीमहाराजांपुढे येऊन उभे राहिले व ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज! श्रीपाद हा माझा मुलगा असून तो माझे व त्याच्या आईचे श्राद्ध करीत नाही. त्यामुळे आम्ही दोघेही नेहमी भुकेलेले असतो. तरी आपण माझ्या मुलास श्राद्ध करण्याची आज्ञा करा म्हणजे आम्ही तृप्त होऊ. आपण आज्ञा केली म्हणजे तो हे काम करील असे वाटते. आमच्याकरिता आपण कृपाकरून एवढे काम करावे अशी आपल्या चरणी आमची नम्र प्रार्थना आहे." इतकी प्रार्थना करून श्री. श्रीपादराव यांच्या वडिलांनी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घातला व ते अंतर्धान पावले.

त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी श्री. श्रीपादराव यांना बोलावून घेऊन त्यांना असे सांगितले की, "आपण आपल्या आईवडिलांचे श्राद्ध करीत असावे. आपल्या तीर्थरूपांनी येऊन समक्ष सांगितल्या-मुळे हे आम्हाला माहीत झाले. आपण पितरांना अन्न (पिंड) व पाणी ( तर्पण ) देत नसल्यामुळे ते अतृप्त आहेत. आपले पितर तृप्त झाले म्हणजे आपले कल्याण होईल; तरी आपण पितरांचे श्राद्ध करून कल्याणभागी व्हावे."

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांनी कितीतरी प्रकारांनी श्री. श्रीपादराव यांना आपल्या आईवडिलांचे श्राद्ध करण्याविषयी सांगितले. श्री. श्रीपादराव यांनी ते सर्व एका कानाने ऐकले व दुसऱ्या कानाने सोडून दिले; कारण श्राद्धादि गोष्टींवर त्यांचा विश्वास नव्हता. श्री. श्रीपादराव श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्या-

वरही आपले श्राद्ध करीत नाही असे पाहून त्यांचे वडील संतप्त झाले व ते त्यांना पीडा देऊ लागले. पहिल्या प्रथम थोडासा त्रास दिल्यावर आपला मुलगा सुधारेल व श्राद्धादि कर्म करून आपल्याला तृप्त करील असे श्री. श्रीपादराव यांच्या वडिलांना वाटले होते; परन्तु आपल्या त्रासाचा मुलावर काहीच परिणाम होत नाही असे दिसून आल्यावर त्यांच्या वडिलांनी तीव्रतम त्रास देऊन शेवटी श्री. श्रीपादराव यांचे प्राण हरण केले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे पितरांच्या श्राद्धादि गोष्टी किती महत्त्वाच्या आहेत व श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञाभंगाच्या पातकाचे फळ किती भयंकर आहे याची जाणीव झाल्याशिवाय राहात नाही. श्राद्ध हे वैदिक कर्म असल्यामुळे ते करणे हे नितांत आवश्यक आहे. पितरांना अन्नपाणी देऊन त्यांना तृप्त केल्याने ते आपले कल्याण चिन्तून आशीर्वाद देत असतात. या दृष्टीनें श्राद्धादि गोष्टींचा जो शास्त्रीय विचार डॉ. श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी " श्राद्धप्रयोग " या ग्रंथात प्रस्तुत केला आहे त्यातील पुढील भाग अत्यन्त मननीय असा आहे. ते असे म्हणतात की –

" श्राद्ध हे कृत्य विशेषतः कृतज्ञता बुद्धीचे आहे. ज्यांच्यामुळे आपण या जगात सुखासमाधानाने नांदत आहोत व ज्यांनी आपल्यासाठी कष्ट सोसले त्यांच्या प्रीत्यर्थ कृतज्ञता बुद्धीने श्राद्ध-विधी करावयाचा असतो. हा विधी थोड्याफार फरकाने प्रत्येक धर्मात आढळतो. बौद्ध, जैन, ख्रिस्ती, मुसलमान वगैरे सर्व लोकात श्राद्धविधी विभिन्न प्रकारे केला जातो; परन्तु श्राद्धविधीने मृत जीवाला समाधान कसे प्राप्त होईल यासंबंधीची सर्वाधिक मीमांसा आपल्या धर्मग्रंथातच आढळते. ( असे असले; तरी तज्ज्ञ पुरोहित-वर्गाचा अपुरेपणा आणि धार्मिक कृत्यांविषयी प्रचलित सुशिक्षितात

आस्तिकपणाचा अभाव, हे या दुरवस्थेचे मुख्य कारण आहे. हा नास्तिकपणाचा दोष केवळ गृहस्थांमध्येच नाही; तर पुरोहित वर्गात आणि स्त्री वर्गातही दृष्टोत्पत्तीस येतो. नवीन पद्धतीच्या शिक्षणाचा हा परिणाम आहे, असे म्हणणे एका अर्थाने खरे आहे.

आपल्या धर्मातील प्रत्येक विधी किंवा संस्कार यांकडे पाहिले असता आपणास असे दिसून येईल की, प्रत्येक मनुष्याची अत्यन्त सुलभ प्रकारे उन्नती व्हावी, त्याला सहज उत्क्रान्त होता यावे, मनावर विशेष परिणाम घडावा आणि त्याला उत्कर्षाच्या पायऱ्या चढावयास सुलभता उत्पन्न करावी, या हेतूने सर्व धर्मविधी व संस्कार रचले आहेत.

**श्राद्धविधीतील धर्मविधिक्रम :–**

श्राद्धातील मूलभूत कल्पना ध्यानात घेतल्यानंतर, श्राद्धातील धर्मविधीमध्ये काही विशेष क्रम आहे, आणि तो अत्यन्त संयुक्तिक आहे, असे कोणासही म्हणावे लागेल. श्राद्धाचा क्रम, त्यातील मंत्र त्यामध्ये केल्या जाणाऱ्या क्रिया, त्याकरिता करावयास लागणारी तयारी, या गोष्टी अत्यंत विचारपूर्वक ठरविल्या असल्या पाहिजेत, यात संशय नाही.

**मरणोत्तर स्थिती :–**

सध्या आपल्याकडील विद्वान् लोकांची विचारसरणी काही एका विशिष्ट प्रकारची झाली आहे. व्यवहार किंवा मोक्ष यांच्यामध्ये काही टप्पे आहेत, ही गोष्टच विचारात घेण्यात येत नाही. धार्मिक लोक जन्म–मरण, स्वर्ग–नरक, बन्ध–मोक्ष, या दोन टोकांच्या गोष्टी पुढे ठेवून विचार करीत बसतात. परंतु या साऱ्याच अवस्थांमध्ये परस्परांमध्ये किती अंतर असते, त्यामध्ये किती ठिकाणी

आपणास मुक्काम करावे लागतात, किती लोकांच्या साहाय्याची त्यासाठी आवश्यकता असते आणि त्यासाठी किती मोठा प्रवास करावा लागतो, या गोष्टींचा विचार आपण करीत नाही. मनुष्याच्या आत्म्यास मरणोत्तर जो अनेक ठिकाणी प्रवास करावा लागतो, आणि वेगवेगळ्या स्वरूपात रहावे लागते, याची कल्पना आपणास असणे अत्यंत जरूर आहे. मनुष्यमात्रास इंद्रियगोचर नसणाऱ्या सृष्टीत काय आहे, याचे ज्ञान या संदर्भात आवश्यक आहे. त्याबद्दल अनिश्चितपणा किंवा शंकेला जागा ही राहणारच. तथापि या क्षेत्रातील जाणकार लोकांच्या मार्गदर्शनाने याबाबतीत पुष्कळच ज्ञान प्राप्त होऊ शकते.

**सप्तलोक अथवा सप्तव्याहृती :–**

अतीन्द्रिय अशा ज्या अनेक जगांना आपण 'लोक' किंवा 'भुवने' म्हणतो, ते 'सप्तलोक' अथवा 'सप्तव्याहृती' पुढीलप्रमाणे होत :– (१) भूः, (२) भुवः, (३) स्वः, (४) महः, (५) जनः, (६) तपः, व (७) सत्यम्‌:

प्राणी अनुक्रमे या लोकांतून प्रवास करीत असतो. या प्रत्येक लोकात तो क्रमाने उन्नत होत जात असतो. प्रत्येक लोकात त्याला काही विशेष बंधने असतात. तो जसजसा पुढल्या लोकात जाईल, तसतशी त्याची बंधने कमीकमी होत जातात आणि त्याला नव्या नव्या शक्ती प्राप्त होत असतात. परंतु या प्रकारे त्याचा प्रवास चालू असता, पूर्व अवस्थेत जे संस्कार घडलेले आणि जे अनुभव आलेले असतात, त्यामुळे त्याचा कल पूर्वस्थानाकडे विशेष असतो. विशेषतः दुसऱ्या उच्च स्थानाला पोहोचून तेथील विशेष शक्तींचा परिचय होईपर्यंत, तो पूर्वस्थानाकडे एखाद्या व्यसनी माणसाप्रमाणे सारखा ओढ घेत असतो. पूर्वस्थानाहून दुसऱ्या स्थानी गेल्यावरही, पूर्व-

स्थानच्या काही वस्तूंचे लोभ त्याला इतके अनावर होतात की, तो तेथून च्युती पत्करूनहि पूर्वस्थानाकडे येतो.

**मृत व्यक्तीच्या आप्तेष्टांची जबाबदारी :–**

दुसऱ्या स्थानाची प्रगती म्हणजे पुष्कळ अंशाने पथिक स्थितीच असते. स्वाभाविक क्रमाने जाणारा हा जीव पुष्कळ वेळा वाटेत आढळणाऱ्या गोष्टींमध्ये रमून राहतो. त्यामुळे मृत व्यक्तींच्या आप्तेष्टांवर उभय प्रकारची जबाबदारी पडते. मृत व्यक्तीच्या उत्कर्षाच्या प्रवासाला साहाय्य करून त्याला परत वळण्याची बुद्धी उत्पन्न न होऊ देणे आणि तो आपला मार्ग आक्रमण करण्याचे कार्य विसरला असेल; तर त्याला जागृती देणे, या त्या दोन जबाबदाऱ्या होत. या धोरणाने श्राद्धविधीकडे आपण पाहिले की, आपणास त्यातील बऱ्याच गोष्टींचा कार्यकारणभाव समजून येतो.

**मानवाचे चार देह अथवा पाच कोश :–**

मृत मनुष्य आपले शरीर येथे टाकून जातो. परंतु जाताना तो आपल्याबरोबर काही गोष्टी घेऊन जात असतो. अन्नमय शरीराचा त्याग करून गेलेला जीवात्मा आपल्याबरोबर ज्या वेगवेगळ्या गोष्टी घेऊन जातो, त्याला अनुसरूनच पंचकोशांची कल्पना उपनिषदादि ग्रंथात प्रतिपादन केलेली आढळते. ते कोश पुढीलप्रमाणे आहेत :– १. अन्नमय, २. प्राणमय, ३. मनोमय. ४. विज्ञानमय ५. आनंदमय.

याच्या उलट उपनिषत्साहित्यात निम्नलिखित चार देह वर्णिले आहेत :– १. स्थूल, २. सूक्ष्म, ३. कारण, ४. महाकारण (जीवात्मा.)

वेगवेगळ्या द्रव्यांनी बनलेले हे देह एकापुढे एक आहेत. आपल्या स्थूल असणाऱ्या देहाचे अन्नकोशक्रमाने एकात एक असे स्वरूप आहे. त्याचे स्वरूपही विशेष तत्त्वात्मक असे ठरलेले आहे.

**पंचकोशांची सप्तलोकातील विभागणी :-**

आता हे पाच कोश किंवा चार देह, हे सात लोकात कशा प्रकारे वाटले गेले आहेत, ते पाहू. अन्नमय कोश किंवा स्थूलदेह भूलोकात असतो; मनोमय कोश किंवा कारणदेह स्वर्गात असतो; अशा प्रकारची जी वर्णने आपणास आढळतात, त्यावरून सप्तलोकात यांचे विभाजन व्हावयास पाहिजे. एक देह संपून दुसरा देह, किंवा कोश कोठे प्रारंभ होतो, हे निश्चित सांगणे कठीण आहे. प्राणमय कोश अन्नमय कोशातून बाहेर पडला की, मनुष्य मृत झाला असे आपण समजतो. प्राणमय कोशामुळे शरीर सजीव आहे, असे आपण समजतो. पंचमहाभूतांपासून घेतलेल्या अंशांना एकत्र बांधून ठेवणारी शक्ती म्हणजे प्राण होय. तो निघून गेला, म्हणजे शरीरातील पंच-भूतांचे अंश पंचभूतात जाऊन मिसळतात. यालाच 'पंचत्वाला गेला,' किंवा 'मृत झाला,' असे आपण म्हणतो.

**प्राणमय कोशाचा प्रवास :-**

अन्नमय आणि प्राणमय, या दोनही कोशांचे गमन जवळ जवळ एकदमच होते. अन्नमय कोशातून निघून काही काल प्राणमय कोश वावरत असतो. नाहीशा झालेल्या स्थलांच्या भोवती पक्षी जसा घिरटचा घालीत असतो, त्याप्रमाणें तो शरीरापासून फार दूरवर जाऊ शकत नाही. अन्नमय कोशाप्रमाणे तोही पंचभूतात्मक सृष्टीत, प्राणमय पसाऱ्यात विलीन होतो; कारण त्याला स्वतंत्र वावरण्याची शक्तीच नसते. त्यातून मनोमय कोश पुढील दोन कोशांसह बाहेर पडतो.

**मनोमय कोशाचा प्रवास :-**

प्राणमय कोशातून मनोमय कोश बाहेर पडला की, त्याची गती त्याच्या वासनेवर अवलंबून असते. वासना ज्या मानाने तीव्र असेल

त्या मानाने त्याच्या गतीचा वेग अवलंबून असतो. मृत्युलोकातून 'वासना' हेच मोठे साहित्य घेऊन जीवात्मा बाहेर पडलेला असतो. या वासनांचे ओझे ज्या मानाने कमीअधिक असेल, त्या मानाने त्याची त्या कोशातून पुढल्या कोशात गती होणे सुलभ किंवा कठीण असते. त्या दृष्टीने जीवात्मा हा मनोमय कोशापर्यंत सहज येतो; परंतु वासनात्मक मनोमय कोशाला टाळून विज्ञानमय व आनंदमय कोशात जाणे दुर्घट असते. वासनेच्या प्रदीर्घ संबंधामुळे, जीवात्मा हा वासनेतून सुटण्यास सारखा भीत असतो आणि तो परत येण्याला सुरुवात करतो. हे परावर्तन टाळणे, हा वेदान्ताचा व भक्तिमार्गाचा एक महत्त्वाचा उद्देश आहे. यालाच 'अर्चिरादि मार्ग,' किंवा 'उत्तरायण मार्ग' असे म्हणतात. याच्या उलट 'धूमादि मार्ग' किंवा 'दक्षिणायन मार्ग' होय. देहाच्या दृष्टीनेही स्थूल देह म्हणजे अन्नमय कोश आणि सूक्ष्मदेह म्हणजे प्राणमय व मनोमय कोश होय. कारणदेह हा विज्ञानमय व आनंदमय कोशांचा बनलेला असतो.

**मृताच्या वासना :–**

यावरून इतकेच सिद्ध करावयाचे आहे की, मनोमय कोशात असेतोपर्यन्त जीवात्म्याला वासना, मनोविकार वगैरे सर्व असतात. परंतु वासना तृप्त करून घेण्याचे साधन जे शरीर, ते त्याला नसते. काही वासना अशा असतात की, त्या त्याला मृत स्थितीत प्राप्त करून घेऊन तृप्त होता येते. परंतु खाणेपिणे वगैरे काही वासना तृप्त करून घेता येत नाहीत. भूतपिशाच्चांना आपल्या खाण्यापिण्याच्या वासना तृप्त करून घेण्याकरिता कोणाच्या तरी शरीराचा आश्रय करावा लागतो, असे आपण नेहमी ऐकतो. अन्नपदार्थ खाण्याची तीव्र इच्छा असूनही, उपभोगाचा साधनभूत देह नसल्यामुळे तो तळमळत असतो आणि कोणाच्या तरी शरीरात जबर-

दस्तीने घुसून तेथे आपल्या इच्छा तृप्त करून घेण्याचा प्रयत्न करीत असतो. त्यामुळे त्या शरीराच्या मूळ मालकाला अत्यंत त्रास भोगावा लागतो; कारण त्याची इच्छा वेगळी आणि आपल्या वासना तृप्त करण्याकरिता जबरदस्तीने त्या माणसाच्या शरीरात शिरलेल्याच्या वासना वेगळ्या. भूतबाधा झाली असे म्हणतात, तेथे आपणास याचा अनुभव येतो. याचा परिणाम मात्र जीवात्म्याच्या पुढील प्रवासाला विरोधक असा होतो; कारण त्यांच्या वासना तृप्त होऊ लागल्या की, तो तेथेच राहण्याची आणि देह प्राप्त करण्याची खटपट करू लागतो.

**मृतांच्या अतृप्त वासना :–**

मृतांच्या वासना कोणत्या असतात हे पाहू गेल्यास, जन्मभर उपभोगलेल्या खाण्यापिण्याकडे त्यांचे विशेष लक्ष असणे साहजिक आहे. जिवंत असताना ज्या गोष्टींबद्दल अट्टाहास असेल, त्याच वस्तूंकडे लक्ष राहणे, आणि साधन सापडल्यास आपल्या इच्छेप्रमाणे त्याकडे लक्ष पुरविणे, हे अत्यंत स्वाभाविक आहे.

**श्राद्धप्रयोगद्वारा मृतांच्या अतृप्त अन्नविषयक वासनांची परिपूर्ती :–**

खाण्यापिण्याशिवाय दुसरी तीव्र वासना कोणतीच असणे शक्य नाही आणि ती एकदम नाहीशी होणेही अशक्य आहे. याकरिताच प्राचीन महर्षींनी श्राद्धद्वारा त्या गोष्टीची व्यवस्था केली. नाही तर ते जीव भूलोकाकडे सारखे ओढ घेऊ लागतील आणि त्यामुळे त्यांच्या गतीत विघ्न येऊन त्यांच्या उत्कर्षाला ते बाधक होईल म्हणून श्राद्धाची योजना करण्यात आली. श्राद्धे ही प्रथम दररोज, नंतर काही दिवसांच्या अंतरांनी, महिन्यांनी व शेवटी काही महत्त्वाच्या दिवशी, अशा क्रमाने कमीकमी करीत मृतांचा इहलोकीचा ओढा कमी करण्याचा प्रयत्न केला आहे. श्राद्धाच्या वेळी म्हणा-

वयास सांगितलेले मंत्रसुद्धा, त्या मृताला, "आपला इकडचा संबंध सुटला असून, आपणास मागे वळावयाचे नसून पुढे जावयाचे आहे," असे सांगणारे आहेत, हे या विधीतील काही मंत्र पाहिले असता ध्यानात येण्यासारखे आहे.

**श्राद्धकर्मातील ब्राह्मणाचे महत्त्व :–**

अशा तऱ्हेने एकाला भोजन देऊन दुसऱ्याला तृप्त करताना मध्यस्थ म्हणून स्वीकारलेला ब्राह्मणही जितका चांगल्या योग्यतेचा असेल, तितका त्याचा परिणाम इष्ट होण्याचा संभव जास्त असतो. याकरिता ब्राह्मणाबद्दल आपल्या शास्त्रात जास्त चिकित्सा करावयास सांगितले आहे. देश, काल, पात्र या सर्वांची काळजी घ्यावी. अंत:करणात श्रद्धा व आस्तिक्यबुद्धी असावी. अशा पद्धतीने श्राद्धकर्म घडावे की, पितरांना अन्न पोहोचविणाऱ्या देवतांना येण्यास त्रास किंवा संकोच वाटता उपयोगी नाही. "न च तत्प्रेत्य नो इह" असे होता उपयोगी नाही.

ब्राह्मण बसण्याच्या जागी डोळ्याला अडगळ दिसते आहे, घाण पडली आहे, मुले रडत आहेत, आक्रोश व आरडाओरड चालू आहे अशी स्थिती नसावी, हेही का सांगितले असावे हे ध्यानात येईल. अंगात यावयाचे असले किंवा काही महत्त्वाचा निवाडा घ्यावयाचा असला की एकांत, धूप, दीप, स्वच्छता, शांतता यासारखी मनाला प्रसन्नता देणारी परिस्थिती आपण मुद्दाम निर्माण करीत असतो. हेही का करीत असतो हे ध्यानात घ्यावयास पाहिजे.

श्राद्ध करताना अमकाच पदार्थ अर्पण करावा असे नाही. उत्कृष्ट प्रकारच्या अन्नापासून फळ, मूळ, शेवटी उदकापर्यंत जे शक्य ते द्यावे, असे पुलस्त्यस्मृती आणि मनुस्मृती या ग्रंथात पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

संस्कृतं व्यजनाढ्यं च, पयोदधिघृतान्वितम् ।
श्रद्धया दीयते यस्मात् श्राद्धं, तेन निगद्यते ।।
( पुलस्त्यस्मृती )

कुर्यादरहः श्राद्धं अन्नाद्येनोदकेन च ।
पयोमूलफलैर्वापि पितृभ्यः प्रीतिमावहन् ।।
( मनुस्मृती )

अधिकाधिक मृत व्यक्तींचा समावेश करून, ज्यांना कोणी अन्न देणे शक्य नसेल त्यांना दिले जावे, म्हणून महालय श्राद्धाची योजना करण्यात आली. यावरून प्रत्येक मृताची कोठे ना कोठे व्यवस्था लागावी असा उद्देश दिसतो.

**तीन पिढ्यांचाच उल्लेख का ? :-**

श्राद्धात तीन पिढ्यांचा उल्लेख करण्याचे कारण, भूपासून स्वर्गापर्यंत पोहोचण्यास लागणारा काल गृहीत धरून, तीन पिढ्या म्हणजे साधारणतः साठ ते शंभर वर्षांचा काल गृहीत धरलेला आहे. त्यानंतर मृताला स्वर्ग किंवा कर्मानुरूप गती प्राप्त होऊन येथील कोणत्याही प्रकारच्या मदतीची त्यास अपेक्षा राहत नाही. आपला येथील अनुभवही असाच आहे. तीन पिढ्यांपेक्षा मागील पिढ्यांची आपणास फारशी माहिती नसते आणि त्या दृष्टीने आपला तिकडे ओढाही नसतो.

**वसु, रुद्र, आणि आदित्य :-**

पितरांचा उल्लेख करताना आपण पितरांना " वसुरूप " म्हणतो, आजोबांना " रुद्ररूप " म्हणतो आणि पणजोबांना " आदित्यरूप " म्हणतो. मृत झाल्यानंतर मृतात्म्याला प्राप्त होणाऱ्या या तीन अवस्था आहेत. पृथ्वीच्या आसपास असणारा, म्हणजे जो नुकताच मृत झालेला असतो त्याला " वसुरूप " म्हणतात. जरा दूर गेल्यावर

म्हणजे भुवर्लोकाच्या आसपास गेला, म्हणजे त्याला "रुद्ररूप" म्हणतात आणि त्याच्या वर गेला म्हणजे त्याला "आदित्यस्वरूप" म्हणतात. अशा तऱ्हेने तीन स्वरूपातून मृतांचा स्वर्गापर्यंतचा प्रवास असल्यामुळे त्यांना वसु, रुद्र आणि आदित्यस्वरूप असे म्हणतात. या सर्व गोष्टी अतीन्द्रिय असल्यामुळे कोणीतरी प्राचीन अशा ज्ञात्यांनी संशोधन करून लोकांना पटविल्या आणि रूढही केल्या. त्या फक्त प्रचारात आहेत म्हणून आपण इतपत तरी बोलू शकतो. अभ्यास करून अशा ज्ञानाचा पडताळा पाहून, त्या ताज्यातवान्या ठेवणे आपले कर्तव्यकर्म आहे. श्रद्धापूर्वक कर्म करणे आणि ज्ञात्यांनी शोधलेली तत्त्वे पुढील संशोधनाकरिता शुद्ध स्वरूपात ठेवणे एवढे केले तरी आपले कर्तव्य केले असे होणार आहे. ही स्वरूपे पितरांना क्रमाने प्राप्त होत असतात आणि त्या स्वरूपात आपण त्यांना कृतज्ञताबुद्धीने साहाय्य करीत असतो. हे करीत असताना त्यांची अन्नोदकाबद्दलची वासना हळू हळू शांत करण्याचा प्रयत्न आपण करतो.

**सपिंड आणि सोदक श्राद्ध :–**

पितरांच्या तीन पिढ्या, आणि वसु, रुद्र, आदित्यस्वरूपासंबंधी जी माहिती वर दिली आहे, त्याप्रमाणे अगदी हिशेबाने काम चालले असेल असे संभवत नाही. काही थोडा फार फरक व्हावयाचाच. काही पितर पुढच्या स्थानात लौकर समाविष्ट होत असतील किंवा काही रेंगाळत मागे राहात असतील. परंतु ती अतीन्द्रिय स्थिती आपणास कळणे शक्य नाही. पण त्यामुळे त्याची कल्पनाही आपणाला करता येणार नाही, असे नाही. तथापि एखाद्या मृताचा जीवात्मा जास्त काळ एका ठिकाणी राहिलच तरी तीन पिढ्यांच्या पुढच्यांना "सपिण्ड" म्हणून, तसेच अप्रत्यक्ष रीतीने त्याच्याही पूर्वीच्या तीन पिढ्यांना "सोदक" म्हणून उदकाचा अंश प्राप्त होत

असतो. अशा पद्धतीने अनेक पिढ्यांपर्यंत अन्नोदक पोहोचविण्याची व्यवस्था श्राद्धकर्मात केलेली असते. हे सर्व सपिण्ड श्राद्धाने आपण साध्य करीत असतो.

**सपिण्डी म्हणजे काय ? :–**

मृताला सपिंडीकरण होईपर्यंत " प्रेत " ही संज्ञा असते. सपिण्ड श्राद्ध झाल्याशिवाय त्याला पितरत्व प्राप्त होत नाही. " सपिण्डीकरण " म्हणजे पूर्वीच्या पितरांमध्ये याला एकरूप करणे. अशा पद्धतीने एक झालेल्यांना " सपिण्ड " असे म्हणतात. सात पिढ्या सपिण्ड असतात आणि त्यामागील सात या सोदक असतात. सपिण्डांपैकी कोणालाही पिण्ड दिला असता त्याचा भाग सपिण्डांपैकी सर्वांना मिळतो. समानोदकांपैकी कोणालाही प्राप्त झालेले उदक सर्वांना मिळते.

**सारांशभूत गोष्ट :–**

या सर्व प्रकारणात मृत माणसाचे लक्ष वेधून त्यांना सारखे असे कळवावयाचे आहे की, " तुम्ही या जगाकडे लक्ष न ठेवता आपल्या पुढील मार्गाकडे लक्ष ठेवा; कारण तुम्ही प्रेत म्हणजे हे जग सोडून गेलेले आहात. आणि तुम्ही वसु, रुद्र, आदित्य अशा स्वरूपाला क्रमाक्रमाने जात आहात आणि त्याच्याहीपुढे तुम्हाला जावयाचे आहे. इकडील वासना तुम्ही सोडून द्यावी. तुमच्या श्रेय आणि मोक्ष याकरिता तुम्हाला आम्ही स्मरण देत आहोत."

मंत्रक्रिया आणि विशिष्ट मंत्र यांच्या साहयाने पितरांना इकडे लक्ष न देता तुम्ही आपल्या कल्याणाचा मार्ग स्वीकारा, असे सांगण्यांचा प्रयत्न येथे केलेला आढळतो. अन्त्येष्टी प्रयोगाच्या मांडणीत हेच तत्त्व फार प्रामुख्याने सांगितलेले आढळते.

अशा रीतीने श्रीक्षेत्र कुरवपूर येथे श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास

चालू असल्याची वार्ता सुदूरपर्यन्त पसरल्यामुळे येथे येणाऱ्या लोकांची वर्दळ अधिकाधिक वाढू लागली. या संधीचा फायदा घेऊन तेथील वाटाडे लोक येणाऱ्या–जाणाऱ्या यात्रेकरूंकडून खूप पैसे घेऊ लागले. ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांना समजताच त्यांनी सर्व वाटाड्यांना ताबडतोब बोलावून घेऊन तसे न करण्याबद्दल ताकीद दिली. त्याचप्रमाणे त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी लोकांची व सामानाची ने आण करण्याचे भावही ठरवून दिले. बाजेवरून जाण्यास माणसी आठ आणे, स्वतंत्र भोपळ्याच्या सांगडीवरून जाण्याकरिता माणसी एक रुपया व ओझ्याच्या एका रांजणास आठ आणे अशा रीतीने सर्वांनी पैसे घ्यावेत असे त्यांनी सांगितले व ते सर्व वाटाड्यांनी मान्यही केले. श्रीस्वामीमहाराजांच्या कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् शक्तीची प्रचीती सर्व वाटाड्यांनी अनेक वेळा घेतलेली असल्यामुळे त्यांनी ठरवून दिलेल्या दरापेक्षा अधिक पैसे घेऊन लुबाडण्याचे धैर्य वाटाड्यांना पुढे कधीही झाले नाही.

मुंबईतील एक आंग्लविद्याविभूषित सरकारी अधिकारी बरेच दिवस आजारी होते. त्यांना औषधाचा विशेष उपयोग होत नाही व त्यांची प्रकृती सुधारत नाही असे पाहून त्यांच्या डॉक्टरांनी त्यांना असा सल्ला दिला की, "आपण हवापालट करण्यासाठी दुसऱ्या कोणत्यातरी गावी जाऊन राहा." डॉक्टरांचा सल्ला मान्य करून त्या सरकारी अधिकाऱ्यांनी पुण्यात कॅम्पमध्ये जाऊन राहावे असे ठरविले; परन्तु सर्व बाजूंनी विचार केल्यावर त्यांना असे वाटू लागले की, कॅम्पमध्ये सेवाशुश्रूषा करावयाला कोणी मिळणार नाही व नित्याच्या लागणाऱ्या वस्तूही आणण्यास त्रास पडेल." त्यामुळे त्या सरकारी अधिकाऱ्यांनी पुणे शहरातच शनिवार पेठेतील एका वाड्याचा अर्धाभाग भाड्याने घेतला व ते तेथे राहू

लागले. पुण्याला राहू लागल्यावर तेथील उत्तम हवापाण्यामुळे त्यांची प्रकृती सुधारू लागली. त्यांची भूक वाढली व ते दूध वगैरे आहार व्यवस्थित घेऊ लागले. अशा प्रकारे त्यांची प्रकृती सुधारू लागली; तरी आता आपण लवकरच मरणार असे त्यांना आतून क्षणोक्षणी वाटत होते. त्यामुळे त्यांनी आपली प्रकृती एक-दोन तज्ज्ञ डॉक्टरांना दाखविली; परन्तु त्यांनी त्यांची प्रकृती तपासल्यावर त्यांना रोगाचे कोणतेच लक्षण सापडले नाही. डॉक्टरांनी त्यांना काहीही रोग नसल्याचे सांगितले; तरी त्यांचे समाधान झाले नाही. त्यामुळे ते आपल्या सेवेला असलेल्या लोकांना वारंवार डॉक्टरांना बोलविण्यास सांगत असत. अशा प्रकारे हे सरकारी अधिकारी, सेवेकरी लोकांना सांगत राहिल्यामुळे ते लोकही अगदी कंटाळून गेले. शेवटी डॉक्टरांना बोलवावयाला सांगितल्यावर सेवकरी "बोलवतो" असे सांगून गप्प बसू लागले; कारण त्यांना बोलविण्याचा तसा काहीच उपयोग नव्हता.

हे सरकारी अधिकारी ज्या वाड्यात विश्रांतीसाठी व हवापालटण्यासाठी राहण्यास आले होते, त्यांच्या शेजारच्या घरात रोज सकाळ–संध्याकाळ श्रीदत्तोपासना चालत असे. ज्या घरात श्रीदत्तोपासना चालू होती तेथील सर्वच मंडळी श्रीस्वामीमहाराजांचे एकांतिक भक्त, प्रेमी व उपासक होते. त्या घरात सायंकाळी देवाची आरती झाली की, ते लोक श्रीस्वामीमहाराजांची करुणात्रिपदी म्हणत असत. हे सरकारी अधिकारी येथे राहावयास आल्यापासून त्यांच्या कानावरून कितीतरी वेळा करुणात्रिपदीचे शब्द गेले असतील; पण त्यांनी त्या शब्दांकडे कधी लक्षच दिले नव्हते. परन्तु एके दिवशी संध्याकाळी अकस्मात् त्यांना असे वाटू लागले की, आपण करुणात्रिपदीची तिन्ही पदे लक्षपूर्वक ऐकावी. आपल्याला

आजच असे का वाटत आहे याची मीमांसा त्यांनी आपल्या मनाशी बराच वेळ केली; परन्तु त्याचे उत्तर त्यांना मिळाले नाही. शेवटी शेजारील घरातील आरती संपल्यावर जेव्हा करुणात्रिपदी म्हणण्यास सुरुवात झाली तेव्हा ती त्यांनी अगदी मन लावून ऐकली. त्यामुळे त्या रात्री त्यांना गाढ झोप लागली व त्यांना सतत त्रास देणारे मरणाचे विचारही बव्हंशी कमी झाले. ज्यावेळी दुसऱ्या दिवशी ते झोपेतून उठले त्यावेळी त्यांना पुष्कळ हुषारी वाटली. त्यामुळे आपण शेजारील घरात जाऊन आरतीला उपस्थित राहावे व करुणात्रिपदी स्वतः म्हणावी अशी तीव्र इच्छा त्यांच्या अंतःकरणात उपस्थित झाली. त्याप्रमाणे त्या दिवसापासून ते दररोज शेजारच्या बिऱ्हाडात जाऊन तेथील सर्व लोकांबरोबर पुढीलप्रमाणे करुणात्रिपदी म्हणू लागले.

## ॥ करुणात्रिपदी ॥

( चाल – उद्धवा शांतवन कर० )

### ॥ पद पहिले ॥

शांत हो श्रीगुरुदत्ता मम चित्ता शमवी आतां ॥ धृ० ॥ तूं केवळ माता जनिता, सर्वथा तूं हितकर्ता ॥ तूं आप्त स्वजन भ्राता, सर्वथा तूंचि त्राता ॥ चाल ॥ भयकर्ता तूं भयहर्ता ॥ दंडधर्ता तूं परिपाता ॥ तुजवांचुनि न दुजी वार्ता ॥ तूं आर्ता आश्रय दत्ता ॥ शांत हो० ॥ १ ॥ अपराधास्तव गुरुनाथा, जरि दंडा धरिसी यथार्था ॥ तरि आम्हीं गाउनि गाथा, तव चरणीं नमवूं माथा ॥ चाल ॥ तूं तथापि दंडिसि देवा ॥ कोणाचा मग करूं धावा ॥ सोडविता दुसरा तेव्हां । कोण दत्ता आम्हां त्राता ॥ शांत० ॥ २ ॥ तूं नटसा होऊनि कोपी,

दंडितांहि आम्ही पापी ।। पुनरपिही चुकत तथापि, आम्हांवरि न च संतापी ।। चाल ।। गच्छतः स्खलनं क्वापि ।। असें मानुनि नच हो कोपी ।। निजकृपालेशा ओपी ।। आम्हांवरि तूं भगवंता ।। शांत० ।।३।। तव पदरीं असतां ताता, आडमार्गीं पाउल पडतां ।। सांभाळुनि मार्गावरता, आणिता न दुजा त्राता ।। चाल ।। निज बिरुदा आणुनि चित्ता ।। तूं पतीतपावन दत्ता ।। वळे आतां आम्हांवरता । करुणाघन तूं गुरुनाथा ।। शांत० ।। ४ ।। सहकुटुंब सहपरिवार, दास आम्हीं हें घरदार ।। तव पदीं अर्पु असार, संसाराहित हा भार ।। चाल ।। परिहरिसी करुणासिंधो ।। तूं दीनानाथ सुबंधो ।। आम्हां अघलेश न बाधो ।। वासुदेवप्रार्थित दत्ता ।। शांत हो श्रीगुरुदत्ता ।। ५ ।।

## ।। पद दुसरे ।।

( चाल– इस तनधनकी० )

श्रीगुरुदत्ता जय भगवंता ।। तें मन निष्ठुर न करी आतां ।। धृ० ।।
चोरें द्विजासी मारितां मन जें, कळवळलें तें कळवळो आतां ।। १ ।।
पोटशुळानें द्विज तडफडतां, कळवळलें तें कळवळो आतां ।। २ ।।
द्विजसुत मरतां वळलें तें मन, होकी उदासिन न वळे आतां ।। ३ ।।
सतिपति मरतां काकुळति येतां, वळलें तें मन न वळे कीं आतां ।।४।।
श्रीगुरुदत्ता त्यजिं निष्ठुरता, कोमलचित्ता वळवी आतां ।। ५ ।।

## ।। पद तिसरे ।।

जय करुणाघन निजजनजीवन, अनसूयानंदन पाहि जनार्दन ।। धृ० ।।
निज अपराधें उपराठी दृष्टी, होऊनि पोटी भय धरुं पावन ।। १ ।।
तूं करुणाकर कधी आम्हांवर, रुससी न किंकर वरद कृपाघन ।। २ ।।

वारी अपराध तूं मायबाप, तव मनीं कोपलेश न वामन ॥ ३ ॥
बालकापराधा गणे जरि माता, तरि कोण त्राता देईल जीवन ॥ ४ ॥
प्रार्थी वासुदेव पदीं ठेवी भाव, पदीं देवो ठाव देव अत्रिनंदन ॥ ५ ॥

अशा प्रकारे ज्या घरात हे सरकारी अधिकारी करुणात्रिपदी म्हणण्यास जात होते त्या घरात श्रीस्वामीमहाराजांचा एक उत्तम फोटो होता. त्या फोटोच्या रूपाने त्या गृहस्थांना रोजच त्यांचे दर्शन होऊ लागले व त्यांच्या मनात श्रीस्वामीमहाराजांविषयी अत्यन्त प्रेम व भक्ती उत्पन्न झाली. तेथील मंडळींनीही या गृहस्थांना श्रीस्वामी-महाराजांची माहिती सांगून त्यांचे भक्तिप्रेम शतगुणित केले.

अशा प्रकारे त्या सरकारी अधिकाऱ्यांची प्रकृती हळूहळू सुधारत असताना शके १८३३ म्हणजे इ. स. १९११ चा श्रावण महिना उजाडला. वर वर्णन केलेल्या पुण्यातील या सर्व भक्तमंडळींना श्रीस्वामीमहाराज चातुर्मासानिमित्त श्रीक्षेत्र कुरवपूर येथे आहेत असे कळले. हे ऐकल्यावर त्या घरातील सर्व मंडळींनी श्रीक्षेत्र कुरवपूर येथे जाऊन श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घ्यावयाचे ठरविले व त्याप्रमाणे ते सर्वजण तयारी करू लागले. त्या सरकारी अधि-काऱ्यांना जेव्हा हे कळले तेव्हा त्यांनीही शेजारच्या घरातील सर्व लोकांबरोबर श्रीक्षेत्र कुरवपूर येथे जाण्याचा आग्रह धरला. त्यांचा तो आग्रह पाहून त्यांच्या सेवेला असलेल्या घरातील व शेजारच्या बिऱ्हाडील सर्व माणसांच्या मनात असे विचार आले की, " पुण्या-हून आगगाडीने रायचूरला जाऊन तेथून वीस मैल बैलगाडीने जावयाचे व पुढे बाजेवर बसून पाण्यातून बेटावर पोहोचावयाचे, एवढा लांबचा प्रवास आज मरतो, उद्या मरतो म्हणणाऱ्या रुग्णाला कसा झेपणार ? " सर्वांनीच आपल्या मनातील हे विचार त्या आजारी गृहस्थांना सांगितले; परन्तु श्रीस्वामीमहाराजांचे आयु-

ष्यात एकदा तरी दर्शन घेऊन त्यांचे आशीर्वाद घ्यावयाचेच अशी तीव्र उत्कंठा व इच्छा मनात असल्यामुळे त्या गृहस्थांनी कितीही त्रास झाला तरी श्रीक्षेत्र कुरवपूर येथे जावयाचेच असा आपल्या मनाशी दृढ निश्चय केला होता. त्यांची श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी जडलेली दृढ भक्ती व त्यांच्या दर्शनाची त्यांना लागलेली तीव्र उत्कंठा पाहून सर्वजणांनी त्यांना आपल्याबरोबर श्रीक्षेत्र कुरवपूर येथे घेऊन जाण्याचे ठरविले. खरे पाहता ज्या रात्रो त्यांनी करुणात्रिपदी मन लावून ऐकली होती त्याच रात्री त्यांना श्रीस्वामी-महाराजांच्या कृपेचा लाभ झाला होता.

श्रीस्वामीमहाराजांच्या कृपाप्रसादासाठी जेव्हा सर्व भक्तमंडळी व ते आजारी गृहस्थ पुण्याहून निघाले तेव्हा पुन्हा एकदा सर्वांचे मन शंकाकुशंकांनी भरून गेले; परन्तु अगदी प्रथम शनिवार पेठे-पासून पुणे स्थानकापर्यन्तचा प्रवास बिनधोक झाल्यावर सर्वांनाच बरे व हायसे वाटले. त्यानन्तर पुणे ते रायचूर हा प्रवास सुद्धा कोणत्याही प्रकारची अडचण न येता पार पडला. खरोखर श्रीस्वामी-महाराजांनीच ज्यांना आपल्या पायापाशी खेचून आणावयाचे ठरविले होते त्यांना प्रवासात अडचण तरी कसली येणार ? ही सर्व भक्तमंडळी सुखरूपपणे श्रीक्षेत्र कुरवपूर येथे पोहोचली.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे आल्यावर सर्वांनी स्नानादि करून श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतले व ते आपल्या निवासस्थानी गेले. तेथे गेल्यावर दुपारी भोजन झाल्यावर आपण श्रीस्वामीमहा-राजांना कोणकोणते प्रश्न विचारावयाचे याची यादीच आजारी गृहस्थांनी तयार केली. अशा प्रकारे प्रश्नांची मालिका मनात तयार करून ते श्रीस्वामीमहाराजांच्या दुपारच्या प्रवचनाला गेले.

श्रीस्वामीमहाराज पुरातन वटवृक्षाखाली बसले होते व सर्वजण

मनाचे कान करून त्यांचे पुराण ऐकत होते. सर्वत्र निरव शांतता होती. पुराण चालू असतानाच त्यांनी श्रीसरस्वती गंगाधर यांनी "श्रीगुरुचरित्र" या ग्रंथात वर्णन केलेली व श्रीक्षेत्र कुरवपूर येथे घडलेली श्रीपादश्रीवल्लभांच्या रजकभक्ताची म्हणजेच पर्यायाने श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांच्या यवनभक्ताची कथा सांगण्यास सुरुवात केली.

"आता आपण श्रीगुरुचरित्रातील जी कथा पाहणार आहोत ती सर्व जीवांची प्रातिनिधिक कथा आहे. आपण आता ज्या सिद्ध-भूमीत बसलो आहोत तेथे एक परीट राहत असे. तो पुढे श्रीपाद-श्रीवल्लभांचा एकनिष्ठ शिष्य झाला. श्रीपादस्वामी रोज श्रीकृष्णे-वर स्नानासाठी येत असत. ते स्वतः मुक्त असूनही स्नानादि लौकिक व्यवहार मोठ्या निष्ठेने सांभाळीत असत. खरे पाहता श्रीपादश्रीवल्लभस्वामींचे दर्शन हेच भक्तजनांना श्रीगंगास्नान असल्यामुळे त्यांना स्नानाची गरज नव्हती; परंतु लोकसंग्रहासाठी ते नित्य स्नान करीत असत.

याप्रमाणे श्रीपादश्रीवल्लभांचा नित्यक्रम चाललेला असताना एके दिवशी ते दशदिशांनी वाहणाऱ्या श्रीकृष्णाजलात स्नानासाठी येऊन उभे राहिले. त्यावेळी तेथे नदीच्या काठावर तो परीट नित्याप्रमाणे वस्त्रे धूत होता. हा परीट श्रीपादश्रीवल्लभांचा भक्त असून तो त्यांना नित्य वंदन करीत असे. खरे तर तो तिन्ही त्रिकाळ कायावाचेमनेकरून अतिविनयपूर्वक श्रीस्वामींना साष्टांग दंडवत-पूर्वक नमस्कार घालीत असे. अशा रीतीने एके दिवशी तो नमस्कारासाठी आला असताना श्रीपादगुरू त्याला असे म्हणाले की, "अरे रजका ! तुझ्या भक्तीने मी संतुष्ट झालो आहे. सेवेचे हे कष्ट तू कशासाठी करतोस ! तू आता सुखाने राज्य कर." श्रीगुरूंचे हे

वचन ऐकून व हा मोठाच अनुग्रह आपल्यावर झाला आहे हे पाहून त्याने आपल्या नेसत्या वस्त्रास शकुनगाठ बांधली आणि तो त्यांना असे म्हणाला की, "श्रीगुरुमूर्ती ! आपण सत्यसंकल्प आहात. आपणच आपले वचन खरे करणारे आहात !" त्या दिवसापासून त्या रजकाने आपल्या प्रपंचाची चिन्ता करणे सोडून दिले आणि या निश्चयाने तो आपल्या घरी परत गेला.

या प्रकारे त्या निश्चयी रजक सेवकाने श्रीगुरूंचे अंगण झाडून व त्यांचा जाण्यायेण्याचा मार्ग स्वच्छ करून त्यावर सडा घालून खूप दिवस अनन्यभक्तीने त्यांची सेवा केली. असे दिवस चालले असताना वसंत ऋतूमधील वैशाख महिन्यात एके दिवशी एक म्लेंछ राजा श्रीकृष्णानदीच्या पात्राच्या किनाऱ्या-किनाऱ्याने नौकेत बसून आला. त्यावेळी त्या राजाने उत्तमोत्तम अलंकार व पोषाख धारण केलेला असून तो आपल्या स्त्रियांबरोबर नौकेत बसून क्रीडा करीत नदीतून चालला होता. त्याच वेळी श्रीकृष्णानदीच्या दोन्ही तीरांवरून राजाचे असंख्य हत्ती, घोडे, अगणित सैन्य आणि अलंकारांनी सजलेले असे सेवक इत्यादि सर्वजण मोठ्या थाटाने चालले होते. अशा प्रकारे श्रीकृष्णारूप श्रीगंगेच्या प्रवाहातून तो राजा नाना प्रकारच्या क्रीडा करीत येत असता दोन्ही तीरावर विविध प्रकारच्या वाद्यांचे नाद नुसते दुमदुमत होते. त्यावेळी तो रजकभक्त श्रीकृष्णानदीत वस्त्रे धूत असल्याने अकस्मात् त्याच्या कानावर हा वाद्यांचा गजर पडला. राजाची ती शोभायात्रा पाहून तो मनात अत्यंत विस्मयचकित होऊन अस्वस्थ झाला.

त्यावेळी त्याच्या मनात असे विचार आले की, "या संसारात जन्माला येऊन जर आपण असे सुख भोगले नाही तर आपला देह व जीवन अगदी व्यर्थ आहे. या राजाचे जीवन खरोखरच धन्य

आहे ! तो स्त्रिया, वस्त्रे, भूषणे असे नानापरींचे सौख्य भोगतो आहे. हा राजा ईश्वराचा मोठा भक्तच असला पाहिजे. खरोखर याला याच्या आर्जव भक्तीचे फळ किती मोठे मिळाले ! याने कोणत्या देवाची उपासना केली असेल बरे ! याला कोणते महान् गुरू लाभल्याने हे ऐश्वर्य मिळाले असेल ?"

अशा प्रकारचे विचार मनात येऊन त्यासंबंधीचे चिंतन तो करीत असताना त्याचे श्रीपादगुरूंकडे लक्ष जाऊन त्यांना त्याने साष्टांग दण्डवत् प्रणाम केला. श्रीपादश्रीवल्लभ अत्यन्त कृपावन्त होते. त्यांनी त्याची वासना ओळखली. त्या रजकाच्या अंतःकरणातील विचार ओळखून भक्तवत्सल अशा श्रीगुरुमूर्तीने त्याला जवळ बोलावून असे विचारले की, "अरे रजका ! तुझ्या मनात कसले चिंतन चालले आहे ?" त्यावेळी तो परीटभक्त त्यांना असे म्हणाला की, "स्वामीमहाराज ! या गंगेतून चाललेल्या या राजाला पाहून माझ्या मनाला फार समाधान वाटले. हा राजा खरोखर कोणत्या तरी महान् श्रीगुरूचा दास असला पाहिजे. हे कृपासिंधू ! हे दानश्रेष्ठा ! या राजाने पूर्वजन्मी देवाची आराधना केल्यामुळे त्याला हे पद व सुखोपभोग प्राप्त झाले आहेत. असे पद व भोग मला प्राप्त झाले तर आपल्या जीवनाचे व देहाचे खरे सार्थक होईल असे विचार माझ्या मनात येत आहेत. परन्तु महाराज ! एकीकडे असे विचार माझ्या मनात येत असले; तरी दुसरीकडे लगेच मला असे वाटते की, माझे हे सर्व विचार अविद्यामूलक असून ते इंद्रियांच्या नाना वासनांमुळे उत्पन्न होणारे व पुनःपुन्हा जन्ममरणचक्रपरंपरा भोगावयास लावणारे आहेत. त्यामुळे अशा प्रकारच्या भोगांची इच्छा करणे हे खरोखर व्यर्थ आहे. खरे सौख्य आपल्या चरणसेवेतच आहे; कारण त्यामुळेच मला मुक्ती मिळेल."

रजकभक्ताचे हे विचार ऐकताच श्रीश्रीपादगुरू त्याला असे म्हणाले, की, " तू जन्मापासून आत्तापर्यंन्त कष्टमय जीवन जगत आला आहेस. अशा वेळी आत्ता येथून चाललेल्या राजाचे वैभव पाहून त्याच्यासारखे तमोगुणप्रधान भोग आपण भोगावेत अशी तुला इच्छा व वासना होणे साहजिक आहे. याकरिता मनात उत्पन्न झालेल्या वासना व इच्छा भोगून इंद्रिये निववणे हेच खरे व योग्य आहे. अशा प्रकारे उपस्थित होणारे प्रारब्धकर्म भोगून संपविल्याशिवाय निर्मळ अशा मोक्षाची प्राप्ती होत नाही; कारण जन्मजन्मान्तरी या भोगाकांक्षा मोक्षाला बाधा केल्याशिवाय राहात नाहीत. यामुळे आपल्या इंद्रियांना संतुष्ट करण्याकरिता व राजा होण्याची आवड तुझ्या मनात उत्पन्न झालेली असल्यामुळे तू पुढील जन्मी म्लेंछ वंशात जन्म घेऊन तमोवृत्तीचा निदर्शक असा राज्यभोग भोगणे हेच योग्य होईल. या करिता तू या आपल्या देहाचा तत्काळ त्याग करून त्वरित राजाचा जन्म घे. "

श्रीपादश्रीवल्लभगुरुमहाराजांचे हे बोलणे ऐकून तो परीटभक्त एकदम अस्वस्थ झाला. तो श्रीगुरूंना नमस्कार करून असे म्हणाला की, " महाराज ! आपण साक्षात् श्रीगुरुराज असून परिपूर्ण असे दयासागर व कृपासागर आहात. अशा स्थितीत आपण मला आपल्या चरणसेवेपासून दूर करून माझी उपेक्षा का करीत आहात ? आपण दिलेल्या वरामुळे आपले चरण मला अंतरतील. तरी आपण मला पुढील जन्मीही पुनर्दर्शन द्यावे आणि माझ्या ठिकाणी आपल्या दैवी शक्तीचे संक्रमण करून माझी अनादि निद्रिस्त आत्मशक्ती जागृत करून मला दीक्षानुग्रह देऊन कृपापूर्वक ज्ञानदान करावे म्हणजे मी मुक्त होईन; कारण या ज्ञानास तुमचा दीक्षानुग्रहच कारण आहे. "

रजकभक्ताने श्रीपादश्रीवल्लभ श्रीगुरुराजांच्या चरणी अत्यंत शरणागतिपूर्वक व दीनतापूर्वक केलेली प्रार्थना ऐकून ते त्याला असे म्हणाले की, "हे रजकभक्ता! तुझा पुढील जन्म वैदुर (बिदर) नगरात होईल आणि शेवटी तुझी व आमची भेट होईल; कारण लोकांना दीक्षानुग्रह देऊन त्यांचा उद्धार करण्याकरिता आम्हाला पुन्हा अवतार धारण करावयाचा आहे. ज्यावेळी पुढील जन्मात तुला आमचे दर्शन होईल त्यावेळी त्याक्षणी तुला कृपापूर्वक शक्तिपात योगदीक्षानुग्रह होऊन तुझ्या चित्तात ज्ञानोदय होऊन तू ज्ञानसंपन्न होशील. याबद्दल माझ्यावर विश्वास ठेवून भरवसा धर. चिन्ता करू नकोस. आमचे येणे निश्चित घडेल. या कलियुगात इतर सर्व साधने करण्यास कठिण व ती प्राप्त होण्यास दुर्लभ झाल्यामुळे शक्तिपाताने म्हणजे कृपेने साधकांची अनादि निद्रिस्त आत्मशक्ती जागृत होऊन स्वतः आतून आपोआप सहजरीतीने चालणारे, साधकाला ज्ञानसंपन्न करणारे आणि गहन भजन व गुरवी भक्ती आतून प्रस्फुटित करणारे असे सिद्धयोगाचे साधन प्रवर्तित करण्याचे महान् कार्य व तद्द्वारा साधकभक्तांचे अखंड कल्याण व्हावे म्हणून आम्हाला अवतार धारण करावयाचा आहे. पुढील जन्मात आम्ही संन्यास घेऊ व भगवी वस्त्रे परिधान करून राहू. त्यावेळी आमचे नाव नृसिंहसरस्वती असे असेल."

श्रीपादश्रीवल्लभगुरूंनी रजकाला इतके सांगून ते त्याला असे म्हणाले की, "तू आता देहत्याग करून पुढील जन्म घेण्यास जा." हे ऐकताच रजकाने श्रीगुरुमहाराजांच्या जवळ जाऊन त्यांच्या चरणावर मस्तक ठेवून त्यांना नमस्कार केला. त्यानन्तर तो तेथून जाऊ लागला. त्यावेळी श्रीगुरूंच्या मनात पुन्हा एकदा एक महाविलक्षण विचार येऊन ते त्या परीटभक्ताला असे म्हणाले की," हे

रजकभक्ता ! तू या जन्मी राज्यभोग भोगतोस का पुढील जन्मी भोगतोस ?" श्रीगुरूंचा हा प्रश्न ऐकताच जीवाच्या अनादि भोगाच्या स्वाभाविक लालसेने व वासनेने परिप्लुत होऊन तो परीटभक्त श्रीगुरुदेवांना मोठ्या नम्रतेने विनंती करताना असे म्हणाला की, "महाराज ! मी आता वृद्ध झालो आहे. अशावेळी माझे हे म्हातारे व निरुपयोगी झालेले शरीर बाळपणातील व यौवनातील गोड राज्यभोग भोगण्यास असमर्थ आहे. याकरिता हे सर्व भोग मी पुढील जन्मातील नवीन देहाने भोगीन."

रजकाचे हे विचार ऐकून श्रीपादश्रीवल्लभगुरू निरोप देताना त्याला असे म्हणाले की, "हे रजका ! तू आता हा जन्म सोडून त्वरित दुसरा जन्म घेण्यास जा आणि पुढच्या जन्मी तुझ्या इच्छे-प्रमाणे सर्व भोग पूर्णपणे भोग."

श्रीगुरुराजांनी परिटभक्ताला असा निरोप देताच त्याने प्राणत्याग केला व प्रख्यात अशा वैदुरनगराच्या राजकुळामध्ये जन्म घेतला. पुढे श्रीपादश्रीवल्लभ कित्येक दिवस श्रीक्षेत्र कुरवपूर येथे राहिल्यावर पुढील अवतार धारण करण्याकरिता ते आश्विन वद्य द्वादशीच्या दिवशी निजानंदात बसून श्रीकृष्णेत गुप्त झाले. त्यानन्तर त्यांनी विदर्भातील कारंजा या गावी सौ. अंबाभवानी व श्री. माधव या दांपत्याच्या पोटी जन्म घेतला. त्यानन्तर त्यांनी नवव्या वर्षी श्रीक्षेत्र काशी येथे संन्यास घेऊन व भारतवर्षात सर्वत्र संचार करून पूर्व नियोजित अवतारकार्य पूर्ण केले. शेवटी आपले उर्वरित कार्य पूर्ण करण्याकरिता ते श्रीक्षेत्र गाणगापूर येथे येऊन राहिले. त्याचे वर्णन करताना श्रीसरस्वतीगंगाधर यांनी श्रीगुरुचरित्र या ग्रंथात त्यांचे स्तुतिस्तोत्र गाताना असे म्हटले आहे की—

भक्तानां तरणार्थं सर्वजगतां, दीक्षा ददन् योगिनां ।
सुक्षेत्रं पुरगाणगस्थित प्रभो, दत्वा चतुष्कामदम् ।
स्तुत्वा भक्तसरस्वती गुरुपदं, जित्वाद्यदोषादिकं ।
वन्देऽहं नरकेसरीसरस्वती श्रीपादयुग्माम्बुजम् ॥४२.१४३॥

याचा अर्थ असा आहे की, " हे प्रभो सद्‌गुरो ! श्रीमन् श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज ! या जगातील सर्व लोकांना व भक्तांना तारण्यासाठी आणि साधक योग्यांना सिद्धयोगाची दीक्षा देण्यासाठी म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने त्यांची अनादि निद्रिस्त प्राणरूप आत्मशक्ती महामाया कुण्डलिनी जागृत करून त्यांचे सुषुम्णामार्गद्वारा सहस्रारस्थ शिवाशी सामरस्ययुक्त महामिलन व्हावे म्हणून त्यांना मार्गस्थ करण्यासाठी आपला अवतार झाला आहे. आपण आपली सेवा करणाऱ्या भक्ताला धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चतुर्विध दुर्मिळ पुरुषार्थ देण्याकरिता क्षेत्रराज श्रीगाणगापुरात अखंड वास्तव्य करून राहिला आहात. भक्त श्रीसरस्वतीगंगाधराने श्रीगुरुचरणकमलद्वयांची स्तुती करून एकंदर सर्व दोष जिंकले आहेत. अशा श्रीदत्तात्रेयस्वरूप श्रीपादश्रीवल्लभ श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांच्या श्रीचरणकमलद्वयांना मी वन्दन करतो. ॥ श्रीगुरुचरित्र ४२.१४३ ॥

अशा रीतीने आपल्या उत्तरायुष्यातील उत्तरकार्याची पूर्ती करण्याकरिता श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गाणगापूर येथे आल्यानंतर अवतारसमाप्तीपूर्वी काही दिवस राहिले असताना पूर्वजन्मात वर प्राप्त झालेल्या रजकभक्तरूपी राजाच्या मांडीवर एक फोड झाला. तो वैद्यांच्या नाना प्रकारच्या औषधांनी बरा होत नाही असे पाहून त्याने आपल्या राज्यातील ब्राह्मणांना राजवाड्यावर बोलविले व तो त्यांना आपल्याला झालेली व्याधी

कोणत्या उपायाने दूर होईल हे विचारू लागला. त्यावेळी ते ब्राह्मण राजाला असे म्हणाले की –

पूर्वजन्मीं पापें करिती । व्याधिरूपें होऊनि पीडिती ।
दानधर्में तीर्थीं दैवतीं । व्याधी जाय परियेसा ॥ ५०.४१ ॥
अथवा भल्या सत्पुरुषासी । शरण जाऊनी भावेंसीं ।
तयाचे दृष्टीसुधारसीं । बरवें होईल परियेसा ॥ ४२ ॥
सत्पुरुषाचे कृपादृष्टीं । पापें जाती जन्मसाठीं ।
मग रोग कैंचा पोटीं । स्फोटकादि त्वरित जाय ॥ ४३ ॥
ऐकोनियां विप्रवचन । राजा करितसे नमन ।
मातें तुम्ही न म्हणा यवन । दास आपण विप्रांचा ॥ ४४ ॥
पूर्वजन्मीं आपण । केली सेवा गुरुचरण ।
स्वल्प पापास्तव झालो जाण । यवनाचें कुलीं देखा ॥ ४५ ॥

इतके सांगून ब्राह्मणांनी महानुभवाच्या दर्शनामुळे एका ब्राह्मणाचा व वेश्येचा उद्धार कसा झाला याची कथा राजाला सांगितली. त्यावेळी राजाने त्या ब्राह्मणांना असे विचारले की, "सध्या असे सत्पुरुष कोठे आहेत ते मला सांगा म्हणजे मी तेथे जाऊन त्यांचे दर्शन घेईन." त्यावेळी त्या ब्राह्मणांनी राजाला असे सांगितले की, "भीमातीरावर श्रीक्षेत्र गाणगापूर म्हणून स्थान असून तेथे परम सत्पुरुष श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज म्हणून राहतात. त्यांचे दर्शन होताच तू बरा होशील."

ब्राह्मणांनी सांगितल्याप्रमाणे राजा वैदुरनगराहून निघाला. येथून पुढे काय घडले याचे वर्णन श्रीसरस्वतीगंगाधरांच्या शब्दातच पाहण्यासारखे आहे. ते असे म्हणतात की –

एकभावें राजा आपण । घ्यावया श्रीगुरुदर्शन ।
प्रयाणावरी करी प्रयाण । आला गाणगापुरासी ॥ ५०.१६८ ॥

ग्रामीं पुसे सकळिकांसी । कोण येथें एक तापसी ।
रूप धरिलें संन्यासी । कोठें आहे म्हणतसे ।। १६९ ।।
भयभीत झाले सकळिक । म्हणती आतां न होय सुख ।
श्रीगुरूसी पुसती ऐक । काय करील न कळे म्हणती ।। १७० ।।
कोणी न बोलती तयासी । राजा कोपला बहुवसी ।
म्हणे आलों भेटीसी । दाखवा आपणासी म्हणतसे ।। १७१ ।।
मग म्हणती समस्त लोक । अनुष्ठानस्थानीं असे ऐक ।
अमराजा संगमीं माध्यान्हिक । करोनि येती ग्रामातें ।।१७२।।
ऐसें ऐकोनी म्लेंच्छ देख । समस्तां वर्जूनी आपण एक ।
बैसोनियां आंदोलिक । गेला तया स्थानासी ।। १७३ ।।
दुरोनि देखता श्रीगुरूसी । चरणीं चाले म्लेंच्छ त्वरेसी ।
जवळी गेला पाहावयासी । नमन करूनि उभा राहे ।। १७४।।
श्रीगुरु म्हणती तयासी । कां रे रजका कोठें अससी ।
बहुत दिवसीं भेटलासी । आमुचा दास होवोनियां ।। १७५ ।।
ऐसें वचन ऐकोनी । म्लेंच्छ झाला महाज्ञानी ।
पूर्वजन्म स्मरला मनीं । करी साष्टांग दंडवत ।। १७६ ।।
पादुकांवरी लोळे आपण । सद्‌गदित झालें अन्तःकरण ।
अंगीं रोमांच उठोन । आनन्दबाष्पें रुदन करी ।। १७७ ।।
पूर्वजन्म आठवोनी देखा । रुदन करी अति दुःखा ।
कर जोडोनी विनवी ऐका । नानापरी स्तुती करी ।। १७८ ।।
राजा म्हणे श्रीगुरूसी । कां उपेक्षिलें आम्हांसी ।
झालों आपण परदेशी । चरणावेगळें केलें मज ।। १७९ ।।
अंधकार सागरांत । कां घातले मज येथ ।
मी होऊनि मदोन्मत्त । विसरलों चरण तुझे ।। १८० ।।

संसारसागरमायाजाळीं । बुडालों आपण दुर्मति केवळी ।
सेवा न करीं चरणकमळीं । दिवांध झालो आपण ॥ १८१ ॥
होतासी तूं जवळी निधान । न ओळखें आपण मतिहीन ।
तमांधकारीं वेष्टोन । तुझे चरण विसरलों ॥ १८२ ॥
तूं भक्तजना नुपेक्षिसी । निर्धार होता माझे मानसीं ।
अज्ञानसागरीं आम्हांसी । कां घातलें स्वामिया ॥ १८३ ॥
उद्धरावें आतां मज । आलों आपण हेंचि काज ।
सेवोनी तुझे चरणरज । असेन आतां राज्य पुरे ॥ १८४ ॥
ऐसे नानापरी देखा । स्तुती करी राजा ऐका ।
श्रीगुरु म्हणती भक्त निका । तुझी वासना पुरेल ॥ १८५ ॥
राजा म्हणे श्रीगुरूसी । झाला स्फोटक आपणासी ।
व्यथा होतसे प्रयासीं । कृपादृष्टीं पहावे ॥ १८६ ॥
ऐसें वचन ऐकोन । श्रीगुरु करिती हास्यवदन ।
स्फोटक नाहीं दावीं म्हणोन । पुसताती यवनासी ॥ १८७ ॥
राजा पाहे स्फोटकासी । न दिसे स्फोटक अंगासीं ।
विस्मय करीतसे मानसीं । पुनरपि चरणीं माथा ठेवी ॥१८८॥
राजा म्हणे स्वामियासीं । तुझें प्रसन्नत्वें आम्हांसी ।
राज्य पावलो संतोषीं । अष्टैश्वर्यें भोगिलीं ॥ १८९ ॥
पुत्रपौत्र देखिले नयनीं । पूर्ण निवालों अंतःकरणीं ।
संकल्प असे माझें मनीं । अष्टैश्वर्यं माझें अवलोकावें ॥१९०॥
भक्तवत्सल ब्रीद्र तुझें । वासना पुरवावी जी माझे ।
इंद्रियसंसार उतरीं ओझें । लीन होईन तुझें चरणीं ॥१९१॥

अशा प्रकारे रजकभक्तराजाने केलेली विनंती श्रीपादश्रीवल्लभ श्रीमन्नृसिंहसरस्वतीगुरूंनी मान्य करून त्याच्या राज्यात जाऊन

त्यांनी त्याचे अष्टैश्वर्य पाहून त्याला ज्ञान कसे दिले याचे अपूर्व वर्णन करताना श्रीसरस्वतीगंगाधरांनी असे म्हटले आहे की—

ऐसें मनीं विचारूनी। श्रीगुरु निघाले संगमाहूनी।
राजा आपुले सुखासनीं। बैसवी प्रीती करोनियां ॥५०.२००॥
पादुका घेतल्या आपुले करीं। सांगातें येतसे पादचारी।
श्रीगुरु म्हणती आरोहण करी। लोकनिंदा तुज करिती ।२०१।
राष्ट्राधिपती तुज म्हणती। जन्म तुझा म्लेंच्छजाती।
ब्राह्मणसेवें तुज हांसती। जाती दूषण करतील ॥ २०२ ॥
राजा म्हणे स्वामी ऐक। कैंचा राजा मी रजक।
तुझें दृष्टीं असें चोख। लोह सुवर्ण होतसे ॥ २०३ ॥
मी राजा समस्त लोकांत। परी रजक तुझा भक्त।
पूर्ण झाले मनोरथ। तुझें झालें दर्शन मज ॥ २०४ ॥

★ ★ ★

ऐशा समारंभें देखा। घेऊन गेला राजा ऐका।
महाद्वारी पातले सुखा। पायघड्या अंथरती ॥ २४१ ॥
महासिंहासनस्थानीं। शृंगार केला अतिगहनी।
जगद्गुरूतें नेऊनी। सिंहासनीं बैसविलें ॥ २४२ ॥
राजा विनवी स्वामियांसी। पोष्यें देखिलें चरणांसी।
न्याहाळावें कृपादृष्टीसी। म्हणोनी चरणीं लागला ॥२४७॥
संतोषले श्रीगुरुमूर्ती। तयासी आशीर्वाद देती।
राजयाते बोलाविती। पुसताती गृहवार्ता ॥ २४८ ॥
श्रीगुरु म्हणती तयासी। संतुष्ट झालास कीं मनासीं।
अजूनि व्हावें काहीं भावेंसी। विस्तारोनि सांग म्हणती ।२४९।
राजा विनवी स्वामियांसी। अंतर पडतें चरणांसी।
राज्य केले बहुवसीं। आतां द्यावी चरणसेवा ॥ २५० ॥

> ऐसे ऐकोनी श्रीगुरु म्हणती । आमची भेटी श्रीपर्वती ।
> तुझे पुत्र राज्य करिती । तुवां यावें भेटीसी ।। २५१ ।।
> ऐसा निरोप देऊनी । श्रीगुरु निघाले तेथोनी ।
> राजा विनवी चरण धरोनी । ज्ञान मजला असावे ।।२५२।।
> कृपासिंधु श्रीगुरुनाथ । ज्ञान होईल ऐसें म्हणत ।। २५३ ।। "

ही सर्व गोष्ट सांगून झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांवर एकदा प्रेमळ दृष्टिक्षेप केला व ते वटवृक्षावरून उठून आपल्या नित्यकर्मासाठी श्रीकृष्णानदीच्या तीरावर निघून गेले. श्रीस्वामी-महाराजांनी सांगितलेली ही कथा ऐकल्यावर त्या आजारी सरकारी अधिकाऱ्यांना जीवाची गती, त्याच्या वासना, संसार भोग व मुक्ती या दोन्हींची प्राप्ती व्हावी म्हणून घडाळयाच्या लंबकाप्रमाणे सतत आंदोलित राहणारे मन, पूर्वजन्मीची पापे व्याधिरूप होऊन कशी पीडा देतात, त्यामुळेच श्रीगुरूंची प्राप्ती कशी होते आणि शेवटी इंद्रियसंसाररूपी ओझे उतरवून ते ज्ञान कसे देतात या सर्व प्रश्नांचा उलगडा झाल्यामुळे त्यांचे सर्व प्रश्न मनातल्या मनातच विरघळून गेले. श्रीस्वामीमहाराजांनी सुरुवातीला म्हटल्याप्रमाणे ही कथा सर्व जीवमात्रांची अपूर्व अशी प्रातिनिधिक कथा असल्याची त्यांना खात्री पटून त्यांच्या मनाचे कितीतरी पापुद्रे गळून पडून त्यांचा अध्यात्माचा पुढील मार्ग सुकर होण्यास मदत झाली.

श्रीस्वामीमहाराजांचे एक भक्तकुटुंब अर्थात् घरचा कर्ता पुरुष त्याची धर्मपत्नी व मुले ही पुण्यात राहात असत. श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास हा श्रीक्षेत्र कुरवपूर येथे चालू असल्याचे समजल्यावर या सर्व भक्तमंडळींना त्यांचे दर्शन घेण्याची तीव्र इच्छा झाली. हे इ. स. १९११ सालातील दिवस होते. त्या दिवसांमध्ये पुण्यात प्लेगने थैमान घातले होते. शहरात ठिकठिकाणी प्लेगचे

बळी पडत होते. या सर्व परिस्थितीमुळे पुण्याहून बाहेरगावी जाणाऱ्या लोकांना येथील अधिकाऱ्यांचे शिफारसपत्र घेतल्याशिवाय पुणे सोडता येत नव्हते. असे असले; तरी पुण्यातील ज्या भागात हे भक्त कुटुंब राहात होते, तेथे अद्याप प्लेगचा शिरकाव झाला नव्हता. त्यामुळे त्या भक्त कुटुंबीय मंडळींनी बाहेरगावी जाण्याचे शिफारसपत्र अधिकाऱ्यांकडून घेऊन ते सर्वजण रायचूरला जाण्यासाठी पुण्याच्या रेल्वे स्थानकावर आले.

ही सर्व मंडळी गाडीत बसण्यासाठी प्लॅटफॉर्मवर उभी असता तेथे त्यांना एक दक्षिणी तरुण गृहस्थ भेटले व त्या लोकांना त्यांनी आपण होऊन असे विचारले की, "आपण सर्व लोक कोठे जाणार आहात ?" त्यांचा हा प्रश्न ऐकून ते असे म्हणाले की, 'आम्ही सर्वजण रायचूरला चाललो आहोत." हे ऐकताच ते तरुण गृहस्थ त्यांना असे म्हणाले की, "मलाही रायचूरला जावयाचे आहे; तरी मी तुमच्या बरोबर प्रवास करू का ?" त्यांचे एकंदरीत अदबीने विचारणे व वागणे पाहून त्या सर्वांनी त्या गृहस्थांना आपल्याबरोबर येण्यास अनुमती दिली.

अशा रीतीने ही भक्त मंडळी व ते गृहस्थ आगगाडीत एका डब्यात बसून प्रवासाला निघाले. त्या प्रवासामध्ये पुणेकर भक्त कुटुंबीय मंडळींनी आपल्याबरोबर आणलेल्या फराळामध्ये त्यांच्या बरोबर आलेल्या दक्षिणी युवक गृहस्थांना सहभागी होण्याची विनंती केली व त्यांनीही ती आनंदाने मान्य केली. त्या दिवशी रात्री झोपण्यापूर्वी आपल्या नित्यनियमाप्रमाणे त्या कुटुंबीय मंडळींनी गाडीतच करुणात्रिपदी म्हटली. करुणात्रिपदीची पदे त्या तरुण गृहस्थांनी ऐकल्यावर त्यांनी साहजिकच त्यासंबंधी चौकशी केली तेव्हा ते लोक त्या तरुण गृहस्थांना असे म्हणाले की,

आम्ही आत्ताच म्हटलेल्या या करुणात्रिपदीची रचना एका महान् सन्त पुरुषांनी केली आहे. त्यांचे नाव परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वतीटेम्बेस्वामीमहाराज असे असून सध्या त्यांचा चातुर्मास श्रीक्षेत्र कुरवपूर येथे चालू असून आम्ही सर्वजण त्यांच्या दर्शनासाठीच तिकडे निघालो आहोत." हे ऐकल्यावर त्या तरुण गृहस्थांनी श्रीस्वामीमहाराजांविषयी अधिक माहिती ऐकण्याची इच्छा प्रकट करताच उर्वरित सर्व रात्र श्रीस्वामीमहाराजांविषयीच्या गोष्टी करण्यातच सर्वांनी घालविली.

दुसऱ्या दिवशी सकाळी ती भक्त मंडळी व ते दक्षिणी गृहस्थ वाडी जंक्शनवर उतरले. तेथे चहा वगैरे घेऊन नन्तर पुढे जावे असा विचार करून त्या भक्त मंडळीतील बाईंनी आपल्या बरोबर आणलेला स्टोव्ह बाहेर काढला व त्या चहा करण्याची तयारी करू लागल्या. ते सर्व पाहून त्यांच्या बरोबर आलेले ते सहप्रवासी त्या बाईंना असे म्हणाले की, या प्रदेशाची मला चांगली माहिती आहे; तरी मी आत्ता दूध घेऊन येतो." इतके सांगून ते भांडे घेऊन लगेच दूध आणावयास गेले.

ते तरुण गृहस्थ दूध आणावयास गेल्यावर थोडयाच वेळात एक सरकारी अधिकारी तेथे आले व ते त्या सर्व लोकांना असे म्हणाले की, "तुम्ही सर्व लोक पुण्याहून आला असल्यामुळे क्वारंटाईनमध्ये चला; कारण सध्या पुण्याला प्लेग चालू आहे." त्या अधिकाऱ्यांचे हे म्हणणे ऐकताच त्या भक्त मंडळींनी त्यांना आपल्या जवळील पुण्याच्या अधिकाऱ्यांनी दिलेले शिफारसपत्र दाखविले; परन्तु त्या अधिकाऱ्यांनी ते शिफारसपत्र मानले नाही.

आता काय करावयाचे असा प्रश्न त्या सर्व भक्तमंडळींपुढे उभा

राहिला; इतक्यात ते तरुण गृहस्थ दूध घेऊन आले. त्यांनी एकंदर सर्व हकीकत ऐकल्यावर व त्या अधिकाऱ्यांना खूप समजावून सांगूनही ते ऐकत नाहीत असे लक्षात आल्यावर त्या सर्व भक्तमंडळींना ते असे म्हणाले की, "सध्या आपण क्वारंटाईनमध्ये जाऊ या. रायचूरचे मुख्य अधिकारी हे माझे काकाच आहेत. त्यांना सांगितले की, आपली सुटका होईल." इतके सांगून ते तरुण गृहस्थ तार करावयाला जाऊ लागले; परन्तु क्वारंटाईनचे अधिकारी त्यांना जाऊ देईनात. त्यावेळी त्या तरुण गृहस्थांनी जवळच उभ्या असलेल्या एका हमालाला सांगून तारेचा फॉर्म मागविला व तार लिहून त्या हमालाकडे पैसे देऊन रायचूरला तार करविली. "सत्कामाः फलन्तु ते" या न्यायाने तो हमालही प्रामाणिक निघाला; कारण तार करून आल्यावर उरलेले पैसे तो परत करू लागला. परन्तु या तरुण गृहस्थांनी त्या हमालाला ते पैसे बक्षीस दिले. त्यानंतर ती सर्व मंडळी त्या अधिकाऱ्यांबरोबर क्वारंटाईनमध्ये जाऊन बसली.

अशा रीतीने एक तास निघून गेल्यावर त्या भक्त कुटुंबीय मंडळींचा व तरुण गृहस्थांच्या सुटकेचा हुकूम आला. त्यानन्तर ही मंडळी दुसऱ्या गाडीने रायचूरला पोहोचली. तेथे उतरल्यावर त्या तरुण गृहस्थांनी पुण्याच्या सर्व भक्तमंडळींना आपल्या काकांच्या घरी नेले व त्यांच्या जेवणाची व्यवस्था केली. सर्वांनी आनन्दाने भोजन केल्यावर थोडी विश्रांती घेतली. त्यानन्तर त्या तरुण गृहस्थांच्या काकांनी बैलगाडी आणवून श्रीस्वामीमहाराजांच्या भक्त मंडळींची श्रीक्षेत्र कुरवपूर येथे जाण्याची सोय करून दिली. या लोकांबरोबर आलेल्या तरुण गृहस्थांना रायचूर येथेच राहावयाचे असल्यामुळे त्यांनी या मंडळींना आपला पुण्यातील पत्ता दिला व ते त्यांना

असे म्हणाले की, " आपण सर्व लोक पुण्याला परत आल्यावर आमच्या घरी अवश्य भेटण्यास यावे. "

त्यानन्तर कालौघात ही सर्व भक्त मंडळी श्रीक्षेत्र कुरवपूर येथे जाऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शन, पुराणश्रवण, सत्संग, सहवासादि सर्व सुखांचा लाभ घेऊन जेव्हा पुण्याला परत आली तेव्हा त्यांनी त्या तरुण गृहस्थांनी दिलेल्या पुण्यातील पत्त्यावर त्यांची चौकशी केली. त्यावेळी त्यांना असे कळले की, अशा नावाचा व वर्णनाचा कोणताही तरुण माणूस येथे राहात नव्हता. अशा रीतीनें चौकशी करूनही ज्यावेळी त्या तरुण गृहस्थांचा काहीच पत्ता लागला नाही, त्यावेळी ती सर्व मंडळी आश्चर्याने अगदी दिङ्मूढ होऊन गेली. त्यांच्या मनात असे प्रश्न उभे राहिले की, " त्या गृहस्थांनी असे का केले ? ते आपल्याला पुन्हा का भेटले नाहीत ? ते खरोखरच कोण होते ?"

या सर्व प्रश्नांचे उत्तर त्या सर्व भक्तमंडळींनी आपल्या मनाशी असे घेतले की, ते गृहस्थ म्हणजे साक्षात् श्रीपादश्रीवल्लभच असून त्यांनीच आपणावर येणारे संकट ओळखून तसे रूप घेऊन आपल्याला प्रवासात सोबत करून मदत केली. देव आपल्या भक्तांचा सांभाळ करीत असतो हेच खरे ! या दृष्टीनेच श्रीसंत तुकाराममहाराजांच्या पुढील अभंगांचे व श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांच्या एकवीस समासी या प्रकरण ग्रंथातील ओव्यांचे स्मरण होऊन देवांच्या भक्तावरील प्रेमाचा प्रत्यय येऊन भावविभोर झाल्याशिवाय राहात नाही.

**जेथें जातो तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥१॥**
**चालों वाटे आम्हीं तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ॥२॥**
**बोलों जातां बरळ करिसी तें नीट । नेली लाज धीट केलों देवा ॥३॥**

अवघे जन मज झाले लोकपाळ। सोइरे सकळ प्राणसखे ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां खेळतो कौतुकें। झालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥ ५ ॥

★ ★ ★

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव। आपणचि देव होय गुरु ॥ १ ॥
पढियें देहभाव पुरवी वासना। अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥ २ ॥
मागें पुढें उभा राहे सांभाळीत। आलिया आघात निवारावे ॥ ३ ॥
योगक्षेम त्याचें जाणे जडभारी। वाट दावी करीं धरूनियां ॥ ४ ॥
तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं। पहावे पुराणीं विचारूनि ॥५॥

★ ★ ★

एका भावार्थासाठीं। देव लागे भक्तांपाठीं।
भाव नसतां जगजेठी। प्राप्त नाहीं ॥ ए. स. ७.८ ॥
शिष्य म्हणे गुरुदेवा। भाव तरी कोठें धरावा।
कोण उपाय करावा। भाव धरुनि ॥ ९ ॥
भावें घ्यावें हरीचें नाम। हृदयीं धरावें प्रेम।
मानसपूजा नित्य नियम। केले पाहिजेती ॥ १० ॥
धरोनियां सत्त्वगुण। भावें करावें कीर्तन।
अथवा करावें श्रवण। अत्यादरें करूनी ॥ ११ ॥
सगुणमूर्तींचीं चरित्रें। श्रवण करावी पवित्रें।
ध्यानें विविध विचित्रें। अंतरीं धरावी ॥ १२ ॥
निग्रहनेमाचें बळ। असता प्राप्ति तत्काळ।
दुराशा करी तळमळ। निग्रह भ्रष्ट ॥ १३ ॥
जेथें निग्रहेंसी धाष्टर्य वसे। तेथें देव सन्निधची असे।
सोडी संशयाचें पिसें। एतद्विषयीं ॥ १४ ॥
तरी निग्रह धारिष्ट जडे। हें वैराग्याविण न घडे।
दृढ वैराग्य होतां उडे। पांग देहाचा ॥ १५ ॥

देहपांग अनादरें बळे । तेथें धारिष्ट उठोनि पळे ।
सद्भावपूर्ण ढांसळे । पूर्ण धारिष्ट नसतां ।। १६ ।।
देह पडे कां देव जोडे । ऐशी हाव अंगीं जडे ।
तेणें गुणें वैराग्य चढें । महाप्रबळ ।। १७ ।।
देहपांग निःशेष भंगे । तेव्हां प्राप्तीसी वेळ न लागे ।
देव भक्तांपाठी लागे । नाभी नाभी म्हणोनि ।। १८ ।।
बाळक आपण रक्षू नेणें । म्हणोनि मातेसि लागे रक्षणें ।
तेचि बाळक शहाणें । होतां माता विसंबे ।। १९ ।।
तैसा भक्त भगवंतीं प्रेमा । लावूनि उल्लंघी देहसीमा ।
तयाचा सांभाळ आत्मयारामा । करणें घडें नेमस्त ।। २० ।।
सर्वस्वाची आस सुटे । तरीच सगुणमूर्ति प्रकटे ।
दुःख संसारीचें फिटे । एकसरा ।। २१ ।।

पुण्याचे श्री. रघुनाथ चिमणाजी थत्ते यांच्या पत्नीला पिशाच्च-बाधा झाली होती. श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र कुरवपूर येथे आहेत असे कळताच ते आपल्या पत्नीला घेऊन त्यांच्या दर्शनाला गेले. श्री. रघुनाथराव यांनी आपल्या पत्नीसंबंधीची सर्व हकीकत श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी निवेदन केल्यावर काही क्षण स्तब्ध राहिल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आज श्रीदेवांना विचारून उद्या यासंबंधी आपणास निर्णय सांगीन." श्री. रघुनाथराव यांना सांगितल्याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी त्या दिवशीच श्री. रघुनाथराव यांच्या पत्नीच्या बाधेसंबंधी सर्व हकीकत श्रीदेवांच्या कानावर घातली व त्यांना बरे करण्यासंबंधी प्रार्थना केली. श्रीस्वामीमहाराजांनी केलेली ही प्रार्थना ऐकताच श्रीदेव त्यांना असे म्हणाले की, "रघुनाथराव यांच्या मंडळींची व्यवस्था आपण नरसोबावाडीला करू. येथे त्यांच्यासंबंधी काहीही

उपाययोजना करता येणार नाही, त्याबद्दल तुम्ही कसलीही काळजी करू नये."

श्रीस्वामीमहाराजांनी दुसऱ्या दिवशी श्रीदेवांचे हे म्हणणे श्री. रघुनाथराव यांना सांगितले व ते त्यांना असे म्हणाले की, "ज्या अर्थी आपल्या मंडळींची प्रकृती श्रीक्षेत्र नरसोबावाडीला बरी करण्याचे अभिवचन श्रीदेवांनी दिले आहे त्या अर्थी आपण आपल्या मंडळींसह तेथे जाऊन राहावे व श्रीदेवांची सेवा करावी." श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे श्री. रघुनाथराव थत्ते लगेचच आपल्या मंडळींसह श्रीक्षेत्र नरसोबावाडीला गेले. तेथे बरेच दिवस सेवेला राहून त्यांनी श्रीदेवांची कृपा संपादन केली. त्यामुळे श्री. रघुनाथराव यांच्या मंडळींची प्रकृती सुधारून त्या उत्तम बऱ्या झाल्या.

ही सर्व कथा वाचली म्हणजे देवभक्तांच्या अंतरंग लीलेवर फारच उत्तम प्रकाश पडतो. जरी आपल्या अपार सामर्थ्याने श्रीस्वामीमहाराज श्री. थत्ते यांच्या पत्नीची बाधा दूर करू शकत असले तरी सर्वकाही श्रीदेवांच्या इच्छेप्रमाणे घडावे अशी श्रीस्वामीमहाराजांची इच्छा असल्यामुळे त्यांनी श्रीदेवांकडूनच या गोष्टीचा निर्णय करवून घेतला. वास्तविक पाहता नेहमी देवच भक्ताचे वैभव वाढवीत असतात; परन्तु येथे भक्तानेच देवांचे वैभव वाढविले आहे. हे पाहिले म्हणजे श्रीस्वामीमहाराजांच्या निरभिमानवृत्तीची व देवांच्या ऐक्यरूप प्रेमाची प्रचीती येऊन मन आनंदाने भरून जाते. श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी या विषयासंबंधीचे जे स्वानुभूत्यात्मक उद्गार "एकवीस समासी" या प्रकरण ग्रंथात समाविष्ट केले आहेत ते पाहिले म्हणजे श्रीराम व श्रीसमर्थ या देवभक्तांच्या आधाराने श्रीदत्त व श्रीस्वामी या देवभक्तांच्या अंतरंगलीलेत प्रवेश करणे आपणा सर्वांना सुकर जाईल असा विश्वास वाटतो.

निरभिमानी जे समर्थ । तयांसी साजे हा परमार्थ ।
अभिमान वाहे तो पदार्थ । भूमिभार जाहला ।। ए. स. ३.९१।।
श्रोते ऐकती आदरें । तरी बोलेन बोबडी उत्तरें ।
स्वामी तुमचेनि आधारे । होईन निरभिमान ।। ९२ ।।
जैसें मायबाप वर्तती । तैसीच क्रिया लेकुरें धरिती ।
म्हणोनि श्रोतीं वक्ती । निरभिमान असावें ।। ९३ ।।
तुम्ही स्वयें निरभिमान । परी माझे ठायीं अभिमान ।
असेल म्हणोनि हें साधन । पाय तुमचे ।। ९४ ।।
माझ्या अंगीं अभिमान जडे । तर गोष्टी येईल स्वामीकडे ।
जैसा परिवार पळतां मोडे । महत्त्व नृपतीचे ।। ९५ ।।
तुम्हां सज्जनांची कृपा मज । आणि उरेल अभिमान-फुंज ।
तरी हे माझी लाज । तुम्हांसच कीं ।। ९६ ।।
स्वामी तुमचेनि प्रतापें । कृतान्त काळ तोही कांपे ।
तुमचेनि वचनमात्रें सोपें । होय परब्रह्म ।। ९७ ।।
तुमची कृपा जेथें घडे । तयासीच परब्रह्म जोडे ।
प्राणी सुटती रोकडे । दुःखापासोनि सर्वदा ।। ९८ ।।
तुम्हांसी शरण अनन्यभावें । जातां लुटी आनन्द फावे ।
तया सुखाची मिरवे । ते शांति अंगीं ।। ९९ ।।
एका भावार्थासाठीं । उघडे शब्दरत्नपेटी ।
अनर्घ्य-रत्नांची गोमटी । माला वसे हृदयीं ।। १०० ।।
तुमचेनि उच्छिष्टलेशें । आणि गुरुशिष्यांचेनि मिसें ।
सांगिजेल जेणें पिसें । झडे जीवपणाचें ।। १०१ ।।

  

श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास श्रीक्षेत्र कुरवपूर येथे चालू असताना एके दिवशी वऱ्हाडातील हरदा या गावचे श्री. वामनराव

या नावाचे एक सुखवस्तू म्हातारे ब्राह्मण गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले. या गृहस्थांची श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी एकांतिक श्रद्धा व भक्ती असल्यामुळे एके दिवशी त्यांनी त्यांना अशी प्रार्थना केली की, " महाराज आपल्या उपस्थितीमध्ये रुद्रस्वाहाकार करावा अशी माझी कितीतरी दिवसांची इच्छा आहे. तरी आपण आपला येथील चातुर्मास संपताच आमच्या उटी या गावी येऊन माझ्याकडून रुद्रस्वाहाकार करवून घ्या. " अत्यंत भक्तिभावाने केलेली ही प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराजांचे हृदय द्रवले व त्यांनी श्री. वामनरावांची प्रार्थना मान्य केली.

आपल्या प्रार्थनेला श्रीस्वामीमहाराजांनी होकार दिला हे ऐकून श्री. वामनरावांचे हृदय भरून आले व त्यांच्या डोळयातून अश्रू पाझरू लागले. त्या अवस्थेतच त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घातला. श्री. वामनराव उठून उभे राहण्यापूर्वीच अकस्मात् तेथे जवळच रचून ठेवलेल्या चिंचेच्या पोत्यांपैकी एक पोते त्यांच्या अंगावर पडले. त्या जबरदस्त आघाताने श्री. वामनराव मूच्छित झाले. त्यावेळी तेथे उपस्थित असलेल्या सर्व लोकांना अशी भीती वाटली की, हा तीव्र धक्का श्री. वामनरावांना काही सहन होणार याही. अशा स्थितीत श्री. वामनराव बराच वेळ झाला तरी शुद्धीवर येत नाहीत असे पाहून श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या कमंडलूतील तीर्थ त्यांच्या अंगावर शिंपडले. त्या अमृतस्वरूप तीर्थाने श्री. वामनराव तत्काळ शुद्धीवर आले.

श्री. वामनराव शुद्धीवर आल्यावर ते चातुर्मास संपण्यापूर्वीच आपल्या गावी गेले. श्रीस्वामीमहाराजांनीही त्यांना वचन दिल्याप्रमाणे चातुर्मास संपल्यानंतर उटी या गावी जाऊन त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांच्याकडून श्रीरुद्रस्वाहाकार आपल्या समक्ष करवून घेतला.

श्रीस्वामीमहाराजांनी आपली इच्छा पूर्ण केल्याने श्री. वामनराव यांना परम समाधान प्राप्त झाले.

श्रीस्वामीमहाराजांचा श्रीक्षेत्र कुरवपूर येथे चातुर्मास चालू असताना येथे येणाऱ्या जाणाऱ्या लोकांची उत्तम व्यवस्था व्हावी व त्या रूपाने श्रीस्वामीमहाराजांची सेवा घडावी म्हणून ज्या ज्या लोकांनी सामान वगैरे पुरवण्याच्या कामी साहाय्य केले त्यामध्ये, रायचूरचे कोमटी व्यापारी श्री. तुळजाराम पतंगे यांची सेवा विशेष डोळ्यात भरण्यासारखी होती. या काळात ते आपल्या पत्नीला व सुनेला घेऊन श्रीक्षेत्र कुरवपूर येथेच सेवेसाठी येऊन राहिले होते; कारण त्यांच्या पत्नीला व सुनेला पिशाच्चबाधा झाली होती. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाने व सेवेनेच या दोघांची बाधा दूर होईल अशी श्री. तुळजारामभाऊंची पक्की श्रद्धा असल्यामुळे, त्यांनी, चातुर्मास संपत आला; तरी ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर घातली नव्हती.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथील चातुर्मास संपल्यानन्तर ज्यावेळी श्रीस्वामीमहाराज तेथून जावयास निघाले त्यावेळी श्री. तुळजाराम-भाऊ यांनी आपल्या सौ. मंडळींच्या व सौ. सुनबाईंच्या पिशाच्च-बाधेसंबंधी सर्व हकीकत त्यांच्या कानावर घातली व ते त्यांना असे म्हणाले की, " महाराज ! वर्षानुवर्षे होणारा या दोघींचा त्रास आपण दूर करून आमच्या घरात स्वास्थ व शांतता नांदेल अशी, आपण माझ्यावर कृपा करा एवढीच माझी आपल्या चरणी प्रार्थना आहे." अशी प्रार्थना करून श्री. तुळजारामभाऊ हात जोडून श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे उभे राहिले; परन्तु श्रीस्वामीमहा-राजांनी त्यांना काहीच उत्तर दिले नाही.

आपल्या घरातील पिशाच्चबाधा दूर व्हावी म्हणून श्रीस्वामी-महाराजांनी आपणास कोणताही उपाय सुचविला नाही व ते गप्प बसले हे पाहून श्री. तुळजारामभाऊ अत्यन्त खिन्न झाले. श्री. तुळजारामभाऊ अत्यन्त उदास झालेले पाहून त्यावेळी तेथे उभे असलेले श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त श्रीगांडामहाराजही त्यांची ही हकीकत ऐकून अगदी द्रवून गेले. त्यांच्या अंत:करणात श्रीतुळजा-राम भाऊंच्या सौ. मंडळी व सौ. सूनबाईंच्या विषयी अत्यन्त कळवळा उत्पन्न झाला. त्याच वेळी श्रीतुळजारामभाऊ श्रीगांडामहाराजांना असे म्हणाले की, " महाराज ! आपल्यावर श्रीस्वामीमहाराजांचे अत्यन्त प्रेम आहे. आपण त्यांचे अंतरंग भक्त आहात. तरी आपण माझ्याकरिता श्रीस्वामीमहाराजांच्यां चरणी प्रार्थना करून आमच्या घरातील ही पीडा दूर व्हावी म्हणून काही तरी उपाय विचारून घ्या व तो मला सांगा. "

श्री. तुळजारामभाऊंची ही विनंती ऐकताच श्रीगांडामहाराज त्यांना असे म्हणाले की, " आता श्रीस्वामीमहाराज चातुर्मास संपवून संचारार्थ दूर दूर जाणार. त्यामुळे त्यांना विचारून तुम्हाला कळ-विण्यास वेळ होईल किंवा कसे ते काही सांगता येत नाही. तरी आपण श्रीस्वामीमहाराज ज्या पोत्यावर या चातुर्मासभर निजले ते हे पोते घ्या व त्याची नित्य पूजा करीत जा. त्याचप्रमाणे आपल्या घरात ज्यांना पिशाच्च बाधा झाली असेल त्यांना या पोत्याच्या दशा पाण्यात भिजवून ते पाणी तीर्थ म्हणून द्या म्हणजे त्या सर्वांची बाधा, पीडा, त्रास इत्यादि सर्व दूर होईल. " श्रीगांडामहाराजांनी दिलेल्या पोत्याचा अत्यन्त आनन्दाने प्रसाद म्हणून स्वीकार करून श्री. तुळजारामभाऊंनी त्यांनी सांगित्याप्रमाणे त्या पोत्याच्या दशांचे पाणी आपल्या सौ. मंडळींना व सौ. सूनबाईला दिल्याबरोबर

त्या दोघींची पिशाच्चबाधा दूर झाली व श्री. तुळजारामभाऊंच्या घरात शांतता, प्रसन्नता व समाधान नांदू लागले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे हे लक्षात येते की, महापुरुषांनी वापरलेल्या वस्तूंमध्येही त्यांचे सामर्थ्य संक्रात होऊन निवास करून राहते, हे नितान्त सत्य आहे. महानुभाव संप्रदायाचे प्रवर्तक श्रीचक्रधरस्वामींचे चरित्रलेखक श्री. म्हाईंभट यांनी त्यांच्यासंबंधी "लीळाचरित्र" या ग्रंथात असे लिहिले आहे की, "येथचिया संबंधा आले गेले ओटे – गोटे तुम्हा नमस्करणीय की गा."- या दृष्टीने श्री. गोपाळात्मज विरचित श्रीआनंदचरित्रामृत या ग्रंथातील पुढील प्रसंग मोठा वाचनीय, मननीय व अनुकरणीय आहे, याची खात्री पटल्याशिवाय राहणार नाही. समर्थ पंचायतनातील श्रीआनंदमूर्ती ब्रह्मनाळकर यांनी आपले श्रीसद्‌गुरू श्रीरघुनाथस्वामी यांच्या निर्णयानन्तर त्यांची समाधी बांधून उत्सव केल्यावर त्या उत्सवास आलेले त्यांचे गुरुबन्धू श्रीजयरामस्वामी वडगावकर यांनी त्यांना आपल्याबरोबर नेले. त्यावेळी त्यांच्या पूजेत असलेल्या सद्‌गुरू श्रीरघुनाथस्वामींच्या चामडयाच्या जोडयांची श्रीमद्‌भगवद्‌गीतेची पोथी होऊन वाचणाऱ्याला समाधी कशी लागली व पुन्हा त्या पोथीच्या चामडयाच्या पादुका कशा झाल्या याचे वर्णन करताना श्री. गोपाळात्मज असे म्हणतात की–

स्वमठीं जातां जयराम। आनंदास नेती समागमें।
ब्रह्मसुख निरुपम। त्यामाजीं निमग्न सदैव ॥ ४.६१ ॥
श्रीरघुनाथ-वियोगें बहुत। आनंदमूर्ती अतिदु:खित।
जयरामस्वामि-समागमांत। चित्तीं समाधान पावले ॥६२॥
स्वामींचें चर्मी पायतन। सोवळयांत सुबक वेष्टन।
घालोन गवाळयांत बांधून। प्रत्यही पूजन त्याचें करी ॥६३॥

कोणी पुसिलें स्वभावें। तयातें साक्षेपें सांगावें।
श्रीमद्भगवद्गीतेचें नांव। संकोच न करितां मानसीं ॥६४॥
निषिद्ध चर्मी उपान (जोडा)। सोवळ्यांत पाळी विद्वज्जन।
हें लोकविरुद्ध जाणोन। गौप्य पूजन करीतसे ॥ ६५ ॥
कोणे दिवसीं वडगांवीं। गेले आनंदमूर्ती जावाई।
द्वादशीस प्रातःसमयीं। पाकसिद्धी जाहली ॥ ६६ ॥
स्वामींस नमस्कारिलें। तंव स्वामियें आज्ञापिलें।
स्नान सत्वर करोनि वहिलें। आन्हिक वेगें संपादा ॥६७॥
मठीं उदकाचें प्रतिकूळ। यास्तव वापीस स्नाना गेले।
गवाळें काढोन बाहेर ठेविलें। वदले कोणी सोडूं नये ॥६८॥
एसें सांगोन त्वरितगती। गमन केलें स्नानाप्रती।
परंतु शंका असे चित्तीं। गवाळें कोणी सोडतील ॥ ६९ ॥
त्यांतील पूज्य पदार्थ। कोणी पाहतील अवचित।
उपहास होईल जगांत। काय कैसें करावें ॥ ७० ॥
हा संशय होता मनीं। कर्मसंयोगें गृहस्थ कोणी।
स्नान केलें वेगेंकरोनी। स्वामींपाशीं पातला ॥ ७१ ॥
म्हणे गीता पाठनेम। पुस्तक नाहीं समागमें।
मठांतील गीता सहस्रनाम। वाचावयासी देईजे ॥ ७२ ॥
एक तरी अध्याय वाचल्याविणें। भोजन मज नाहीं करणें।
मग स्वामियें आणि दुजा जनें। सहजवृत्ती निरोपिलें ॥७३॥
हें गवाळें आनंदमूर्तीचें। सोडोन पुस्तक घ्यावें तुम्हीच।
अध्याय वाचोनि सत्वरच। बांधोन येथें ठेविजे ॥ ७४ ॥
आनंदमूर्तीचें गवाळें। सोडून पुस्तकाचें गांठोळें।
काढोन अध्याय शीघ्र काळें। वाचोनिया ठेविजे ॥ ७५ ॥

येरें तसेंच केलें। गवाळें सोडून पाहिलें।
तों दिव्य पुस्तक वेष्टिलें। दिव्य वस्त्रें करोनिया ॥ ७६ ॥
वस्त्रांतून वस्त्रें निघती। अंत पाहिली दिव्य पोथी।
सुवाच्च अक्षरांची पंक्ती। तिळतुल्य अशुद्ध नाढळे ॥ ७७ ॥
परम आनंदें वाचणार। विस्मय करी वारंवार।
म्हणे पुस्तक बहु सुंदर। धन्य लेखक सुज्ञाता ॥ ७८ ॥
वाचता वाचता समाधी। त्या लागली निरवधी।
स्वानंदसाम्राज्यापदीं। बैसला चर्मपादुकारूप गीतेने ॥७९॥
अघटित-घटना-पटु श्रीरघुनाथ। काय हे अशक्य त्यातें।
महेंद्र-पद भणंगाते। अर्ध क्षणात देणार ॥ ८० ॥
तया काय हे अगाधु। क्षणांत करिती बिन्दूचा सिन्धु।
भक्तजन जाणिती निर्द्वन्द्वु। उपानह पुस्तक जाहले ॥८१॥
हळू हळू समाधी उतरली। गृहस्थ आले भानावरी।
पोथी पुन्हा उचलली। वाचावयासाठी ॥ ८२ ॥
एक अध्याय वाचोन त्वरित। दाविलें पुस्तक मंडळींत।
स्वामीनें पाहिलें पुरतें। पुस्तक सुवाच्य या हेंतू ॥ ८३ ॥
मग पोथी गुंडाळोन। ठेविली गवाळ्यांत बांधोन।
इतुक्यांत स्नान करोन। आनंदमूर्तीही पातले ॥ ८४ ॥
गवाळें पाहतां आपुली। खूण व्यस्त दिसोन आली।
स्वामींलागी पृच्छा केली। गवाळें कोणी सोडलें ॥ ८५ ॥
स्वामी वदले यथार्थ। एक गृहस्थ हा नेमस्थ।
गीता वाचावयालागी सत्य। पोथी घेतली ममाज्ञें ॥ ८६ ॥
वाचोन ठेविली जैसी तैसी। क्रोध न आणावा मानसीं।
सर्वंही बोलिले तयांसी। पुस्तक कोठें संपादिलें ॥ ८७ ॥

अक्षर बहु रसाळ सुंदर । अशुद्ध नसे तिळमात्र ।
या शब्दें आनंद-अंतर । खोंचलें स्वकृत्य आठवोन ॥ ८८ ॥
पाहोन चर्मी पायतान । उपरोध भाषें मम हेळण ।
करितात ऐसें समजोन । संकोचित झाले अंतरीं ॥ ८९ ॥
शास्त्रार्थ सांगे आनंदमूर्ती । "चर्मं तैलेन शुद्ध्यति" ।
स्वाम्यंघ्रि-स्पर्श चर्माप्रती । शुद्धता आली निश्चयें ॥ ९० ॥
ऐसें बोलता सकल जन । म्हणती कायसे शास्त्रवचन ।
प्रत्यक्ष पुस्तक असोन । चर्मवार्ता कां बोलतां ॥ ९१ ॥
एसें बोलून नावेक । स्तब्ध राहिले सर्व लोक ।
आनंदमूर्ती गवाळें देख । सोडोनिया पाहिलें ॥ ९२ ॥
सुवाच्च गीतामात्र दिसे । पूजापदार्थ कोठें नसे ।
विस्मय करोन निज मानसें । गौप्य रडूं लागले ॥ ९३ ॥
हें वृत्त जयरामस्वामींस । सांगती जावोनि सायास ।
आनंदमूर्ती बहु उदास । काय निमित्त रडताती ॥ ९४ ॥
स्वामींनीं आणिता ध्याना । समजों आल्या सर्व खुणा ।
आनंदमूर्तीस श्रीगुरुराणा । बोलता झाला आवडीं ॥ ९५ ॥
तुम्ही उदासीन तें गुह्य । मज सर्व समजताहे ।
पुस्तक पाहिजे तरी सिद्ध आहे । स्वस्थ चित्तें अवधारा ॥९६॥
पाहिजे तरी पूज्य पदार्थ । आताच सिद्ध होईल त्वरित ।
मुख्य शुद्ध भावार्थ । गुरुकृपेसी कारण ॥ ९७ ॥
आनंदमूर्ती जोडूनि पाणि । श्रीजयरामास वदे वाणी ।
स्वामींनीं ऐकोन विनवणी । मनोरथ पूर्ण करावा ॥ ९८ ॥
प्रयत्नें गीता पुस्तक मिळे । पूजापदार्थ अति सुदुर्मिळ ।
जेथें विश्रामलें अंघ्रिकमळ । स्वामी श्रीरघुनाथाचें ॥ ९९ ॥

त्या पादरक्षा निजडोळां। केव्हां देखेन दयाळा।
येरु म्हणे याचिये बोला। पुस्तक सोडून पाहे बा ॥ १०० ॥
येरु पाहे गवाळें सोडून। तों आंत गुरूचे पादत्राण।
अगाध घटना देखून। चमत्कारिला निजमनीं ॥ १०१ ॥
स्वामी करी तें काय न होय। एसें वर्तले नवजाय।
असाध्य जरी साध्य होय। येथें संशय न धरावा ॥ १०२ ॥
देखोनिया आश्चर्य। सर्व करिती विस्मय।
धन्य निष्ठा श्रीगुरुराय। गुरुभक्तांत अवतंस (शिरोभूषण)
तेंच उपान अद्यापवरी। दृढबंधनीं ब्रह्मनाळ क्षेत्रीं।
संरक्षिलें बहुतापरी। सद्वंशजें आवडी ॥ १०४ ॥
कीर्तीनें भरलें दिगंतर। आनंदमूर्तीसी म्हणती नर।
भक्तीस लागले लोक अपार। निर्व्यलीक (श्रद्धाळू) होऊनी

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे चातुर्मास चालू असताना एके दिवशी एक संन्यासी योगाभ्यास शिकण्याच्या उद्देशाने श्रीस्वामीमहाराजांकडे आले. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना आपणास योगाभ्यास शिकविण्याविषयी प्रार्थना केली असता योगाभ्यास शिकविण्यास ते संन्यासी अपात्र व अनधिकारी आहेत असे आढळून आल्यामुळे श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आपल्या शरीराला योगाभ्यास पेलवेल व आपणाकडून तो होईल असे वाटत नसल्यामुळ आपणास त्यासंबंधी काही शिकविता येणार नाही. तरी आपण योगाभ्यास शिकण्याचा आग्रह न धरता यापुढे वेदान्ताच्या चिन्तनात काल व्यतीत करून जीवनाचे सार्थक करून घ्यावे; कारण यातच आपले कल्याण आहे."

अशाप्रकारे श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या योगाभ्यास शिकण्याच्या इच्छेस नकार दिल्याचे पाहून त्या संन्याशांचा अहंकार

दुखविला गेला. त्यामुळे ते एकदम संतप्त झाले व श्रीस्वामीमहाराजांना अद्वातद्वा बोलू लागले. ज्यावेळी ते संन्यासी रागारागाने बोलत होते त्यावेळी श्रीस्वामीमहाराज महासागरासारखी शान्तता धारण करून त्यांचे बोलणे ऐकत स्वस्थ बसून राहिले होते. आपण इतके संतप्त होऊन बोलत असलो; तरी श्रीस्वामीमहाराज आपणास काहीच उत्तर देत नाहीत असे पाहून शेवटी ते रागारागाने श्रीक्षेत्र कुरवपूर येथून परत निघाले.

श्रीक्षेत्र कुरवपूरसारख्या लहानशा बेटावर घडलेला हा प्रसंग तत्काळ सर्व लोकांना कळला व श्रीस्वामीमहाराजांना हे संन्यासी गृहस्थ अद्वातद्वा बोलून त्यांच्यावर रागावले हे समजून सर्वांनाच त्यांचा अत्यन्त राग आला. ज्यावेळी ते संन्यासी गृहस्थ श्रीक्षेत्र कुरवपूरहून निघून वाटाड्यांच्या आधाराने पैलतीराला जावयाला निघाले तेव्हा तेथील वाटाड्यांनी त्यांच्याकडून दुप्पट पैसे घेऊन आपला राग व्यक्त केला. ते संन्यासी गृहस्थ पैलतीराला पोहोचल्यावर ज्यावेळी ते बैलगाडीतून रायचूरला जावयास निघाले त्यावेळी वाटेतच त्यांची बैलगाडी उलटून त्यांना बरीच दुखापत झाली. या अपघातात त्यांचा दंड मोडला व त्यांचा कमंडलूही फुटून गेला.

अशा प्रकारे बैलगाडीला अपघात झाल्यावर तेथे बरीच मंडळी जमली. त्या लोकांमध्ये ते संन्यासी गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांना अद्वातद्वा बोलताना ऐकलेली व रागावताना पाहिलेली काही मंडळी होती. त्या संन्यासी गृहस्थांना अशा प्रकारे शिक्षा झालेली पाहताच त्यांना एक प्रकारे समाधान वाटले व ते त्यांची निर्भर्त्सना करताना असे म्हणाले की, " आपण संन्यासी असून आपणाला अद्याप क्रोध जिंकता येत नाही, ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. आपण श्रीस्वामीमहाराजांवर रागावला याचा अर्थच आपण श्रीपादश्रीवल्ल-

भांवर रागावला असा होतो. आपण श्रीस्वामीमहाराजांना ओळखले नाही ते साक्षात् श्रीदत्तप्रभूच आहेत. आता आपण त्यांच्यासारख्या महात्म्यांवर व संतपुरुषांवर रागावल्याचे प्रायश्चित्त भोगा म्हणजे झाले!"

ही सर्व कथा वाचली म्हणजे देव व भक्त कसे एकरूप असतात याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. श्रीदेवांनी लोकोद्धाराकरिता जो भक्तदेह धारण करून या भूतलावर अवतार घेतलेला असतो त्या देहाचा त्यांना अभिमान असतो. अशा वेळी भक्त जरी शांत राहिला तरी श्रीदेव शांत राहू शकत नाहीत. त्यामुळे अपराध्याला तत्काळ शासन घडल्याशिवाय राहत नाही. यादृष्टीने "श्रीश्रीसद्‌गुरुसंग" या ग्रंथात श्रीकुलदानंद ब्रह्मचारी यांनी लिहिलेली पुढील गोष्ट मोठी बोधप्रद आहे यात काहीच शंका नाही.

### श्रीदुर्गाचरण बाबूंवर फकिराचा अत्याचार. आत्यंतिक क्षमेमुळे भगवन्ताचा दण्ड :–

आम्हा लोकांचे गुरुबन्धू गेण्डारियाच्या श्रीयुक्त दुर्गाचरण साहा यांच्याबरोबर काही दिवस एकत्रित राहिल्यामुळे काही काही चमत्कारांच्या गोष्टी सांगण्याचे शिकले आहेत. श्री. दुर्गाचरण वेळोवेळी श्रीठाकुरांच्या पुढे निरनिराळ्या गोष्टी सांगून खूप करमणूक करतात. त्या ऐकून आम्ही लोकही खुश होतो आणि खूप हसतो. आम्हा सर्व लोकांना गांजा पिण्याची मनाई आहे. असे असले; तरी फकिरांच्या फेऱ्यामध्ये सापडून श्री. दुर्गाचरण यांनी गांजा ओढण्याचा खास अभ्यास केला आहे. एके दिवशी श्री. श्यामाकान्त पण्डितजी श्री. दुर्गाचरण यांना असे म्हणाले की, "दुर्गाचरण! तुम्ही गांजा

कशा करिता पिता ? " हा प्रश्न ऐकताच ते थोड्याशा गंभीर भावानेच मस्तक हलवीत हलवीत असे म्हणाले की, " तुम्ही लोक (साधनात) साधारणपणे ज्या स्थानात वावरता तेथून थोड्याशा वरच्या स्थानी जाण्याकरिता गांजाचा दम लावावा लागतो. " गांजा प्यायला तरीही श्री. दुर्गाचरण अत्यन्त नम्र आणि निरीच्छ स्वभावाचे गृहस्थ आहेत.

श्रीदुर्गाचरण गेण्डारियाच्या एका प्रभावशाली फकिराला दररोज दोन–चार पैशांचा गांजा देत असतात. एक दोन दिवस झाले, हातात पैसे न राहिल्यावळे श्री. दुर्गाचरण त्या फकिराला ठरलेल्या वेळी गांजा देऊ शकले नाहीत. यामुळे श्री. दुर्गाचरण थोडेसे घाबरून आश्रमात आले आणि सर्व लोकांबरोबर श्रीठाकुरांच्या जवळ गुपचूप बसून राहिले. त्या फकिराला वेळच्या वेळी गांजा न मिळाल्यामुळे तो फकीर श्री. दुर्गाचरण यांना शोधत शोधत तिसऱ्या प्रहरी आश्रमात आला आणि श्रीठाकुरांच्या जवळ श्री. दुर्गाचरण गुपचूप बसले आहेत असे पाहून क्रोधाने लालीलाल झाला. त्यावेळी त्याच्या हातात एक वेत होता. त्या वेताने अत्यन्त निष्ठूरपणे श्री. दुर्गाचरण यांच्या पाठीवर मारता मारता तो फकीर त्यांना असे म्हणू लागला की, " अरे साल्या ! गुरूच्या समोर येऊन बसला काय ! तुला मारल्याने तुझा गुरू आमचे काय वाकडे करणार आहे ? " श्री. दुर्गाचरण यांच्या मनात आले असते; तर त्यांनी अत्यन्त सहजपणे त्या फकिराचे तुकडे तुकडे करून टाकले असते. परन्तु कोणत्याही प्रकारे चंचल न होता, अगदी शान्तपणे मार खात ते श्रीठाकुरांच्या मुखाकडे पाहात पाहात रडू लागले. श्रीठाकुरांनीही त्या फकीराकडे एक–दोन वेळा पाहिले व ते स्थिर बसून राहिले. त्यानन्तर तो फकीरही मोठ्या घमेंडीने व मिजासीने

आपल्या हातातील वेत फिरवीत फिरवीत आश्रमातून बाहेर पडून पश्चिमेच्या बाजूला निघून गेला.

श्रीठाकुरांनी थोड्यावेळपर्यंत शांत राहून नन्तर श्री. दुर्गाचरण यांना असे विचारले की, "दुर्गाचरण! त्या फकीरसाहेबांनी तुम्हाला इतके अनुचितपणे मारले असता तुम्ही इतके गुपचूप बसून सहन कसे करीत राहिलात? तुम्ही काही बोलला का नाहीत?"

हे ऐकताच श्री. दुर्गाचरण असे म्हणाले की, "प्रभो! आपल्या-समोर मी त्याला काय बोलू शकणार! मी तर सर्व भगवन्तावर सोडून दिले होते!"

श्रीठाकूर म्हणाले की, "ओहो! आपण असे करावयाला नको होते. ज्यांच्याजवळ बदला घेण्याचे सामर्थ्य असूनही जे लोक अत्याचार सहन करून सर्व काही बिलकुल भगवन्ताच्या मर्जीवर सोडून देतात ते अत्याचारी माणसाला मारूनच टाकतात. आश्र-माच्या बाहेर पडल्याबरोबर फकीरसाहेब मोठ्या संकटात सापडले आहेत. तुम्ही त्यांच्यासंबंधी माहिती काढली की, तुम्हाला सर्व काही माहीत होईल."

श्रीठाकुरांनी असे सांगताच श्री. दुर्गाचरण यांनी आश्रमाच्या बाहेर जाऊन त्या फकिरासंबंधी माहिती काढली व ते आश्रमात पुन्हा परत येऊन श्रीठाकुरांना असे म्हणाले की, "फकीरसाहेब वेत फिरवीत फिरवीत आश्रमातून बाहेर पडल्यावर लोखंडी पुलापाशी गेले. तेथे त्यांनी एका व्यक्तीला विनाकारण शिव्या दिल्या. तेथे शेजारीच एक पोलीस पहारेकरी होता. ज्यावेळी त्या पोलीसाने त्यांना शिवीगाळ करण्यास प्रतिबंध केला त्यावेळी मागचा पुढचा काही एक विचार न करता आपल्या वेताने त्यांनी त्या पोलिसालाही खूप पिटून काढले. हे पाहताच तेथे आणखी दोनचार पोलीस जमा

झाले. ते सर्व फकीरसाहेबांना पकडून घेऊन गेले. आज तर मी असे ऐकले आहे की, फकीरसाहेब वेडे आहेत असे समजून त्याच दिवशी पोलिसांनी त्यांना वेड्यांच्या इस्पितळात बंद करून टाकले आहे. ज्यावेळी पोलीस त्यांना तुरुंगाधिकारी व डॉक्टर यांच्याकडे घेऊन गेले त्यावेळी फकीरसाहेबांनी त्या दोघांना अत्यंत वाईटसाईट शिव्या दिल्या. या अपराधाबद्दल त्या दिवसापासून प्रत्येक दिवशी सकाळी व सायंकाळी पाच–पाच वेत मिळून दहा वेत त्यांना मारावेत असा हुकूम झाला आहे. आता प्रत्येक दिवशी फकीरसाहेबांना दहा वेत मारले जातात. ही सर्व हकीकत ऐकून श्रीठाकुरांना दुःख झाले आणि फकीरसाहेबांच्या सुटकेचा प्रयत्न करण्यासंबंधी कितीतरी सज्जन व मोठ्या लोकांना त्यांनी गळ घातली. बहुतेक या उच्च पदस्थ लोकांच्या प्रयत्नांमुळेच अत्यन्त लवकरच तुरुंगातून त्या फकीर-साहेबांची सुटका होईल असे वाटते.

जर श्री. दुर्गाचरण यांनी बदला घेऊन वरील फकिराला धडा शिकविला असता तर त्या बिचाऱ्याला अशी शिक्षा भोगावी लागली नसती. अशा प्रकारे तर्क करून मी श्रीठाकुरांना असे विचारले की, “जर कोणी अनुचितपणे अत्याचार केला; तर त्याचा बदला घेतला पाहिजे काय ?”

माझा प्रश्न ऐकून श्रीठाकुरांच्या अंगावर शहारे आले व ते असे म्हणाले की, “राम ! राम !! मनुष्य काय बदला घेऊ शकेल ? अत्याचारी माणसाला नेहमी क्षमा केली पाहिजे. इतकेच नव्हे; तर अत्याचारी मनुष्याच्या कल्याणाचीच आकांक्षा करणे योग्य आहे. हां ! जो अत्याचार करतो त्याच्या भल्यासाठी मनामध्ये सोळा आणे क्षमा आणि शांती ठेवून, वरवर मात्र थोडासा कृत्रिम क्रोध दाखवून दोन-चार शब्दांनी व गोष्टींनी थोडीशी धमकी दिली

पाहिजे. असे केले म्हणजे बदलाही घेतला असे होईल आणि अत्याचारी माणसाला भगवन्ताकडून विषम शिक्षा मिळण्यापासून वाचविले असेही होईल. जर अत्याचारी माणसाला संपूर्णपणे सोडा आणे क्षमा करून श्रीभगवन्ताच्या हातात बिलकुल सोडून दिले तर त्याला फार मोठी शिक्षा सहन करावी लागते. श्रीक्षेत्र गयेमध्ये एकदा पुढीलप्रमाणे एक घटना घडली होती. ज्या दिवसांमध्ये मी आकाशगंगा पहाडावर राहात होतो, त्या दिवसांमध्ये आम्हा लोकांच्या बरोबर काही दिवसपर्यन्त एक श्रीपरमहंस महात्मेही राहात होते.

एकदा श्रीपरमहंसांच्या एका शिष्यांनी एकादशीचे निर्जल व्रत धरून द्वादशीच्या दिवशी प्रातःकाली फल्गुनदीमध्ये जाऊन स्नान केले; परन्तु विष्णुपदांचे दर्शन घ्यावयास त्यांना थोडासा उशीर झाला. ते आपल्या बरोबर नेहमी छोटया गोपालजींना घेऊनच राहात व फिरत असत. द्वादशीचे पारणे करण्याची वेळ निघून चालली आहे असे पाहून ते अत्यन्त आतुर झाले आणि लगबगीने एका हलवायाच्या दुकानात जाऊन त्यांनी त्या दुकानदाराला असे म्हटले की "पारणे करण्याची वेळ निघून चालली आहे. याकरिता जर आपण मला थोडीशी मिठाई दिली तर मी गोपालजींना नैवेद्य दाखवून थोडेसे पाणी पिईन." त्या शिष्यांनी दुकानदाराला अशी प्रार्थना केली; तरी त्याने ती न ऐकल्यासारखीच केली. त्यावेळी त्या साधुशिष्यांनी तीन-चार वेळेला आपल्या मागणीची पुनरावृत्ती केली; परन्तु दुकान-दार ज्यावेळी 'हो' किंवा 'नाही' असे काहीच म्हणेना त्यावेळी तत्काळ दुकानातून एक वत्तासा घेण्याकरिता ज्याक्षणी त्यांनी आपला हात पुढे केला त्याक्षणी दुकानदार आणि त्याचा मुलगा असे दोघेही दुकानातून उडी मारून रस्त्यावर आले आणि त्या

साधूंना अत्यंत जोरजोराने मारू लागले. एकादशीचा निर्जल उपवास केल्यामुळे ते साधू आधीच कमजोर झाले होते आणि अशात त्यांना असा मार खावा लागल्यामुळे ते कोसळून खालीच पडले. त्यावेळी रस्त्यावरून चालणाऱ्या लोकांनी मध्ये पडून त्या साधूंचे संरक्षण करून त्यांना सोडविले. एवढे सगळे घडले; तरी साधू त्या दुकानदाराला चांगले किंवा वाईट असे काहीच बोलले नाहीत. उलट त्यांनी आकाशाकडे पाहिले आणि थोडे हसून हात जोडून ते असे म्हणाले की, "भला जी! दयाळू गुरुजी!! तुमची लीला अगाध आहे." असे म्हणून ते साधू पहाडावर जाण्यासाठी चालू लागले. त्यावेळी त्यांचे श्रीसद्‌गुरू परमहंसजी पहाडावरील एका खडकावर स्थिरपणे बसले होते. परन्तु अकस्मात् ते एकाएकी विलक्षण दचकले आणि खडकावरून उडी मारून खाली आले व गोदावरी नावाच्या रस्त्यावरून जोरजोराने धावू लागले. रस्त्यातच त्यांनी आपल्या शिष्याला पाहिले व ते त्यांना असे म्हणाले की, "काय रे बच्चा! तू हे काय केलेस रे?" त्यावेळी ते साधुशिष्य त्यांना असे म्हणाले की, "गुरुजी! मी तर काहीच केले नाही." हे ऐकताच श्रीपरमहंसजी आपल्या साधुशिष्यांना असे म्हणाले की, "काय म्हणतोस! काही केले नाही? अरे! तू खूप काही करून ठेवले आहेस. तू फार वाईट काम केले आहेस. सर्व काही श्रीरामजींवर सोडून दिलेस! अरेरे! जाऊन पाहा म्हणजे कळेल की, श्रीरामजींनी त्यांची स्थिती काय केली आहे ते!" असे म्हणून आपल्या साधुशिष्यांना बरोबर घेऊन श्रीपरमहंसजी हलवायाच्या दुकानाजवळ गेले. त्यावेळी त्या दोघांना असे दिसून आले की, "हलवायाचा सत्यानाश झाला आहे. साधुशिष्यांना मारझोड केल्यानन्तर ज्यावेळी हलवायाचा मुलगा भट्टीत जाळण्यासाठी

लाकडे काढण्यासाठी लाकडे ठेवलेल्या खोलीत जाऊ लागला त्यावेळी एक काळा साप त्याला चावला. त्याचवेळी हलवाई तूप गरम करीत होता. आपल्या मुलाला साप चावला आहे असे कळताच भट्टीवर ठेवलेली तुपाची कढई तशीच सोडून देऊन त्याने धावत जाऊन आपल्या मुलाला सावरले व ओढत आणून रस्त्यावर निजविले. इकडे भट्टीवर ठेवलेले तूप इतके तापले की, त्यातून जी ज्वाळा निघाली त्यामुळे त्याच्या शेजारी लावलेल्या तट्ट्याला आग लागली. श्रीपरमहंस ज्यावेळी आपल्या साधुशिष्यांना बरोबर घेऊन तेथे पोहोचले त्यावेळी हलवायाचा मुलगा रस्त्यावर मृतवत् होऊन पडला आहे, घराला आग लागली आहे आणि रस्त्यावर सर्वलोक जमा होऊन हाय हाय करीत आहेत असे त्यांच्या दृष्टीस पडले. एकंदर सर्वच भानगड मोठी आपत्तिजनक होती यात काहीच शंका नाही. हे सर्व पाहून श्रीपरमहंसजी आपल्या साधुशिष्यांना बरोबर घेऊन पहाडावर परत आले आणि त्यांना शिव्या देत असे म्हणू लागले की, "जर आपला काही अपराध नसताना कोणी आपल्यावर अत्याचार करू लागला आणि आपल्याला राग आला नाही; तर कमीत कमी अत्याचारी माणसाला एक अर्धी शिवी दिली पाहिजे. अशा प्रकारे मनुष्याने थोडा जरी बदला घेतला तरी अत्याचारी माणसाचे रक्षण होते. जर श्रीरामजींवर सर्व भार सोडून दिला तर श्रीरामजी अत्यन्त कठोर अशी शिक्षा देतात. भगवन्ताची शिक्षा मोठी विषम असते हे लक्षात घेतले पाहिजे."

श्री. गणपतराव परांजपे या नावाचे इचलकरंजीला राहणारे एक ब्राह्मण गृहस्थ श्रीक्षेत्र कुरवपूर येथे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले होते. तेथे आल्यावर श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासात त्यांचे मन अगदी रमून गेले. अशा प्रकारे सत्संगात त्यांचे दिवस

आनंदात चालले असताना श्री. गणपतराव यांना एकाएकी अतिसाराचा विकार सुरू झाला. या विकारामुळे त्यांना मृत्यू येईल असेच सर्वांना वाटले. त्यांच्या आजाराची हकीकत श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर गेल्यावर त्यांना असे वाटले की, " श्री. गणपतराव यांचे जर येथे देहावसान झाले तर अनेक समस्या निर्माण होतील व त्या समस्यांना सर्वांनाच तोंड द्यावे लागेल. श्री. गणपतराव ब्रह्मचारी होते व त्यांचे समावर्तन झालेले नव्हते. समावर्तन न झालेल्यांचे अन्त्यसंस्कार तरी कसे करणार? ब्रह्मचाऱ्याचा अग्निसंस्कार करणे झाल्यास तत्पूर्वी प्रायःश्चित्तपूर्वक अर्कविवाह करावा लागेल. तो विधी जाणणारा ब्राह्मण येथे मिळणे शक्य नाही अशा ब्राह्मणाचा अग्निसंस्कारच काय पण शास्त्रदृष्टया त्याचा मृतदेह जलामध्ये सोडणे किंवा भूमीमध्ये पुरणे हेही शक्य नव्हते."

अशा प्रकारे श्री. गणपतराव परांजपे यांच्यासंबंधी नानाविध विचार मनात आल्यामुळे शेवटी हा प्रश्न श्रीदेवांपुढे नेणे हाच एकमेक उपाय आहे असे ठरवून श्रीस्वामीमहाराजांनी देवांची अशी प्रार्थना केली की, " प्रभो ! श्री. गणपतराव ब्रह्मचारी अवस्थेत मृत झाले तरी काळजी नाही; परन्तु ते गेल्यावर त्यांचा पुढील संस्कार येथे कसा करावा हे श्रीदेवांनीच दाखवून द्यावे. हे येथे शक्य नसल्याने श्री. गणपतराव बरे होऊन आपल्या घरी सुखरूप पोहचतील अशी कृपा करावी." श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदेवांची प्रार्थना केल्यावर एक दोन दिवसातच श्री. गणपतराव यांना आराम वाटू लागला व ते यथासमय आपल्या घरी परत गेले. ते घरी गेल्यावर पुन्हा आजारी पडले व तेथेच त्यांचा देहान्त झाला.

श्रीक्षेत्र कुरवपूर येथील चातुर्मासाच्या काळात एके दिवशी रायचूर येथील श्री. लक्ष्मणराव वैद्य हे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शना-

साठी आले. त्यांना मुले होऊन ती जगत नसल्यामुळे ज्या लोकांनी श्रीस्वामीमहाराजांच्या अंगच्या अद्‌भुत सामर्थ्याचा अनुभव घेतला होता व ज्यांनी हे सामर्थ्य प्रत्यक्ष पाहिले होते त्यांनी श्री. लक्ष्मण-रावांना श्रीक्षेत्र कुरवपूर येथे जाऊन श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेऊन आपली सर्व व्यथा त्यांच्या कानी घालण्यास सांगितले.

अशा प्रकारे लोकांनी आग्रह केल्यामुळे श्री. लक्ष्मणराव वैद्य हे आपल्या ती. मातुश्रीस व सौ. पत्नीस घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र कुरवपूर येथे गेले. तेथे गेल्यावर सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतले व ते त्यांच्या जवळ बसले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी श्री. लक्ष्मणराव वैद्य यांना असे विचारले की, "आपण कशाकरिता आला ?" हा प्रश्न ऐकताच आपण कशा-करिता आलो यासंबंधी काहीच खरे न सांगता ते असे म्हणाले की, "उगीच दर्शनासाठी आलो."

श्रीस्वामीमहाराजांना आपल्या समोर बसलेल्या व्यक्तीचे भूत, भविष्य व वर्तमानादि सर्व स्पष्ट दिसत असल्यामुळे आणि त्यांच्या-पासून काहीच लपून राहत नसल्यामुळे ते श्री. लक्ष्मणराव यांनी दिलेले उत्तर ऐकताच त्यांना असे म्हणाले की, "आपण दुसऱ्यांच्या आग्रहाने आपली व्यथा सांगण्याकरिता येथे आले असताना उगीचच आलो असे का म्हणता ?"

श्रीस्वामीमहाराजांनी श्री.लक्ष्मणराव यांना असा प्रश्न विचारताच त्यांची आई पुढे आली व ती त्यांना असे म्हणाली की, "महाराज ! याचे लग्न होऊन बरीच वर्षे झाली. याला संतती होते; पण ती जगत नाही. तरी महाराजांनी कृपा करून याची संतती जगेल असा काहीतरी उपाय सांगावा, अशी आपल्या चरणी नम्र प्रार्थना आहे."

श्री. लक्ष्मणराव यांच्या आईने अशी प्रार्थना करताच श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, "तुमच्या कुळात चालत आलेला नागपूजेचा आचार बंद पडला आहे. त्यामुळे तुमच्या मुलाला संतती होऊनही ती जगत नाही. तो कुळाचार तुम्ही पुन्हा सुरू करा म्हणजे संतती होऊन ती जगेलही. तुमच्या कुलाचाराप्रमाणे श्रावण महिन्यात वारुळाची पूजा करून शेवटच्या दिवशी सोन्याचा नाग करून दान करा. पाच पंचम्यांना वारुळाची पूजा करा."

श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्री. लक्ष्मणरावांनी श्रावण महिनाभर पूजा केली. शेवटच्या दिवशी एक जिवन्त नाग वारुळातून बाहेर आला. त्याला पाहताच श्री. लक्ष्मणराव भिऊन मागे परतणार इतक्यात वारुळाच्या शेजारील झाडीतून एक भिल्ल तेथे आला व त्याने "भिऊ नका" असे म्हणून त्यांना धीर दिला. त्यानन्तर श्री. लक्ष्मणराव यांनी व त्या भिल्लाने मिळून त्या नागास दूध पाजताच तो नाग व तो भिल्ल असे दोघेही गुप्त झाले. त्यानन्तर श्री. लक्ष्मणराव वैद्य यांनी श्रीस्वामीमहाराजांनी सांगित-ल्याप्रमाणे पाच पंचम्यांना वारुळाची पूजा केल्यावर व संपूर्ण व्रताची समाप्ती झाल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांच्या स्वप्नात आले व त्यांनी त्यांना असा आशीर्वाद दिला की, "तुम्हाला दीर्घायुषी पुत्र होईल." त्यानन्तर श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्या-प्रमाणे श्री. लक्ष्मणराव वैद्य यांना मुलगा झाला. मुलगा जन्माला आल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्या मुलाच्या आईच्या व सुईणीच्या स्वप्नात जाऊन असे सांगितले की, "या मुलाला दीर्घायुष्य प्राप्त होईल." त्यानन्तर श्रीस्वामीमहाराजांनी षष्ठीदेवीस अशी आज्ञा केली की, "मुलाच्या मस्तकावर षष्ठीपूजेच्या दिवशी चांगले लिही म्हणजे मुलाचा भविष्यकाल उज्ज्वल होईल." पुढे श्री.

लक्ष्मणराव वैद्य यांनी त्या मुलाचे नाव "वासुदेव" असे ठेवले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे ज्याच्यावर आपण कृपा केली त्याची अन्ततोगत्वा जबाबदारी वाहण्याचे काम श्रीस्वामीमहाराज किती निष्ठेने व प्रेमाने करीत असत, याची जाणीव झाल्याशिवाय राहत नाही. या दृष्टीने सरळपणाने नमस्कार घालून आपल्या व्यथा साधूच्या कानावर घालून संपूर्ण शरणागती पत्करल्यावर साधू शरणागताचे शेवटपर्यंन्त रक्षण कसे करतो हे तात्त्विकदृष्टया कथन करताना श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराज यांनी "दासबोध" या ग्रंथात असे म्हटले आहे की–

आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ।
सर्वदेव नमस्कारः केशवं प्रतिगच्छति ॥ ४.६.११ ॥
याकारणें सर्व देवांसी । नमस्करावें अत्यादरेंसी ।
अधिष्ठान मानितां देवासी । परम सौख्य वाटे ॥ १२ ॥
देव देवांचीं अधिष्ठानें । सत्पात्र सद्‌गुरूंचीं स्थानें ।
या कारणें नमस्कार करणें । उभयमार्गीं ॥ १३ ॥
नमस्कारें लीनता घडे । नमस्कारें विकल्प मोडे ।
नमस्कारें सख्य घडे । नाना सत्पात्रांसी ॥ १४ ॥
नमस्कारें दोष जाती । नमस्कारें अन्याय क्षमिती ।
नमस्कारें मोडली जडती । समाधानें ॥ १५ ॥
सीसापरता नाही दंड । ऐसें बोलती उदंड ।
याकारणें अखंड । देवभक्त वंदावे ॥ १६ ॥
नमस्कारें कृपा उचंबळे । नमस्कारें प्रसन्नता प्रबळे ।
नमस्कारें गुरुदेव वोळे । साधकावरी ॥ १७ ॥
विशेष करितां नमस्कार । नासती दोषांचे गिरिवर ।
आणि मुख्य परमेश्वर । कृपा करी ॥ १८ ॥

नमस्कारें पतित पावन । नमस्कारें संतासि शरण ।
नमस्कारें जन्ममरण । दूरी दूरावे ॥ १९ ॥
परम अन्याय करून आला । आणि साष्टांग नमस्कार घातला ।
तरी तो अन्याय क्षमा केला । पाहिजे श्रेष्ठीं ॥ २० ॥
या कारणें नमस्कारापरतें । आणिक नाहीं अनुसरतें ।
नमस्कारें प्राणियातें । सद्‌बुद्धि लागे ॥ २१ ॥
नमस्कारासि वेचावें नलगे । नमस्कारासि कष्टावें नलगे ।
नमस्कारासि कांहींच नलगे । उपकरण सामुग्री ॥ २२ ॥
नमस्काराऐसें नाहीं सोपें । नमस्कार करावा अनन्यरूपें ।
नाना साधनीं साक्षेपें । कासया शिणावें ॥ २३ ॥
साधक भावें नमस्कार घाली । त्याची चिंता साधूस लागली ।
सुगम पंथें नेऊन घाली । जेथील तेथें ॥ २४ ॥

श्रीक्षेत्र कुरवपूर येथे श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास चालू झाल्यानंतर अन्तरा अन्तराने तीन वेळा कावळ्याने त्यांच्या मस्तकावर चंचुप्रहार केला. त्यामुळे तिसऱ्यांदा चंचुप्रहार झाल्यावर या गोष्टीसंबंधी श्रीगांडामहाराजांना व तेथे जमलेल्या भक्तमंडळींना सांगताना श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, " ज्या माणसाच्या मस्तकावर अशा प्रकारे कावळा चंचुप्रहार करतो त्याचे आयुष्य सहा महिन्यांपेक्षा अधिक नसते. तरी यापुढे या देहावर आता कोणीहि प्रेम करू नये." श्रीस्वामीमहाराजांनी जरी असे सर्वांना सांगितले तरी श्रीदेवांना श्रीस्वामीमहाराजांच्या देहाच्या द्वारा अजूनही कित्येक लीला करून अनेकानेक लोकांचा उद्धार करावयाचा असल्यामुळे त्यांच्या देहाची काळजी घेऊन तो टिकविणे अत्यावश्यक होते. त्यामुळे श्रीदत्तप्रभूंनी श्रीस्वामीमहाराजांना असे सांगितले की, " आपल्या मस्तकावर कावळ्याने तीनदा चंचुप्रहार केल्यामुळे जे

अरिष्ट कोसळणार आहे ते दूर व्हावे म्हणून आपण त्या अरिष्टाच्या शान्त्यर्थ वेनगंगा–गोदावरी नद्यांच्या संगमावर स्नान करावे." श्रीस्वामीमहाराजांनी कालौघात श्रीदेवांच्या सांगण्याप्रमाणे स्नान केल्यामुळे त्यांच्यावरील अरिष्ट टळले.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे आपल्याला श्रीस्वामीमहाराजांनी "श्रीदत्तमाहात्म्य" या ग्रंथात लिहिलेल्या ओव्यांचे स्मरण झाल्याशिवाय राहत नाही. ते तेथे असे म्हणतात की –

**मस्तकीं स्पर्शे गीधडा। कावळा किंवा कवडा।**
**किंवा काळा पक्षी चवडा। मारी मुंडावरी ज्याच्या ॥३६.२६॥**
**किंवा मांसभक्षक। पक्षी मस्तकीं स्पर्शी एक।**
**सहा मास अवधिक। आयुष्यलेख तयाचा ॥ २७ ॥**
**वस्त्र नेसोनी जरी। कावळा मस्तकावरी।**
**चोंच किंवा पाद मारी। पांच मासांतरीं मरेल नर ॥ २८ ॥**

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांचा श्रीक्षेत्र कुरवपूर येथील चातुर्मासाचा काळ जवळ जवळ संपत आला. आषाढ पौर्णिमा ते भाद्रपद पौर्णिमा हा साठ दिवसांचा काळ संपावयास किती वेळ लागणार? श्रीस्वामीमहाराज जेथे जेथे जात असत तेथील अनेकानेक माणसे अल्प परिचयानन्तर व त्यांच्या अपार सामर्थ्याच्या प्रचीती नंतर त्यांची भक्त मंडळी बनून त्यांच्यावर भक्तिप्रेमाचा वर्षाव करीत असत. श्रीक्षेत्र कुरवपूरलासुद्धा दूरदूरची माणसे येत राहिल्याने श्रीस्वामीमहाराज येथे असेपर्यन्त दररोज जणू काही यात्राच भरत असे. वास्तविक पाहता श्रीक्षेत्र कुरवपूर येथे जाण्यासाठी प्रवासाच्या विपुल साधनांचा अभाव होता. अशा स्थितीत श्रीकृष्णानदीच्या किनाऱ्यावर आल्यावर खुद्द बेटात जावयाचे म्हटले तरी बाजेची नाव किंवा त्या सारख्या अनिश्चित साधनांचा वाप:

करावा लागे. या सर्व अडचणींमुळे बेटावर जीवनोपयोगी वस्तूंची वाण असणे ही अगदी साहजिक व स्वाभाविक गोष्ट होती. या बेटावर सगळीकडे दाट जंगल पसरलेले असल्यामुळे व जिकडे नजर फिरवावी तिकडे पाणीच पाणी दिसत असल्यामुळे येथे मोठी नीरव शांतता पसरलेली असे. एवढे असूनही दररोज अनेक अनेक लोक लांबलांबच्या गावाहून येथे येत असत व श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेऊन कृतार्थ होत असत.

श्रीक्षेत्र कुरवपूरच्या या चातुर्मासाच्या काळात सर्वसाधारणपणे दररोज दोन अडीचशे माणसे येथे मुक्कामाला असत. श्रीदेवांपुढे व श्रीस्वामीमहाराजांपुढे पुष्कळ द्रव्य व प्रसादाच्या वस्तू जमत असत. त्याचप्रमाणे नित्य ब्राह्मण समाराधनाही होत असे. त्यामुळे मोठ्यापासून लहानापर्यन्त व ब्राह्मणापासून अन्त्यजापर्यन्त सर्वांना दररोज आकंठ भोजन मिळत असे. या काळात येथे आलेल्या मंडळींनी श्रीपादश्रीवल्लभांच्या पुष्कळ महापूजा केल्या. त्यामुळे येथील पुजाऱ्यांनाही भरपूर प्राप्ती झाली. यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी आपला मुक्काम येथून हलवून दुसरीकडे जाऊ नये असे सर्वांना वाटू लागले व त्याप्रमाणे सर्वांनीच त्यांना तसा आग्रह केला. सर्व लोकांच्या या आग्रहामुळे आपण श्रीगुरुद्वादशीपर्यन्त येथे राहून मगच येथून जाऊ असे श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांना सांगितले.

श्रीस्वामीमहाराजांच्या चातुर्मास समाप्तीच्या दिवशी त्यांची वाजत गाजत मिरवणूक काढावी अशी सर्व मंडळींची इच्छा होती; परन्तु अशा प्रकारे कोणताच समारोह करणे व शोभायात्रा काढणे श्रीस्वामीमहाराजांना पसन्त नव्हते. त्यामुळे भाद्रपद पौर्णिमेच्या दिवशी सकाळी श्रीस्वामीमहाराजांनी क्षौरविधी आटोपला व दुपारी एका माणसाला बरोबर घेऊन ते नदीच्या पात्रातून चालत जाऊन

पलीकडील एका कोरडया जागेवर बसले. तेथे त्यांनी त्यांच्या नेह-मीच्या प्रथेप्रमाणे श्रीमद्भगवद्गीतेचा विश्वरूपदर्शनाचा अकरावा अध्याय म्हटला. अशा प्रकारे सीमोल्लंघनाचा विधी अत्यन्त साधे-पणाने उरकून श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र कुरवपूर येथे परत आले.

अशा प्रकारे चातुर्मास समाप्तीनंतर एक-दीड महिना अधिक राहिल्यानन्तर आश्विन वद्य त्रयोदशीला श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र कुरवपूर येथून निघाले. त्यावेळी तेथील सर्व भक्त मंडळींनी त्यांना भरल्या नेत्रांनी व रुद्ध कंठाने निरोप दिला. आपल्यावरील सर्व भक्त मंडळींचे प्रेम पाहून श्रीस्वामीमहाराजांनी त्या सर्वांना आशीर्वाद दिला व ते त्यांना असे म्हणाले की, “ आचारः प्रभवो धर्मः । ” या न्यायाने सर्वांनी आपला आचारधर्म पाळण्याचा कसोशीने प्रयत्न करून प्रभूंची अनन्यभावाने सेवा करावी. यातच सर्वांचे कल्याण आहे. ” अशा रीतीने उपदेश करून श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र कुरवपूरहून पुढील प्रवासासाठी वाटचाल सुरू केली. त्यावेळी त्यांच्या बरोबर श्रीगांडामहाराजही होते. श्रीस्वामीमहाराजांना निरोप द्यावयाला म्हणून बरीच मंडळी सोबत निघाली; परन्तु आपल्या बरोबर आलेल्या या सर्व भक्त मंडळींना अखेर परत फिरण्यास सांगून ते पुढे निघाले.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र कुरवपूर येथून निघून प्रथम श्रीकृष्णा-नदीच्या तीरातीराने श्रीक्षेत्र परळी वैजनाथकडे जाण्यास निघाले. यावेळी प्रथम मलप्रभासंगमी जावे असा त्यांचा विचार होता. त्यांचा हा विचार ओळखून श्रीदेवांनी त्यांना अशी आज्ञा केली की, “ यापुढे श्रीकृष्णानदीच्या तीराने प्रवास न करता श्रीगोदावरीनदीच्या तीराने प्रवास करावा. ” श्रीदेवांच्या आज्ञेप्रमाणे श्रीस्वामीमहा-राजांनी श्रीकृष्णानदीच्या तीरावरून चाललेला आपला प्रवास

सोडून दिला व त्यांनी श्रीगोदावरीनदीच्या तीराने प्रवास सुरू करण्याचे ठरविले. अशा रीतीने श्रीगोदावरीनदीच्या तीरावर येताना श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र तुळजापूर येथे आले. तेथे त्यांनी श्रीजगदंबेचे दर्शन घेऊन तिची पुढीलप्रमाणे स्तुती केली.

## ॥ तुलजापुरवासिनीस्तोत्रम् ॥

नमोऽस्तु ते महादेवि शिवे कल्याणि शांभवि ॥
प्रसीद वेदविनुते जगदम्ब नमोऽस्तु ते ॥ १ ॥
जगतामादिभूता त्वं जगत्वं जगदाश्रया ॥
एकाऽप्यनेकरूपासि जगदम्ब नमोऽस्तु ते ॥ २ ॥
सृष्टिस्थितिविनाशानां हेतुभूते मुनिस्तुते ।
प्रसीद देवविनुते जगदम्ब नमोऽस्तुते ॥ ३ ॥
सर्वेश्वरि नमस्तुभ्यं सर्वसौभाग्यदायिनि ॥
सर्वशक्तियुतेऽनन्ते जगदम्ब नमोऽस्तुते ॥ ४ ॥
विविधारिष्टशमनि त्रिविधोत्पातनाशिनि ॥
प्रसीद देवि ललिते जगदम्ब नमोऽस्तु ते ॥ ५ ॥
प्रसीद करुणासिन्धो त्वत्तः कारुणिका परा ।
यतो नास्ति महादेवि जगदम्ब नमोऽस्तु ते ॥ ६ ॥
शत्रून्जहि जयं देहि सर्वान्कामांश्च देहि मे ॥
भयं नाशय रोगांश्च जगदम्ब नमोऽस्तु ते ॥ ७ ॥
जगदम्ब नमोऽस्तु ते हिते जय शम्भोर्दयिते महामते ॥
कुलदेवि नमोऽस्तु ते सदा हृदि मे तिष्ठ यतोऽसि सर्वदा ॥८॥
तुलजापुरवासिन्या देव्याः स्तोत्रमिदं परम् ॥
यः प्रठेत्प्रयतो भक्त्या सर्वान्कामान्स आप्नुयात् ॥ ९ ॥

॥ इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंद-सरस्वतीविरचितं श्रीतुलजापुरवासिन्यादेव्याः स्तोत्रं संम्पूर्णम् ॥

अशा प्रकारे श्रीजगदंबेची स्तुती करून श्रीस्वामीमहाराज श्रीवांजरानदीच्या तीरावर येऊन त्यांनी श्रीदत्तजयंती साजरी केली. त्यानन्तर श्रीगोदावरीनदीच्या तीरावर येऊन त्यांनी श्रीदेवांच्या आज्ञेप्रमाणे पुढे प्रवास सुरू केला. त्यांचा हा प्रवास चाललेला असताना ज्या ज्या ठिकाणी ते जात होते तेथे तेथे भक्तमंडळी त्यांच्या स्वागतासाठी व दर्शनासाठी अगोदरपासूनच येऊन राहिलेली असत. आता श्रीस्वामीमहाराजांना व्यक्तिगत असे जीवन जवळ जवळ काही राहिलेच नव्हते, असे म्हटले तर त्यात यत्किंचितही अतिशयोक्ती नव्हती; कारण त्यांचा परिचय नाही असा गावच आता राहिला नव्हता. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी दररोज अपार गर्दी होत असली; तरी ते आपली दैनंदिन आचारादि सर्व व्यवहार अत्यन्त व्यवस्थितपणे पार पाडीत होते; कारण त्यांच्या आचारादि कोणत्याही गोष्टींमध्ये एवढासाही कमीपणा, त्रुटी, चालढकल किंवा उपेक्षा, वेळेअभावी अगर अन्य कोणत्याही कारणाने झालेली श्रीदेवांना खपत नसे.

अशा तऱ्हेने श्रीस्वामीमहाराजांचा प्रवास श्रीगोदावरीनदीच्या किनाऱ्या किनाऱ्याने चाललेला असताना ते श्रीक्षेत्र आंबेजोगाई येथे आले. त्यावेळी तेथे श्रीदासोपन्तांचा उत्सव चालू होता. श्रीदासोपन्तांच्या वंशातील एक ब्राह्मण श्री. बापूजी गोसावी हे आपल्या घरचा उत्सव टाकून श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेले; पण त्यांना त्यांचे दर्शन झाले नाही. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन न झाल्यामुळे ते निराश होऊन घरी परत येत असताना वाटेत अकस्मात् कोणीतरी त्यांच्या थोबाडीत मारली. अशा प्रकारे थोबाडीत बसल्याने श्री. बापूजी गोसावी अत्यन्त आश्चर्यचकित

झाले. त्यांनी चमकून आजूबाजूला पाहिले; परन्तु त्यांना कोणीच दिसले नाही. एवढ्यात त्यांच्या कानावर असे शब्द आले की, "दासोपन्त आणि आम्ही भिन्न आहोत असे तुला वाटते काय? आज दासोपन्तांचा उत्सव सोडून तू आमच्या दर्शनाला आलासच कसा? आमचे दर्शन तुला होणार तरी कसे?" ही अशरीरी वाणी ऐकून श्री. बापूजी गोसावी यांना अद्वैतबोधाची अपूर्व जाणीव झाली. ते मोठे अधिकारी पुरुष होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना आकाशवाणीच्या द्वारा उपदेश करून कृतार्थ केले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे आपले उपास्य दैवतच श्रेष्ठ असून त्याच्या ठिकाणीच इतर सर्व देवतांचा निवास आहे अशी दृष्टी, श्रद्धा व भक्ती उत्पन्न झाल्याशिवाय साधक सिद्धावस्थेप्रत जाऊ शकत नाही, हे नितांत सत्य आहे, याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. किंबहुना इतर कोणत्याही देवतेचे दर्शन घेताना त्या देवतेच्या ठिकाणी आपल्या देवतेचेच दर्शन होणे आणि अणुरेणुतृण-काष्ठात सर्वत्र आपली देवताच विराजमान झाली असल्याची अखंड प्रचीती येणे ही महासिद्धावस्था असून, या अवस्थेप्रत साध-कांनी जावे अशीच श्रीस्वामीमहाराजांची अपेक्षा होती, यात काहीच शंका नाही. श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराज ज्यावेळी पंढर-पूरला श्रीविठ्ठलाच्या दर्शनाला गेले त्यावेळी त्यांना ॐ षड्गुणसंपन्न, ऐश्वर्यसंपन्न व भाग्यवन्त अशा रुक्मिणीवर रमाकान्त श्रीविठ्ठलाचे दर्शन न होता सीताकान्त श्रीरामाचेच दर्शन कसे झाले, याचे जे अपूर्व वर्णन त्यांनी केले आहे, त्यावरून ते उपरोक्त सिद्धान्ताप्रमाणे आपल्या देवतेशी एकरूप कसे झाले होते व त्यांना सर्वत्र आपल्या इष्ट देवतेचेच दर्शन कसे होत होते, याची प्रचीती येऊन सिद्धावस्था म्हणजे काय व श्रीस्वामीमहाराजांना काय अपेक्षित आहे, हे लक्षात

येऊन आपणास कोणत्या ध्येयाप्रत व लक्ष्याप्रत पोहोचावयाचे आहे, याचे मार्गदर्शन झाल्याशिवाय राहात नाही. श्रीसमर्थ रामदासस्वामी-महाराजांच्या मुखातून ही अपूर्व स्थिती पुढील अभंगातून उत्कटपणे व्यक्त झाली आहे –

## ॥ श्रीविठ्ठलरूप राम ॥

येथें कां रे उभा श्रीरामा। मनमोहन मेघश्यामा ॥ १ ॥
काय केलें धनुष्यबाण। कर कटावरि ठेवून ॥ २ ॥
काय केलीं सीतामाई। येथें राही रखुमाबाई ॥ ३ ॥
काय केलें वानरदळ। येथें मिळविलें गोपाळ ॥ ४ ॥
काय केली अयोध्यापुरी। येथें वसविली पंढरी ॥ ५ ॥
काय केली शरयू गंगा। येथें आणिली चन्द्रभागा ॥ ६ ॥
रामदासी जैसा भाव। तैसा झाला पंढरीराव ॥ ७ ॥

  

श्रीक्षेत्र आंबेजोगाईहून निघून श्रीस्वामीमहाराज पुढे श्रीवेनगंगा व श्रीगोदावरीनदीच्या संगमावर गेले; कारण श्रीक्षेत्र कुरवपूर येथे त्यांच्या मस्तकावर तीन वेळा कावळ्याने चंचुप्रहार केल्यामुळ त्याच्या दोषनाशार्थ श्रीदेवांनी या संगमात स्नान करण्याची त्यांना आज्ञा केली होती. या आज्ञेप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी या संगमावर त्रिरात्र मुक्काम केला व तेथे त्यांनी तीन दिवस त्रिकाळ स्नान केले.

यानन्तर श्रीस्वामीमहाराज लिंबमार्गे श्रीक्षेत्र परळी वैजनाथाच्या दर्शनाला गेले. त्या श्रीक्षेत्री त्यांनी पाच दिवस मुक्काम केला. या मुक्कामात श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेने त्यांचे एकान्तिक भक्त व श्रीमन्त नागरिक श्री. नानासाहेब देशपांडे यांनी

श्रीमहारुद्रस्वाहाकार केला. यावेळी भरलेली प्रचंड यात्रा पाहून तेथील सर्व लोक असे म्हणू लागले की, " हे शंकराचे स्थान असले तरी महाशिवरात्रीच्या दिवशीही अशी यात्रा कधी भरत नाही."

हा स्वाहाकार चालू असताना श्री. नानासाहेब देशपांडे, लिंबकर यांचे उपाध्याय श्री. प्रल्हादराव ब्रह्मापूरकर यांची १२।१३ वर्षांची कन्या एक दिवस मरणोन्मुख होऊन पडली. त्यावेळी घरातील सर्व मंडळींनी त्या मुलीला उचलून श्रीस्वामीमहाराजांसमोर नेल्यावर त्यांनी तिला तीर्थ व अंगारा देऊन तिच्या हातात बांधावयाला एक ताईत दिला. त्यामुळे त्या मुलीची प्रकृती सुधारू लागली व पुढे तिची प्रकृती उत्तम झाली. कालौघात श्रीगांडा-महाराजांच्या चरित्राची माहिती संकलन करणारे श्री. नारायणराव नंदुरबारकर यांच्याशी या मुलीचा विवाह झाला. अशा रीतीने श्रीमहारुद्रस्वाहाकाराच्या निमित्ताने श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम श्रीक्षेत्र परळी वैजनाथ येथे असताना श्रीसीतारामहाराज राजूर येथून मुद्दाम त्यांच्या दर्शनासाठी तेथे आले.

श्रीस्वामीमहाराज ! आपण अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक राजा-धिराज श्रीसद्गुरुनाथ महाराज आहात ! आपण निखिल भूमंडला-तील सर्वश्रेष्ठ असे परमहंस परिव्राजकाचार्य आहात ! आपण साक्षात् पूर्ण ब्रह्म असून आपल्या रूपाने जणूकाही अमृताची मूर्तीच साकार झाली आहे. आपण आमच्या हृदयस्थ श्रीसद्गुरुनाथ महा-राजांचे सद्गुरू आहात ! आपला अखण्ड जयजयकार असो !

श्रीस्वामीमहाराज ! ! आपण भक्त्याचार्य आहात; कारण "लोकांच्या निन्दास्तुतीच्या निरर्गल प्रवादांना न भिणारे व त्यांच्या वल्गनेबाबतीत निर्भय असणारे सनत्कुमार, व्यास, शुक, शाण्डिल्य, गर्ग, विष्णू, कौण्डिण्य, शेष, उद्धव, आरुणी, बली, हनुमान, बिभी-

षणादि भक्तिमार्गातील श्रेष्ठ अशा भक्त्याचार्यांनी एकमताने भक्ती हीच श्रेष्ठ आहे, ॥ ८३ ॥," असे म्हणून देवर्षी श्रीनारदांनी भक्ति-सूत्रात जे सांगितले आहे, त्याचाच आपण सर्व आयुष्यभर लोकांना उपदेश केला व तेच आपण आपल्या सर्व ग्रंथात प्रतिपादन केले आहे. आपण आपल्या अपरंपार अशा कृपेच्या सामर्थ्याने म्हणजेच शक्तिपाताच्या लोकोत्तर प्रक्रियेने शक्तिसंक्रमण करून "नारदस्तु तदर्पिताखिलाचारिता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ॥ देवर्षी श्रीनारद विरचित भक्तिसूत्रे ॥ १९ ॥" म्हणजे देवर्षी श्रीनारदांच्या मताप्रमाणे आपली सर्व कर्मे श्रीभगवन्ताला अर्पण करणे अर्थात् श्रीगुरुकृपेद्वारा जागृत झालेल्या प्राणयुक्त कुंडलिनी शक्तीला सुषुम्नाप्रविष्ट करून ती शिवाशी एकरूप होईल असे पाहणे आणि श्रीभगवन्ताचे क्षणभर जरी यत्किंचित्‌ही विस्मरण झाले तरी परम-व्याकुळ होणे अर्थात् प्राणशक्ती कुण्डलिनी मूलाधारात राहून बहि-र्मुखाने संसारोन्मुख झाल्यामुळे ती स्थूलरूप होऊन सुषुम्नाप्रविष्ट होत नसल्यामुळे जीव कासावीस होणे, हीच खरी भक्ती होय. अशा प्रकारची दिव्य पराभक्ती शिष्य-साधकांच्या ठिकाणी उत्पन्न करून त्यांना अमृतस्वरूप, सिद्ध, कृतकृत्य, अमर व तृप्त करीत असल्या-मुळे आपण करुणासागर, दीनवत्सल व कृपासिन्धू आहात !

श्रीस्वामीमहाराज ! ! ! आपण श्रीपादश्रीवल्लभश्रीमन्नृसिंहसर-स्वतीश्रीदत्तात्रेयस्वरूप असून कलियुगात जन्मलेल्या आमच्या-सारख्या जडजीवांचा उद्धार करण्याकरिताच "योगिराज" या नावाने या भूतलावर अवतार धारण करून आमच्या श्रीसद्गुरु-नाथमहाराजांच्या रूपाने आम्हाला सिद्धयोगान्तर्गत शक्तिपात-योगाची दीक्षा देऊन आमच्या प्राणशक्ती कुण्डलिनीचे सुषुम्नेत चालन करून दिव्य अशी पराभक्ती उपस्थित करून आमची

अनादि माया, वासना, मल, विक्षेप व आवरणादि दोष, घृणा, लज्जा, भय, शोक, निंदा, कुल, शील व जाती हे अष्टपाश आणि जरा, मरण, काम, क्रोध, लोभ, मोह, अंधकार व अविद्या हे अष्टबंध दूर करण्याकरिता भक्ति-साधनरत करून अपरंपार कृपा केलेली असल्यामुळे या साधनश्रेष्ठतेचा, श्रीसद्‌गुरूंचा व त्यांच्या कृपेचा अपरंपार महिमा वर्णन करताना श्रीएकनाथस्वामीमहाराजांनी "श्रीएकनाथी भागवतात" त्यांचे समर्थ सद्‌गुरू श्रीजनार्दनस्वामीमहाराजांची जी स्तुती व प्रार्थना केली आहे तीच प्रार्थना आपल्या चरणी प्रस्तुत करून आम्हाला स्वानंदरूप व ब्रह्मरूप करण्याची प्रार्थना करीत आहोत.

श्रीगणेशाय नमः ।।
ॐ नमो श्रीगुरुदयार्णव । तुझे कृपेसी नाहीं थांव ।
कृपेनें तारिसी जीव । जीवभाव सांडवूनी ।। २९.१ ।।
सांडवूनी देहबुद्धी । निरसोनि जीवोपाधी ।
भक्त तारिसी भवाब्धीं । कृपानिधि कृपाळुवा ।। २ ।।
तुझें पाहता कृपाळूपण । जीवासी जीवें मारिसी पूर्ण ।
नामा रूपा घालिसी शून्य । जातिगोत संपूर्ण निर्दळिसी ।।३।।
निर्दळूनि आपपरां । निसंतान करिसी संसारा ।
तो तूं जिवलग सोयरा । कपाळु खरा घडे केवीं ।। ४ ।।
जेवीं आंधारीं नांदते दृष्टी । भासती नक्षत्रें खद्योतकोटी ।
ते आंधारेंसीं सूर्य घोंटी । तेवीं तुझी भेटी साधकां ।। ५ ।।
तुझी जेथ साचार भेटी । तुवां केलिया कृपादृष्टी ।
संसारभेदाची त्रिपुटी । त्रिगुणेंसीं सृष्टी दिसेना ।। ६ ।।
न दाखवूनि गुणादि सृष्टी । दाविसी अद्वय ब्रह्म दृष्टी ।
त्यासी कदा नव्हे दृष्टी भेटी । भेटीसी तुटी कदा न पडे ।।७।।

जो कदा न देखिजे दृष्टी। त्यासी केवीं होय भेटी।
भेटीसी कदा न पडे तुटी। हेही गोष्टी घडे केवीं ॥ ८ ॥
जैसा गर्भ मातेच्या पोटीं। असोनि माउली न देखे दृष्टीं।
तरी तिचें भेटींसी नव्हें तुटी। तेवीं तुझे पोटीं साधक ॥ ९ ॥
माता कळवळोनि पाळी तान्हें। शेखीं माउलीतें तें नेणे।
तेवीं तुजमाजीं अज्ञानें। तुवां प्रतिपाळणें निजलोभें ॥ १० ॥
जन्मल्या बाळाकारणें। माता वाढवी शहाणपणें।
तेवीं तुझेनि निजज्ञानें। सज्ञान होणें साधकीं ॥ ११ ॥
साधकीं लाहता तुझें ज्ञान। थितें नाठवे मीतूंपण।
जीव विसरला जीवपण। अद्वयें पूर्ण परमात्मा ॥ १२ ॥
असोत या बहुता गोष्टी। नव्हतां सद्‌गुरुकृपादृष्टी।
करितां उपायांच्या कोटी। नव्हे भेटी परमार्था ॥ १३ ॥
जाहलिया गुरुकृपा प्राप्त। उपनिषदांचा मथितार्थ।
साधकांचा चढे हात। कृपा समर्थ श्रीगुरूची ॥ १४ ॥

श्रीस्वामीमहाराज ! अशा प्रकारे आपल्या अपार कृपाबलाने आम्ही आपल्या चरित्ररूपी सत्संगतीत राहून या सत्संगानेच निज-पदप्राप्ती करून घ्यावी अशी आमची इच्छा आहे. खरोखर आमची ही इच्छा आपल्या चरित्रगंगेत सतत स्नान केल्यानेच पूर्ण होणारी आहे; कारण " संतसंग भाग्यें लाधला। संतसंग कैचा अभाग्याला। जयांसी संतसंग जोडला। ते संतचि होती स्वयें ॥ १९.१ ॥ जे जे संगतीसी लागावें। ते ते गुण लागती स्वभावें। प्रयत्नेंसी न लगे जावें। आदरें करुनी ॥ २ ॥ प्राणी असती जये संगतीं। तैसेचि गुण आंगीं बाणती। पाहणेंही न लगे प्रकट दिसती। जयाचे तयासारिखे ॥३॥ " या श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी " एकवीस समासी " या प्रकरण ग्रंथात सांगितलेल्या न्यायाने आमची अनादि माया

निरसून जावी म्हणून आपल्या सत्संगात राहणे हेच एकमात्र साधन आम्हाला करता येणे शक्य आहे व तेच आमच्या पात्रतेच्या दृष्टीने योग्य आहे; कारण या दृष्टीनेच श्रीएकनाथस्वामीमहाराज यांनी श्रीएकनाथी भागवतात असे म्हटले आहे की–

योग याग व्रत दान । वेदाध्ययन व्याख्यान ।
तप तीर्थ ज्ञान ध्यान । संन्यासग्रहण सादरें ॥ १२.११९ ॥
इत्यादि नाना साधनें । निष्ठा करितां निर्बंधनें ।
माझी प्राप्ती दुरासतेनें । जीवेंप्राणें न पविजे ॥ १२० ॥
यापरी शिणतां साधनेंसीं । माझी प्राप्ति नव्हे अतिप्रयासीं ।
ते गोपी पावल्या अप्रयासी । सत्संगासीं लाहोनी ॥ १२१ ॥
त्या गोपीकांसीं माझी प्रीती । मीचि त्यांची सत्संगती ॥
सत्संगें निजपदप्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १२२ ॥

श्रीस्वामीमहाराज ! असा हा आपल्या सत्संगाचा महिमा आहे. आमची अनादि माया निरसून जावी व आम्ही ब्रह्मरूप व्हावे म्हणून महर्षी श्रीव्यासांनी श्रीमद् भागवत महापुराणात भगवान् श्रीकृष्णांनी भक्त उद्धवाला जो सत्संगाचा महिमा कथन केला आहे तो आपलाच महिमा असल्याची पूर्ण प्रचीती आमच्या अन्तःकरणात बाणल्यामुळे त्याचेच गायन करून व तद्द्वारा आपल्याला सन्तुष्ट करून आम्ही सर्वजण आपल्या परमपवित्र व परमकोमलचरणी कृपाशीर्वादाची प्रार्थना करीत आहोत.

हे प्रिय उद्धवा ! जगतातील सर्व ऐहिक विषयांवरील आसक्ती दूर करण्यास साधुसमागमासारखे दुसरे साधन नाही. साधकाने साधुसमागम केला असता त्यास जसा मी वश होतो, तसा आसन-प्राणायामादि अष्टांग योग, तत्त्वविचार, अहिंसादिक धर्म, वेदाभ्यास कृच्छ्रचांद्रायणादि तप, संन्यास, अग्निहोत्रादि इष्ट, वापीकूपादि पूर्त,

उपवासादिक व्रते, देवतार्चन, जपजाप्य, तीर्थयात्रा, यमनियम इत्यादि कोणत्याही उपायांनी होत नाही; कारण यातील कोणत्याही उपायांमध्ये मला वश करण्याचे सामर्थ्य असत नाही ॥ ११.१२–१,२ ॥

हे निष्पाप उद्धवा ! सत्संगाचा हा महिमा एका युगातील नसून तो सर्व चारही युगातील असा महिमा आहे. केवळ सत्संगानेच दैत्य, राक्षस, मृग, पक्षी, गंधर्व, अप्सरा, नाग, सिद्ध, चारण, गुह्यक, विद्याधर इत्यादि सर्वांना माझी प्राप्ती झाली आहे त्याचप्रमाणे मनुष्यांमध्ये वैश्य, शूद्र, स्त्रिया व अंत्यज हे सर्व राजस व तामस प्रकृतीचे असूनही निरनिराळ्या युगात मला येऊन मिळाले आहेत. वृत्रासुर, प्रल्हाद, वृषपर्वा, बली, बाणासुर. मयासुर, बिभीषण, सुग्रीव, हनुमान, जाम्बवन्त, गजेन्द्र. जटायू, तुलाधर, व्याध, कुब्जा, व्रजातील गोपी, ऋषिपत्न्या आणि दुसऱ्या कितीतरी लोकांनी केवळ सत्संगाच्या प्रभावानेच माझी प्राप्ती केली. ॥ ३–६ ॥

हे प्रिय उद्धवा ! यांपैकी कोणीही चतुर्वेदाचे अध्ययन केले नव्हते आणि महात्म्यांची विधिपूर्वक उपासनाही केली नव्हती. त्याचप्रमाणे त्यांनी व्रतवैकल्ये आचरिली नव्हती किंवा तपश्चर्याही केली नव्हती. मात्र या सर्वांनी केवळ सत्समागमाच्या म्हणजे माझ्या सत्संगाच्या प्रभावानेच महत्तमपदाची अर्थात् माझी प्राप्ती करून घेतली ! ॥ ७ ॥

हे प्रिय उद्धवा ! वृत्रासुरादि कित्येकांना दुसऱ्या साधनांचा संभव तरी होता; परन्तु गोपी, गायी, यमलार्जुन आदि वृक्ष, व्रजातील हरिणे इत्यादि पशू, कालिया इत्यादि नाग वगैरे अनधिकारी प्राण्यांना दुसरे काहीच साधन नव्हते; कारण हे सर्वजण साधन–साध्याच्या सम्बन्धी पूर्णपणे मूढबुद्धी–अजाण होते. गोपींनी जो

काही सहवास केला, तो फक्त माझाच केला व त्या माझ्यावर प्रेम करूनच उद्धरून गेल्या. इतकेच नव्हे; तर आत्ता सांगितलेल्या सर्वांप्रमाणे आणखीही कित्येक भक्त असे होऊन गेले आहेत की, ज्यांनी केवळ प्रेमपूर्ण भक्तिभावाच्या द्वाराच अनायासाने माझी प्राप्ती करून घेऊन ते कृतकृत्य झाले. ॥ ८ ॥

हे प्रिय उद्धवा! मोठमोठे प्रयत्नशील साधक योग, सांख्य, दान, व्रत, तपस्या, यज्ञ, श्रुतींची व्याख्या, स्वाध्याय आणि संन्यास इत्यादि कोणत्याच साधनाच्या द्वारा मला प्राप्त करू शकत नाहीत; मात्र सत्संगाच्या द्वारा मी प्राप्त होणे हे अत्यन्त सुलभ असते, यात तिल:प्राय शंका नाही. ॥ ९ ॥

हे प्रिय उद्धवा! गोपींचे माझ्यावर जे काही विलक्षण प्रेम होते, त्याचे मला वर्णनही करता येत नाही. अक्रूराने ज्यावेळी बलरामाला व मला गोकुळातून मथुरेला नेले त्यावेळी माझ्याबद्दलच्या अनिवार व गाढ प्रेमाने गोपींचे हृदय इतके रंगून गेले होते की, त्यामुळे त्यांना जसे दुःख झाले, तसे आजवर दुसऱ्या कोणासही झाले नसेल. त्यांचे चित्त माझ्या ठिकाणी इतके अनुरक्त झाले होते की, माझ्या वियोगाच्या तीव्र व्याधीमुळे त्या विलक्षण व्याकुळ झाल्या होत्या आणि माझ्या व्यतिरिक्त अन्य कोणताही विषय त्यांना आवडेनासा झाला होता. ॥ १० ॥

हे प्रिय उद्धवा! तुला हे माहितीच आहे की, गोपींचा मीच एकमात्र प्रियतम आहे! ज्यावेळी मी वृन्दावनात होतो त्यावेळी त्यांनी बहुतेक सर्व रात्री–त्या रासाच्या रात्री माझ्या बरोबर अर्ध्या क्षणाप्रमाणे व्यतीत केल्या होत्या; परन्तु हे प्रिय उद्धवा! माझ्याशिवाय त्याच रात्री त्या सर्व गोपींना एक एक कल्पाप्रमाणे दीर्घ झाल्या आहेत. ॥ ११ ॥

हे प्रिय उद्धवा ! ज्याप्रमाणे मोठमोठे ब्रह्मनिष्ठ ऋषी व मुनी समाधीत मग्न झाल्यावर आणि गंगा इत्यादि मोठमोठ्या नद्या समुद्रात मिसळून गेल्यावर त्यांचे नाम अथवा रूप यांपैकी काहीही अवशिष्ट राहत नाही त्याप्रमाणे त्या गोपिका आपल्या परम प्रेमाच्या द्वारा माझ्याशी इतक्या तन्मय झाल्या होत्या की, त्यांना लोक, परलोक, शरीर आणि पति-पुत्रादिक आपले नातेवाईक यांचीही शुद्ध-बुद्ध राहिली नव्हती. ।। १२ ।।

हे प्रिय उद्धवा ! त्या गोपिकांमधील बहुतेक गोपी अशा होत्या की, त्यांना माझे यथार्थ व वास्तविक स्वरूप माहीत नव्हते व त्या ते जाणतही नव्हत्या. मी साक्षात् भगवान् आहे असे न जाणता मी केवळ त्यांचा प्रियकर आहे असेच त्या समजत होत्या आणि जारभावानेच माझ्याशी सहवास करण्याची त्यांची इच्छा व आकांक्षा असून त्याप्रमाणेच त्या माझा सत्संग करीत असत. अशा त्या साधनहीन असलेल्या शेकडो, हजारो गोपिका केवळ सत्संगाच्या प्रभावानेच माझ्या परब्रह्मपदी मिळून गेल्या. ।। १३ ।।

हे प्रिय उद्धवा ! या करिता श्रुती, स्मृती, विधी, निषेध, प्रवृत्ती, निवृत्ती, धर्म, अधर्म, आजवर मिळालेले व पुढे मिळवावयाचे शास्त्रज्ञान आणि ऐकण्यास योग्य व ऐकलेले विषय या सर्व गोष्टी सोडून देऊन सर्वत्र मी परमात्माच ओतप्रोत भरलेला आहे, अशी भावना करीत सर्व प्राणिमात्राचे आत्मस्वरूपच असलेल्या सर्वान्त-र्साक्षी परमात्म्याला म्हणजे मला शरण ये म्हणजे तुला कसलीही भीती राहणार नाही. ।। १४–१५ ।।

श्रीस्वामीमहाराज ! आपल्या अगणित उत्तम लीलांनी व गुणांनी परिप्लुत असलेल्या आपल्या चरित्रकथामृताचे वारंवार प्राशन करून आम्ही उन्मन होऊन या अनेक प्रकारच्या दुःखांनी भरलेल्या

संसारसागराच्या पैलतीराला जावे म्हणून आपण आपले परमभक्त व पूर्वाश्रमातील धाकटे बन्धू श्रीसीताराममहाराज यांनी स्वतः म्हटल्याप्रमाणे "मना ध्यायिं गुरुवासुदेवासि चित्तीं। याहुनी अन्य तुज किमपि नाहीं ।। हेंचि साधन तुला मुक्तिचें सांगुनी। दास सीताराम हा मुक्त होई ।।" या न्यायाने आम्हालाही आमच्या चित्तात आपल्या ध्यानाचे साधन लाभून सायुज्यता मुक्ती प्राप्त करून द्यावी अशी आपल्या चरणी आपल्याच परमभक्ताच्या शब्दांनी प्रार्थना करून आपले दुसरे परमभक्त श्री. प. प. श्रीमन्नृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज यांच्या शब्दात श्रीसद्गुरुरूपाचे प्रातःस्मरणयुक्त ध्यान, नमन व भजन करून आपल्या पररूपात स्थिर राहण्याचा प्रयन करीत आहोत.

## ॥ पद ॥

मना ध्यायिं गुरुवासुदेवासि चित्तीं। याहुनी अन्य तुज किमपि नाहीं।धृ।
गर्व हा सोडुनी। शरण जा गुरुपदीं। नित्य हें तपचि तूं आचरावें ।।
वासुदेवा मुखें, मार्ग हा पाहुनी। सतत नाम स्मरत डुलत राही ।।
॥ मना० ॥ १ ॥

कामक्रोधादि षड्वैरी तुज गांजती। म्हणूनि तूं गुरुचरणीं लीन होई ।।
श्रवण मननादि हें कर्म तूं करुनियां। दुःखरूपी भवापार होई ।।
॥ मना० ॥ २ ॥

साधुसंगति धरूनि। इंद्रियें वळवुनी। स्वात्मरूपामृता पिउनि राही ।।
हेंचि साधन तुला मुक्तिचें सांगुनी। दास सीताराम हा मुक्त होई ।।
॥ मना० ॥ ३ ॥

## ॥ प्रातःस्मरणयुक्त ध्यान ॥

उत्तिष्ठोत्तिष्ठ देवेश उत्तिष्ठ गरुडध्वज ।
उत्तिष्ठ कमलाकान्त त्रैलोक्यं मंगलं कुरु ॥ १ ॥
ब्राह्मे मुहूर्ते चोत्थाय चिन्तयेदात्मनो हितम् ।
स्मरणं वासुदेवस्य कुर्यात् कलिमलापहम् ॥ २ ॥
सुप्तः प्रबोधितो विष्णो हृषीकेशेन यत्त्वया ।
यद्यत्कारयसे कर्म तत्करोमि तवाज्ञया ॥ ३ ॥
जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः ।
जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः ॥
केनापि देवेन हृदि स्थितेन ।
यथा नियुक्तोस्मि तथा करोमि ॥ ४ ॥
समुद्रवसने देवि पर्वतस्तनमण्डले ।
विष्णुपत्नी नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ॥ ५ ॥

## ॥ श्रीसद्गुरुवन्दन ॥

नमः श्रीवासुदेवाय यतये सर्वसाक्षिणे ।
मोहध्वान्तविनाशाय सच्चिदानन्दरूपिणे ॥ १ ॥
श्रीवासुदेवं मनुजावतारम् ।
सुरासुरैर्वन्दितपादपद्मम् ॥
नित्यं विभुं सर्वगतं ह्यनन्तम् ।
वन्दे यतीन्द्रं वरदं त्र्यधीश्वरम् ॥ २ ॥

## ॥ भजन ॥

अनसूयात्मज त्रैमूर्ते । गंधर्वस्थित यतिपते ॥ १ ॥

श्रीपादश्रीवल्लभ योगिपते । जय श्रीनरसिंहसरस्वते ॥ २ ॥
रेवातीरस्थित सद्गते । श्रीमद्वासुदेवयते ॥ ३ ॥

## – अध्याय चोविसावा –

॥ पद ॥

(चाल–दत्ता मजला प्रसन्न होशी० ॥)

वासुदेवयतिराया पायां पडतों मी सखया ॥
न मनीं इच्छीं त्वद्भजनाविण, परिसे बा सदया ॥ ध्रु० ॥
तव पदकमळीं मन हें माझें रंगुनियां जावें ॥
विषयविलासीं निरास होउनि, प्रेमें तव गुण गावे ॥
वासुदेवयतिराया पायां पडतों मी सखया ॥ १ ॥
बुद्धींद्रियगणचालक भासक, असशी तूं देवा ॥
तरि मच्चिता त्वत्पदसक्ता, दे भजनामृतमेवा ॥
वासुदेवयतिराया पायां पडतों मी सखया ॥ २ ॥
घडो निरंतर संतसमागम, वदनीं राहो नाम ॥
त्वत्पदकमळीं सीतारामा, सदैव दे विश्राम ॥
वासुदेवयतिराया पायां पडतों मी सखया ॥ ३ ॥
॥ श्रीदत्तगुरु ! ! श्रीमद्वासुदेव ! ! ॥

॥ प्रार्थना ॥ (अभंग)

गुरुराया हेंची दान । द्यावें नित्य तव स्मरण ॥ १ ॥
गावे गुण आवडीनें । मागें हेंचि मी प्रेमानें ॥ २ ॥
भोग मोक्ष नको देवा । साधुसंग दे बरवा ॥ ३ ॥
मातृगर्भीं सीतारामा । घालिं सुखें पुरुषोत्तमा ॥ ४ ॥

॥ अभंग ॥

गुरुवासुदेवा परिसा विज्ञापना। दासाची करुणा येऊं द्यावी ॥ १ ॥
तारियेले भक्त न कळे तुझा अंत। काय मी पतित कीर्ति वानू ॥२॥
जगाच्या कल्याणासाठीं अवतार। घेऊनियां सार उतरीशी ॥ ३ ॥
तुमची ब्रीदावली पतितपावन। हें श्रुतिवचन सत्य करी ॥ ४ ॥
पतिताकरवीं वेद बोलविला। शुष्क काष्ठ केला सजीव तो ॥ ५ ॥
साध्वी सुभगेचा पति मृत होतां। वांचविशी दत्ता भिक्षुरूपें ॥ ६ ॥
तो तूं भिक्षुरूप घेऊनियां येशी। सीतारामापाशीं वास तुझा ॥ ७ ॥

**राजूरचा संहितास्वाहाकार--शके १८३३-इ. स. १९११:-**

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र परळी वैजनाथ येथे आहेत असे कळल्यावर श्रीसीताराममहाराज त्यांच्या दर्शनासाठी तेथे गेले व ते त्यांना असे म्हणाले की, "प्रभो! राजूरला संहितास्वाहाकार करण्याची माझी तीव्र इच्छा आहे. तरी माझी ही इच्छा आपण स्वत: या यज्ञाला उपस्थित राहून पूर्ण करावी व हा यज्ञ माझ्याकडून उत्तम रीतीने व निर्विघ्नपणे पार पाडून घ्यावा अशी आपल्या चरणी शरणागतीपूर्वक नम्र प्रार्थना आहे."

श्रीसीताराममहाराजांनी केलेली ही प्रार्थना ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "एवढा मोठा यज्ञ करण्यासाठी तुझ्याजवळ भरपूर पैसा आहे का?" हा प्रश्न ऐकताच श्रीसीताराममहाराज असे म्हणाले की, "प्रभो! यज्ञाला पुरेल एवढे काही पैसे नाहीत; परन्तु आपल्या कृपेने व उपस्थितीने ते पुरे होतील असा विश्वास आहे." श्रीसीताराममहाराजांची ही निष्ठा पाहताच श्रीस्वामीमहाराज एकदा प्रसन्नपणे हसले व त्यांना असे म्हणाले की, "बरे तर करा! काही हरकत नाही. आम्ही अवश्य येऊ. काळजी करू नये." श्रीस्वामीमहाराजांनी असे आश्वासन देताच श्रीसीता-

राममहाराजांना परमानंद झाला. श्रीस्वामीमहाराजांनी राजूरला यज्ञाला येण्याचे मान्य करताच त्यांचे परमश्रेष्ठभक्त व आपले गुरुबन्धू श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज यांनाही या यज्ञाला बोलावून घ्यावे या विचाराने श्रीसीताराममहाराज यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी पुन्हा दुसरी अशी प्रार्थना केली की, " या यज्ञासाठी श्रीक्षेत्र नरसोबावाडीहून श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराजही या यज्ञप्रसंगी उपस्थित राहावेत अशी माझी इच्छा आहे; तरी आपण त्यांना इकडे बोलावून घेण्याची परवानगी द्यावी." श्रीसीताराममहाराजांनी अशी प्रार्थना केली; तरी श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराजांना राजूरला बोलावून घेण्यासाठी संमती दिली नाही. त्यानन्तर श्रीसीताराममहाराजांनी जेव्हा त्यांना यासंबंधी पुन्हा आग्रहाची विनंती केली तेव्हा श्रीस्वामीमहाराज काही एक न बोलता स्वस्थ राहिले. हे पाहून " मौनं सम्मति लक्षणम् ।," या न्यायाने श्रीस्वामीमहाराजांचे मौन म्हणजे आपण विचारलेल्या प्रश्नाला मौनाने सम्मतीदर्शक दिलेले उत्तर होय, असे मानून श्रीसीताराममहाराज राजूरला परत आले.

वास्तविक पाहता श्रीस्वामीमहाराजांनी मागेच श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराजांना अशी आज्ञा केली होती की, " तुम्ही वाडी क्षेत्रातच निरन्तर राहा. वाडीकर बाळगोपाळांवर दृष्टी ठेवा व श्रीदत्ताच्या उत्सवमूर्तीची पूजा, शयनारती इत्यादि सर्व नियमाने करा. तेच आम्ही आहोत. त्यांची जी सेवा तीच आमची सेवा आहे. आम्ही त्या सेवेने संतुष्ट होऊ." श्रीस्वामीमहाराजांच्या या आज्ञेप्रमाणे श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीतच क्षेत्रसंन्यासी होऊन राहिले

होते अर्थात् त्यांनी कधीही व कोणत्याही कारणावाचून श्रीक्षेत्र नरसोबावाडी सोडू नये अशीच श्रीस्वामीमहाराजांची इच्छा होती.

अशी वास्तविक स्थिती असली व ही गोष्ट श्रीसीताराममहाराजांनाही माहीत असली; तरी त्यांनी श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांना पत्र लिहिले व राजूर मुक्कामी संहितास्वाहाकाराच्या समारंभासाठी मुद्दाम बोलावून घेतले. श्रीसीतारामहाराजांचे यज्ञासाठी बोलाविणे आले आणि श्रीस्वामीमहाराजही तेथे येणार आहेत हे कळल्यावर, "श्रीसीतारामहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांना विचारूनच आपणास पत्र पाठवून बोलाविणे केले असणार व या निमित्ताने आपणास श्रीगुरुचरणांचे दर्शन होईल," या विचाराने श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज राजूरला गेले. तेथे गेल्यावर आपल्या प्रेमास्पदाचे दर्शन घेण्यासाठी गेल्यावर त्यांनी साष्टांग नमस्कार घातला. त्यावेळी "श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराजांना श्रीक्षेत्र नरसोबावाडी सोडून कधीही कोठे जाऊ नये असे सांगितले असताना ते येथे आलेच कसे?'', असा विचार मनात येऊन श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना जरा रागानेच असे विचारले की, "स्वामी! तुम्ही सुद्धा आलात का? तुम्ही वाडी का सोडली?" हा प्रश्न ऐकताच श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज अगदी गडबडून गेले. या प्रश्नाला काय उत्तर द्यावे हेच त्यांना सुचेना! इतक्यात बाजूला उभे असलेल्या श्रीसीतारामहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांना असे सांगितले की, "प्रभो! मी स्वामींना इकडे बोलाविण्याकरिता श्रीक्षेत्र परळी वैजनाथ येथे आपली परवानगी विचारली होती; परन्तु आपण त्यावेळी मौन राहिल्यामुळे आपले मौन हीच आपली संमती आहे

असे समजून मीच त्यांना " श्रीस्वामीमहाराजांनी यज्ञासाठी आपल्याला बोलाविले आहे," अशा आशयाचे पत्र लिहिले होते. त्यांच्यावरील आत्यंतिक प्रेमामुळे व ते या यज्ञाला उपस्थित राहून त्यांना आपल्या दर्शनाचा लाभ व सर्वांना त्यांच्या दर्शनप्रेमाचा लाभ व्हावा म्हणून मी त्यांना पत्र टाकून बोलावून घेतले. तरी ही सर्व माझीच चूक आहे. आपण त्याबद्दल मला क्षमा करावी व श्रीस्वामींवर रागवू नये." ही सर्व खरी हकीकत कळताच श्रीस्वामी-महाराजांचा राग शांत झाला.

श्रीक्षेत्र परळी वैजनाथ येथून श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन आणि आज्ञा घेऊन आल्यावर श्रीसीतारामहाराजांनी आपला संहितास्वाहाकार करण्याचा संकल्प राजुरातील आपल्या भक्तवर्गापुढे प्रकट केला. श्रीसीतारामहाराजांचा संहितास्वाहाकारयज्ञ करण्याचा संकल्प ऐकून व यज्ञाला श्रीस्वामीमहाराज स्वतः उपस्थित राहणार हे ऐकून सर्व भक्तमंडळींना अत्यन्त आनंद झाला. कोणताही उत्सव, समारंभ किंवा यज्ञ यशस्वीपणे पार पाडण्यात श्रीसातारामहाराजांचा हातखंडा होता. उत्सवाच्या भव्यतेमुळे ते कधीही डगमगले नाहीत. ज्यावेळी श्रीसीतारामहाराज चातुर्मासात श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर असत त्यावेळी ते तेथे दर्शनाला येणाऱ्या शेकडोशे लोकांच्या राहण्याची व जेवणाची व्यवस्था पाहात असत. बहुतेक स्वाहाकारासारखी जी मोठी कार्ये होत असत तो सर्व श्रीसीतारामहाराजांच्या देखरेखीखालीच होत असत.

त्यावेळी राजूर हे गाव हैद्राबादच्या निजामांच्या अमलाखाली येत असे. आपल्या राज्यात आलेला सत्पुरुष कोणत्याही धर्माचा असला; तरी त्याची योग्य सेवा आपल्याकडून घडून येऊन चांगली निगा राखली जावी म्हणून निजामांनी परभणीच्या तालुकदारांना

कळविले होते. हे तालुकदार मुसलमान होते. त्यांनी निजामांच्या आज्ञेप्रमाणे श्रीसीतारामहाराज यांना पत्र पाठवून असे विचारले की, "आमच्या राज्यात श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराजांसारखे महान् सत्पुरुष आले आहेत. तरी त्यांच्या सेवेसाठी काय साहाय्य लागेल ते कळवावे म्हणजे आम्ही ते जरूर करू." हे पत्र मिळताच श्रीसीतारामहाराजांनी तालुकदारांना असे कळविले की, "श्रीसद्गुरुकृपेने येथे आपल्या राज्यात काहीच कमी नाही; तेव्हा मुद्दाम काही साहाय्य पाठविण्याचे कारण नाही. आम्हास काही साहाय्य लागल्यास आपणास अवश्य कळवू. आपल्या प्रेमाबद्दल व सहकार्यबुद्धिबद्दल हार्दिक धन्यवाद! असाच कृपालोभ असू द्यावा ही विनंती." श्रीसीतारामहाराजांचा श्रीस्वामीमहाराजांच्या सामर्थ्यावर अपार भरवसा असल्यामुळेच त्यांनी असे पत्र लिहिले. जरी श्रीसीतारामहाराजांचे असे पत्र आले तरी त्या मुसलमान तालुकदारांनी चार दिवस आपली कचेरी बंद करून यज्ञाच्या जागेपासून दूर अन्तरावर आपला तंबू ठोकला व ते यज्ञासाठी येणाऱ्या-जाणाऱ्या लोकांची व्यवस्था जातीने पाहू लागले. हे अधिकारी स्वभावाने विशेष कडक होते, असा लोकांचा अनुभव असल्यामुळे त्यांच्यातील हा फरक पाहून लोकांची अशी खात्री पटली की, श्रीस्वामीस्वामीमहाराजांनीच त्यांच्या स्वभावामध्ये परिवर्तन घडवून आणले. यावेळी सर्वांना श्रीगुरुचरित्रातील श्रीपादश्रीवल्लभ अवतारातील रजकाची व पुढील श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज अवतारातील यवनराजाची आठवण झाली. या तालुकदारांचे चिरंजीव वाईट संगतीमुळे बिघडले होते. यज्ञ समाप्त झाल्यावर तालुकदारांनी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाची इच्छा व्यक्त केली. श्रीस्वामीमहाराजांनी संमती दिल्यावर ते आपल्या मुलाला घेऊन

दर्शनाला आले. त्यावेळी दोघांनाही श्रीफळ देऊन श्रीस्वामीमहा-राजांनी त्यांचा गौरव केला. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने त्यांचा मुलगा पुढे सुधारला व तो नीट वागू लागला.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीसंतांची दृष्टी ही धर्माधर्म-विवर्जित व उंचनीच विवर्जित अशी सम कशी असते आणि त्यांची पूर्वजन्माच्या पुण्याईने अचानक भेट झाली तर भवदुःख कसे दूर होते, हे उत्तम प्रकारे ध्यानात येते. या दृष्टीने श्रीसंत ज्ञानेश्वर-महाराज यांचा पुढील अभंग अभ्यसनीय असा आहे. ते असे म्हणतात की –

पूर्वजन्मीं सुकृतें थोर केलीं। तीं मज आजि फळासी आलीं ॥ १ ॥
परमानन्दु आजि मानसीं। भेटी जाली या संतासी ॥ २ ॥
मायबाप बंधु सखे सोयरे। यांतें भेटावया मन न धरे ॥ ३ ॥
एक एका तीर्थाहूनि आगळें। तयामाजीं परब्रह्म सांवळें ॥ ४ ॥
निर्धनासी धनलाभु जाला। जैसा अचेतनीं प्राणु प्रगटला ॥ ५ ॥
वत्स विघडलियां धेनु भेटली। जैसी कुरंगिणी पाडस मीनली ॥ ६ ॥
हें पियूषापरतें गोड वाटत। पंढरीरायाचे भक्त भेटत ॥ ७ ॥
बापरखुमादेविवरें विठ्ठलें। संत भेटतां भवदुःख फिटलें ॥ ८ ॥

राजूर येथील संहितास्वाहाकाराच्या यज्ञाला श्रीस्वामीमहाराज स्वतः उपस्थित राहणार असल्याचे कळल्यामुळे या गावातील सर्वच लोकांनी व विशेषतः भक्तमंडळींनी यज्ञाच्या तयारीला अत्यन्त उत्साहाने प्रारंभ केला. श्रीसीतारामममहाराजांच्या व त्यांच्या भक्त मंडळींच्या आनंदाला तर सीमाच राहिली नव्हती. गावातील सर्व भक्त मंडळींनी श्रीसीतारामममहाराजांच्या मठाजवळील पटांगणा-तच हजारो लोकांना बसावयाला पुरेल एवढा भव्य मंडप घातला. हा मंडप केळी, ऊस व तोरणे यांनी सजविलेला होता व त्याच्या

मध्य भागी स्वाहाकाराचे यज्ञकुंड घालून त्याच्या बाजूला तीन चार मोठमोठ्या खोल्या तयार करून ठेवल्या होत्या. बैठका व स्वयंपाकासाठी लागणारी मोठमोठी भांडी जमा करण्यात आली होती. त्याचप्रमाणे तांदूळ, रवा, साखर, तूप, मसाला इत्यादि नानाविध वस्तूंची पोतीच्या पोती भरून सामान तयार ठेवले होते. दररोज लागणारा भाजीपाला, तूप, दूध इत्यादींचा भरपूर पुरवठा होईल अशी व्यवस्था करण्यात आली होती. भोजन प्रसाद वाढताना कोणत्याही प्रकारची अडचण पडू नये म्हणून आचारी पन्नास, मीठ वाढणारे पन्नास, भात वाढणारे पाचशे, तूप वाढणारे तीनशे, त्याच मानाने आवांतर जिन्नस वाढणारी आणखी काही मंडळी अशी एक हजार माणसे पगारी आणली होती. आजुबाजूच्या एकेका गावच्या लोकांना एकेक काम नेमून दिले होते. सर्व भक्तसेवकगणांना सर्वत्र दक्षता ठेवण्याची आज्ञा दिली होती.

श्रीसीतारामहाराजांनी या संहितास्वाहाकार यज्ञासाठी त्या काळातील प्रख्यात वैदिक ब्राह्मणांना आमंत्रणे दिली होती. त्यांना दक्षिणा देण्यासाठी रुपयांची पोती भरून ती एका ओट्यावर रांग लावून ठेवली होती. त्याचप्रमाणे ब्राह्मणांना, सुवासिनींना आणि यज्ञासाठी येणाऱ्या थोर सन्माननीय व्यक्तींना देण्यासाठी उत्तमोत्तम अशी उंची वस्त्रे आणवून ठेवली होती. याशिवाय आणखी जी जी सामुग्री पाहिजे होती ती ती सर्व सिद्ध झाल्यानंतर श्रीस्वामीमहाराजांना, श्रीजगद्गुरू शंकराचार्य आणि गुरुबन्धू श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांना बोलावून आणण्याकरिता पत्रे व माणसे पाठवून त्यांना आदरभावाने यज्ञाकरिता आणविले.

यज्ञवेदीजवळ बांधलेल्या मधल्या खोलीत श्रीथोरल्यास्वामीमहाराजांची व्यवस्था करण्यात आली होती. त्या खोलीच्या दोन्ही बाजूच्या दोन्ही खोल्यांपैकी एका खोलीत हंपी विरूपाक्ष मठाचे

श्रीशंकराचार्य आणि दुसऱ्या खोलीत श्रीनृसिंहसरस्वती दीक्षित-स्वामीमहाराज यांची सोय करण्यात आली होती. आधीच ठरलेल्या मुहूर्तावर श्रीसीतारामहाराजांनी स्वतः श्रीस्वामीमहाराजांची पूजा केली आणि श्रीमद् जगद्गुरू शंकराचार्य, श्रीनृसिंहसरस्वतीस्वामी-महाराज, यज्ञासाठी जमलेल्या सर्व ऋत्विज आणि इतरही सर्व थोर थोर पुरुषांना नमस्कार करून त्या सर्वांचे आशीर्वाद घेतले. त्यानन्तर श्रीसीतारामहाराजांनी यज्ञदीक्षा घेऊन हातात यज्ञ-कंकण बांधून संहितास्वाहाकारास सुरुवात केली. त्या यज्ञात दश-ग्रंथी विद्वान् ब्राह्मणांनी ऋग्वेदी संहितामंत्र अत्यन्त स्पष्टपणे व उच्चस्वराने म्हटले. हे या यज्ञाचे सर्वात् मोठं वैभव होते. या यज्ञात यज्ञकुंडात टाकलेल्या आहुती स्वाहा करण्यासाठी अग्निनारायण हजार जिभा पसरून नाचत होता. अग्निशिखा आकाशापर्यन्त जाऊन देवांचा हविर्भाग त्यांना पोहोचवीत होत्या. दररोज दुपार-पर्यन्त हवन होत असे. त्यानन्तर अन्नपूर्णेची पूजा करून नन्तर श्रीसीतारामहाराज जगद्गुरू श्रीशंकराचार्य, श्रीस्वामीमहाराज व श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज या तिघा संन्याशांना भिक्षा वाढीत असत. त्यावेळी या तिघांच्या रूपाने त्रिमुखी श्रीदत्तात्रेयां-नाच आपण भिक्षा वाढीत आहोत, असे त्यांना वाटत असे.

ज्यावेळी श्रीस्वामीमहाराज भिक्षेला बसत असत त्यावेळी टाकळीचे सत्पुरुष श्रीदाजीमहाराजही बसत असत व इतर पंधरा यतीही भिक्षा करीत असत. या सर्वांचे भोजन झाल्यावर ब्राह्मणांच्या पंक्ती बसत असत. यावेळी रोज नाना तऱ्हेची पक्वान्ने केली जात असत. असे असले; तरी विशेषेकरून बदाम, पिस्ते, चारोळ्या, वेलची, केशर इत्यादि मसाला घालून मोहनभोग म्हणजे शिराच प्रचुर मात्रेने केला जात असे. श्रीसीतारामहाराज स्वतः हौसेने व

श्रद्धाभराने भोक्त्यांना अत्यन्त आग्रह करून यथेष्ट पक्वान्ने वाढीत असत. तूप तर पाण्यासारखे वाढले जात असे. त्यावेळी दहा–दहा हजारांची एकेक पंगत बसत असे. अशा प्रकारे सूर्यास्तापर्यंन्त पंगती वसत असत व यज्ञाला आलेले सर्व लोक भोजन करून तृप्त होत असत.

यज्ञाला आलेल्या सर्व ब्राह्मणांचे रोज भोजन झाल्यानन्तर त्यांना दक्षिणा व विडे दिले जात असत. यतींना मात्र मुखशुद्धीसाठी वेलची, लवंग व तुळशीदळे देण्यात येत असत. सर्वांची भोजने झाल्यावर सायंकाळी भजन होत असे. त्यावेळी हिंगोलीकर भजनी मंडळी रोज रात्री श्रीसद्गुरू भगवंतापुढे मोठ्या भक्तिभावाने सांप्रदायिक संगीत भजन करीत असत. हे भजन ऐकण्यासाठी श्रीस्वामीमहाराज, श्रीसीताराममहाराज व श्रीनृसिंहसरस्वती-स्वामीमहाराज असे तिघेही महात्मे सिंहासनारूढ होऊन तेल-तुपाच्या भव्य प्रकाशमान समयांच्या लखलखीत प्रकाशात सर्वांना दर्शन व्हावे अशा पद्धतीने आपापली आश्रमचिन्हे धारण करून जवळजवळच पण पृथक् पृथक् बसत व भजनानंद घेत असत. त्याचप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांच्या जवळच श्रीगांडामहाराज व श्री. गोविंदराव पंडित शिप्रीकर हेही बसून असत. त्यामुळे या " श्रीगुरुशिष्य पंचायतनाचेच " सर्वांना साक्षात् दर्शन होत असे. त्यावेळी गळयात सुगंधित पुष्पांचा हार घातलेल्या, हातात दंड व कमंडलू धारण केलेल्या आणि शरीराला भस्म लावून अंगावर छाटी पांघरलेल्या अशा श्रीस्वामीमहाराजांना पाहून यज्ञासाठी जमलेल्या सर्व भक्तगणांना, यतींना, महात्म्यांना व महापुरुषांना हे साक्षात् भगवान् श्रीदत्तात्रेयच आम्हा सर्व अज्ञजनांचा उद्धार करण्यासाठी या भूतलावर अवतरित होऊन येथे आपल्या शिष्य-गणांसह प्रकटले आहेत असे वाटत होते.

राजूर येथील यज्ञाला श्रीस्वामीमहाराज उपस्थित राहणार असल्याचे कळल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासाचा लाभ व्हावा म्हणून हंपी विरूपाक्ष मठाचे श्रीशंकराचार्य विद्याशंकर-भारती, टाकळीचे गायत्री उपासक श्रीदाजीमहाराज, हैद्राबादचे श्रीभटजीमहाराज व वझूरचे श्रीदामोदरस्वामी ही सर्व मंडळी येथे जातीने उपस्थित राहिली होती. या लोकांप्रमाणेच परळीचे श्री. नानासाहेब देशपांडे यांनी या यज्ञाला उपस्थित राहून फार मेहनत घेतली. श्रीक्षेत्र नरसोबावाडीचीही अनेक मंडळी या यज्ञासाठी आली होती. सहितास्वाहाकारयज्ञाचा हा सोहळा आठ दिवस चालला होता. ज्या लोकांनी हा यज्ञसोहळा प्रत्यक्ष पाहिला त्या सर्वांनी दैवी चमत्काराचे दर्शन घडविणारा या यज्ञासारखा अपूर्व असा यज्ञ आपण आपल्या आयुष्यात दुसरा पाहिला नाही असा निर्वाळा दिला होता. या यज्ञाच्या आठ दिवसात एक लाखावर मंडळी येऊन त्यांनी यज्ञनारायणाचे दर्शन घेतले व भोजनप्रसादही घेतला. यावेळी मुक्त अन्नदान होत असल्यामुळे दररोज हजारो पान होत असे. भोजनोत्तर पत्रावळींचा पर्वतप्राय ढीग पडत असे. एके दिवशी एका बाईंचा लहान मुलगा या पत्रावळींच्या ढिगाखाली सापडला. ज्यावेळी सगळीकडे शोधाशोध करून मुलगा सापडेना त्यावेळी त्या मुलाची आई रडत रडत श्रीस्वामीमहाराजांकडे गेली. त्या बाईंनी "आपला मुलगा सापडत नाही," असे सांगताच "श्रीस्वामी-महाराजांनी, "तुमचा मुलगा पत्रावळीच्या ढिगाऱ्याखाली आहे. तेथे शोधा म्हणजे सापडेल," असे सांगितले. लगेच त्या बाईंनी जेव्हा लोकांच्या मदतीने पत्रावळीचे ढिगारे उपसून शोधाशोध केली तेव्हा त्यांना आपला मुलगा सापडला. तो श्रीस्वामीमहा-राजांच्या कृपेने सुखरूप आहे असे पाहून त्यांना परमानंद झाला.

श्रीस्वामीमहाराजांपुढे व यज्ञनारायणापुढे जमलेल्या द्रव्याच्या राशी यज्ञमंडपात यज्ञवेदीसमोरच घातलेल्या होत्या. यज्ञ स्वाहाकार पूर्ण झाल्यावर आठव्या दिवशी सर्वेही ऋत्विजांना त्यांच्या कल्पनेपेक्षा मुबलक दक्षिणा व वस्त्रे श्रीसीतारामहाराजांनी दिली. सुवासिनी स्त्रियांना सौभाग्यालंकार, लुगडी, खण इत्यादि दिले. त्याचप्रमाणे त्यांनी जगद्‌गुरू श्रीशंकराचार्यांची पूजा करून त्यांच्या अंगावर भरजरी शालजोडी घातली. यज्ञासाठी जमलेल्या सर्व साधुसंतांचाही श्रीसीतारामहाराजांनी यथायोग्य सन्मान केला. याशिवाय आचारी, पाणके, वाढपी, कामाठी इत्यादि सर्व लोकांना ठरल्याप्रमाणे पगार दिले. कित्येकांनी सेवा मानून काम केल्यामुळ त्यांनी वेतन घेतले नाही. श्रीसीतारामहाराजांचा स्वभाव अत्यन्त उदार होता. त्याचप्रमाणे त्यांना स्वतःला कसलाही लोभ नसल्यामुळे आलेली वस्त्रे किंवा द्रव्य केव्हा एकदा दान करीन असे त्यांना झाले होते. त्यामुळे अनेक जणांना त्यांनी प्रसाद म्हणून ओंजळ ओंजळ रुपयेच वाटले. जगद्‌गुरू श्रीशंकराचार्यांच्या पुढे तर त्यांनी मोठे ताट भरून रुपये दक्षिणा म्हणून ठेवले. कितीतरी गोरगरिबांना त्यांनी पुष्कळ द्रव्य दिले व कित्येक कर्जबाजारी लोकांना कायमचे कर्जमुक्त केले.

श्रीसीतारामहाराजांनी या यज्ञाच्या निमित्ताने ज्या लोकांना कर्जमुक्त केले त्या ऋणमुक्त झालेल्या लोकांपैकीच श्री. दादा पुराणिक हे प्रमुख पुरुष होते. ज्यावेळी "यज्ञात उरलेल्या द्रव्याचा विनियोग कसा करावा ?" अशी राजूरकर मंडळीत चर्चा सुरू झाली त्यावेळी कोणी काही कोणी काही सुचविता सुचविता एकाने नदीतीरावर मोठा घाट बांधावा अशी सूचना केली व ती बहुतेक

सर्वांना मान्यही झाली. श्रीसीतारामहाराजांनाही ही कल्पना उत्तम वाटली; कारण घाट हा सर्व समाजोपयोगीच असतो. तथापि त्यांची दृष्टी श्री. दादा पुराणिकांकडे होती; कारण श्री. दादा हे एक मोठे सच्छील व विद्वान् ब्राह्मण असून त्यांनी या यज्ञामध्ये यज्ञनारायणाची व समाजपुरुषाची जी उत्साहाने सेवा केली होती त्याला तोड नव्हती. विद्वान् पुरुष श्रीमंत असतोच असा काही नियम नाही. लक्ष्मी प्राप्त होणे हा निराळाच योग आहे. तो द्रव्य-योग दादांच्या नशिबी नव्हता. त्यामुळे ते सर्वमान्य विद्वान् असूनही अत्यन्त दरिद्रचावस्थेत खितपत पडले होते. नुसते दारिद्रचच त्यांच्या मागे लागले होते असे नसून त्याबरोबर सत्रा हजार रुपयांचे मोठे कर्ज देखील त्यांच्या शिरावर भारभूत होऊन बसल्यामुळे ते नेहमी चिंताग्रस्त व दुःखीकष्टी असत. ही त्यांची विपन्नावस्था पाहून श्रीसीतारामहाराजांना त्यांच्या विषयी फार कळवळा आला. त्यामुळे घाट बांधून पुढे कालान्तराने लोकांना सुखी करण्यापेक्षा आज आपल्या समक्ष ऋणरूपी चिखलात बुडून मरत असलेल्या दीनाचा त्यातून उद्धार करून त्याला सुखी करणेच अधिक योग्य होय, असा दयामय विचार त्यांच्या अंतःकरणात उत्पन्न झाला व तो सर्वांना मान्य झाला. संतांनी मनावर घेतल्यावर रंकाचा राव किंवा मूर्खाचा पंडित किंवा कंकराचा शंकर बनावयाला कितीसा उशीर लागणार ? ज्यांच्या स्पर्शमात्राने किंवा दृष्टिमात्राने अगर शब्दमात्राने अथवा संकल्पमात्राने कपाळींची ब्रह्मलिपी देखील बदलली जाते, ते गुरुभक्तश्रेष्ठ श्रीसीतारामहाराज प्रसन्न झाले असता श्री. दादा पुराणिकांच्या दुर्दैवाचे सुदैवात रूपान्तर झाले असल्यास काहीच नवल नाही. श्री. दादांनी ज्यावेळी भावभक्तीने संहितास्वाहाकार समारंभ पार पडल्यावर श्रीसीतारामहाराजांच्या

चरणकमळावर आपले मस्तक ठेवले त्याचवेळी श्रीगुरुचरणस्पर्शाने त्यांच्या कपाळीची दुष्टाक्षरे ही शुभाक्षरे बनली होती. त्यामुळे ज्यावेळी श्रीसीताराममहाराजांनी श्री. दादांना रोख सतरा हजार रुपये दक्षिणा देऊन त्यांच्या हातावर उदक सोडले त्यावेळी श्री. दादा पुराणिक यांना जो आनंद झाला तो काव्यातून व्यक्त करताना ते असे म्हणाले की –

हा मी विहीन पुरता असतां धनाने ।
दारिद्र्यदुःखदवतप्त सदा मनानें ।
भोगीत नित्य असतां ऋणयातनेला ।
त्वां दुःखभोग मम पूर्ण लयास नेला ।। १ ।।
दिल्हेस रोख रुपयेच सहस्र सत्रा ।
मुक्तीसवें उघडिलें जगिं भुक्तिसत्रा ।
जें देउं नाहिं शकला धन तो विधाता ।
तें देऊनी ठरविला विधिला अदाता ।। २ ।।
तूं दानशूर जगिं एकचि एक पाहीं ।
कारुण्यसिंधु दुसरा तुजवीण नाहीं ।
सत्रा हजार रुपये मज एकटांकी ।
देता पुरुष मिळता तरि एकटा कीं ।। ३ ।।
सत्रा हजार परगेंहिच जावयाचे ।
नाहींच यांनि मम पोषण व्हावयावें ।
हें जाणुनी अधिक देशि धन प्रभूत ।
श्रीमंत तूंचि जगिं राम रमाप्रभूत ।। ४ ।।

आर्या

तुमच्या औदर्याला सौजन्याला दयालुतेलाहि ।
सीताराम गुरुवरा त्रिभुवनिं उपमाच पाहतां नाहीं ।। ५ ।।

निरुपम करुणासागर संतशिरोरत्न एक जगतांत ।
सीतारामचि ऐसें सत्यचि जें सकळ सुज्ञ वदतात ॥ ६ ॥
द्यालचि धनवसनादिक यामध्यें नवल फारसें काय ।
मज वाटे अर्पालचि दीनास सजीव आपला काय ॥ ७ ॥
दातृत्व तुझें निरुपम त्वां मजला बुडविलें सदा दामीं ।
सीताराम दयाब्धें तुज नमितों वजूरवासि दादा मी ॥ ८ ॥

याप्रमाणे श्री दादा पुराणिक वजूरकर यांनी श्रीसीताराममहाराजांचे स्तवन करून कृतज्ञतापूर्वक त्यांच्या चरणी अनन्य भावानें आपले मस्तक ठेवून प्रेमाने असे म्हटले की, " तुवा केल्या उपकारासी । उत्तीर्ण नव्हे वंशोवंशीं ॥ "

श्री. दादा पुराणिक यांना कर्जफेडीकरिता सतरा हजार रुपये दिल्यानन्तरही श्रीसीतारामहाराजांनी नित्यनिर्वाहाकरिता म्हणून आणखीही बरेचसे रुपये दिले. श्रीसीतारामहाराजांसारख्या वदान्य अर्थात् उदार व दानशूर पुरुषांना, त्यांनी दुसऱ्यांना कितीही दिले तरी ते थोडेच दिल्याप्रमाणे वाटते. ज्यांनी आपले आयुष्यदेखील अखेरीस दुसऱ्यास द्यावयाला मागेपुढे पाहिले नाही, त्या दीनवत्सल श्रीसीतारामहाराजांना अदेय असे दुसरे काय होते ? त्यामुळे तत्त्वज्ञानी पुरुषांनी असे म्हटले आहे की, " किमदेयं वदान्यानाम् । " त्यांचे हे म्हणणे श्रीसीतारामहाराजांनी खरे करून दाखविले. श्री. दादा पुराणिक जन्मभर श्रीसीताराममूर्तीचेच ध्यान करीत करीत स्वतः श्रीसीतारामस्वरूपच झाले. महापुरुषांची कृपा झाली असता धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारही पुरुषार्थ मिळतात असा श्री. दादांना साक्षात् अनुभव आला.

श्रीसीतारामहाराजांनी राजूर येथे घडवून आणलेल्या या संहितास्वाहाकाराच्या पूर्णाहुतीच्या दिवशी रात्री श्रीस्वामीमहा-

राज व श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज हे दोघेजण बऱ्याच वेळ प्रेमाने बोलत बसले होते. त्यांच्या बोलण्यात त्यावेळी संस्कृत भाषाच अधिक प्रमाणात येत असल्यामुळे त्या दोघा श्रीगुरुशिष्यां-वाचून इतरांना ते काय बोलत आहेत याचा अर्थबोध होत नव्हता. मात्र उभयतांच्या या बोलण्याने श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामी-महाराजांचे पूर्ण समाधान झाले, हे त्यांच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसून येत होते.

संहितास्वाहाकाराच्या दुसऱ्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी नेहमीप्रमाणे सकाळी उठून आपले आन्हिक आवरले व श्रीसीताराम-महाराज व श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज यांना कळवून ते राजुराहून निघाले. त्यावेळी श्रीसीतारामहाराजांनी श्रीस्वामी-महाराजांना अशी विनंती केली की, "आपण इतक्या लवकर येथून जाऊ नये. काही दिवस येथे राहावे म्हणजे मला आपल्याशी सविस्तर बोलता येईल." अशा प्रकारे श्रीसीतारामहाराजांनी पुष्कळ विनंती केली; तरी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "येथे फार लोक जमल्यामुळे व आणखी देखील जमले; तर येथे हवा बिघडून लोकांना उपद्रव होण्याचा संभव आहे. याकरिता आम्ही दुसरीकडे जातो. कालान्तराने पुन्हा भेट झाली म्हणजे तुझे समाधान करू." याप्रमाणे श्रीसीतारामहाराजांना सांगून श्रीस्वामीमहाराज जावयास निघाले असता श्रीसीतारामहाराज त्यांना असे म्हणाले की, "मीही तुमच्या बरोबर येतो. आपणास मी काही विचारणार होतो; पण या गडबडीत ते राहूनच गेले. तरी आपण मला आपल्या बरोबर न्या." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "हा येथे मांडलेला सर्व पसारा टाकून, त्याची व्यवस्था न करता निघून जाणे हे काही तुला योग्य दिसणार

नाही. याकरिता तू येथे व्यवस्थेसाठी राहणे आवश्यक आहे. आम्ही पुन्हा भेट देऊन तुझे काय असतील ते सर्व मनोरथ पूर्ण करू," असे अभिवचन देऊन श्रीस्वामीमहाराज पुढील प्रवासासाठी निघून गेले.

याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांचे अभिवचन मिळाल्यामुळे आनंदित झालेल्या श्रीसीतारामहाराजांनी श्रीनृसिंहसरस्वती दीक्षीतस्वामी-महाराजांनाच श्रीस्वामीमहाराजांच्या जागी राहावयास सांगून त्यांच्याच हातून दर्शनाला आलेल्या असंख्य लोकांना अंगारा द्यावयास लावला व आपण प्रसाद देत राहिले. त्यावेळी श्रीनृसिंह-सरस्वती दीक्षितस्वामीमहाराज श्रीसीतारामहाराजांना असे म्हणाले की, "हे तुमचे कार्य तुम्हीच करू जाणा. आमच्या कडून काही हे होत नाही." हे ऐकताच प्रसाद व अंगारा देण्याचे कार्य श्रीसीतारामहाराज हे स्वतःच करू लागले. त्यानन्तर श्रीनृसिंह-सरस्वती दीक्षितस्वामीमहाराजांनी आपणाला श्रीगुरुभेटीचा आणि निजभेटीचा लाभ करून दिल्याबद्दल श्रीसीतारामहाराजांचे आभार मानले व त्यांची श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जाण्याबद्दल परवानगी मागितली. त्यावेळी त्यांचेही आभार मानून श्रीसीतारामहाराजांनी पूर्वीप्रमाणेच आपला मनुष्य बरोबर देऊन त्यांची श्रीक्षेत्र नरसोबा-वाडीला रवानगी केली.

श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराजांनी श्रीसीताराम-स्तोत्रात उपरोक्त राजूरच्या संहितास्वाहाकार यज्ञाचे वर्णन करताना असे म्हटले आहे की –

> लक्षाधिक ब्राह्मणानां धनान्नामिततर्पणम् ।
> जातं तथापि द्रव्यान्नाव्ययं गुर्वीक्षणामृतम् ।। १ ।।
> अलौकिकं तत्र जातं मनोवाग्विषयातिगम् ।
> कः समर्थो भवेत्तत्र यत्र श्रीदत्तदृग्गुरुः ।। २ ।।

अर्थ :– अमित अन्न आणि अमित द्रव्य समर्पण करून लक्षाधिक ब्राह्मण संतर्पण झाले; तरी सिद्ध असलेले अन्न किंवा द्रव्य पूर्ववत् होते तितकेच राहिले. ते संपले नाही. यज्ञसमारंभ सर्वांग परिपूर्ण असा अलौकिक झाला. त्याचे वर्णन मनाने किंवा वाणीने दुसरा कोणीही करू शकणार नाही. असा समारंभ करण्यास दुसरा कोण समर्थ आहे ? श्रीसीतारामहाराज हेच एक समर्थ झाले; कारण त्यावेळी स्वयं श्रीदत्तभगवान् श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांचे सान्निध्य त्यांना लाभून त्यांच्या कृपादृष्टीरूप अमृताचा वर्षाव त्यांच्यावर सतत होतच राहिला होता !!

या यज्ञाच्या शेवटच्या दिवशी श्रीस्वामीमहाराज स्वाहाकाराच्या मंडपात येऊन बसले होते. त्या एका प्रहरात श्रीस्वामीमहाराजांच्या समोर पैशांचा अक्षरशः पाऊस पडला. त्यामुळे त्यांच्या समोर जमा झालेले पैसे मोठमोठ्या पाट्यातून एकोणीस वेळा भरून न्यावे लागले. श्रीस्वामीमहाराज आपल्यापुढे आलेल्या पैशांना कधीही स्पर्श करीत नसत, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. त्यांनी हे सर्व पैसे श्रीसीतारामहाराजांतर्फे ब्राह्मणांना दक्षिणा म्हणून वाटण्यास सांगितले. श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे ज्यावेळी सेवेकरी लोक पाट्या भरून रुपये नेत होते त्यावेळी एका पाटीतील एक रुपया खाली पडला व तो घरंगळत जाऊन त्याचा श्रीस्वामीमहाराजांच्या पायाला स्पर्श झाला. अशा रीतीने आपाततः स्पर्श झाला; तरी यामुळे नियमभंग झाला असे पाहून श्रीस्वामीमहाराज दुसऱ्या दिवशी यज्ञमंडपातून अदृश्य झाले असे सर्व लोक सांगतात.

या यज्ञाच्या वेळी एक भाटिया वाणी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आला होता. यज्ञाचे एकंदर सर्व स्वरूप पाहून तो

श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाला की, “ माझी या यज्ञाप्रीत्यर्थ भेट म्हणून दोन लाख रुपये देण्याची इच्छा आहे. तरी आपण माझ्या या सेवेचा स्वीकार करावा. ” त्या भाटिया वाण्याने अशा प्रकारे खूप आग्रह केला; तरी श्रीस्वामीमहाराजांनी त्याची ही विनंती मान्य केली नाही.

वरील दोन्ही कथा वाचल्या म्हणजे श्रीसंततुकाराममहाराजांच्या पुढील अभंगांचे स्मरण होऊन तद्द्वारा श्रीस्वामीमहाराजांचे जे दर्शन होते ते किती अनुपमेय आहे, याची मनोमन प्रचीती येऊन मन आनन्दाने भरून जाते.

साधनें तरी हींच दोन्ही। जरी कोणी साधील ॥ १ ॥
परद्रव्य परनारी। याचा धरीं विटाळ ॥ २ ॥
देवभाग्यें घरा येती। संपत्ती या सकळा ॥ ३ ॥
तुका म्हणे तें शरीर। गृह भांडार देवाचें ॥ ४ ॥

  

कांहीं न मागे कोणासी। तोचि आवडे देवासी ॥ १ ॥
देव तयासी म्हणावें। त्याचें चरणीं लीन व्हावें ॥ २ ॥
भूतदया ज्याचें मनीं। त्याचें घरीं चक्रपाणी ॥ ३ ॥
नाहीं नाहीं त्या समान। तुका म्हणे मी जमान ॥ ४ ॥

  

परद्रव्य परकान्ता। नातळे जयाचिये चित्ता ॥
आणिक कर्मीं तो तत्त्वता। बांधला नवजाय ॥ १ ॥
ऐसा अनुभव रोकडा। विश्वासी तो जीवा जोडा ॥
एकान्त त्या पुढां। अवघा करी उकल ॥ २ ॥
सकट आंबलें तें अन्न। शोधी तेंचि मद्यपान।
विषमानें भिन्न। केलें शुद्धाशुद्ध ॥ ३ ॥

तुका म्हणे नित। बरवें अनुभवें उचित।
तरी काय हित। मोलें घ्यावें लागतें ॥ ४ ॥

श्रीसीताराममहाराज यांनी केलेल्या या यज्ञाला जगद्गुरू श्रीशंकराचार्य खरेस्वामीमहाराज हेही उपस्थित होते. हे अत्यन्त लहान वयाचे असून मोठे ज्ञानसंपन्न, नियमपूर्वक वागणारे व निरंहकारी होते. ते श्रीस्वामीमहाराजांकडून वंदन करून घेण्यास तयार होत नसत. उलट ते स्वामी आपल्याच मनोभावाने श्रीस्वामी-महाराजांना वंदन करीत असत. असे असले; तरी " हा श्रीशंकरा-चार्यांच्या गादीचा मान आहे. आम्ही वंदन केलेच पाहिजे, " अशी श्रीस्वामीमहाराज त्यांची समजूत घालून त्यांना विधियुक्त वंदन करीत असत. श्रीस्वामीमहाराज आपल्याला वंदन करीत असले; तरी त्यांचा अधिकार ओळखून श्रीखरेस्वामीमहाराजांनी त्यांच्या सन्निध असेपर्यन्त आपली मशाल मालवून ठेवली होती.

या संहितास्वाहाकार यज्ञाच्या ज्या जागी श्रीस्वामीमहाराज झोपत असत ती जागा बंदिस्त होती. त्या जागेला दरवाजा असून त्याला बाहेरून कडी बसविलेली होती. श्रीस्वामीमहाराज रोज रात्री झोपले की, त्या जागेला बाहेरून कडी लावून घेण्यात येत असे; कारण श्रीस्वामीमहाराजांनी आपल्याला नकळत राजुरी सोडून जाऊ नये असेच सर्वांना वाटत होते. परंतु ही सर्व लौकिक बन्धने श्रीस्वामीमहाराजांच्या दृष्टीने फोल व निरर्थक होती. याचा प्रत्यय या यज्ञाच्या शेवटच्या दिवशी सर्वांना आला. या यज्ञसमारंभास वझूर येथील श्रीदामोदरस्वामी हे आले होते. त्यांनी तेथून जाताना श्रीस्वामीमहाराजांना अशी प्रार्थना केली की, " आपण येथून पुढील संचाराला निघाल्यावर प्रथम वझूर येथे

येऊन मला दर्शन द्यावे व मगच पुढे जावे." श्रीदामोदरस्वामींची ही प्रार्थना मान्य करून श्रीस्वामीमहाराजांनी ज्या दिवशी स्वाहाकार पूर्ण झाला त्या दिवशी रात्री दुसरे रूप घेतले व ते वझूरास जाऊन त्यांनी श्री. दामोदरस्वामींना दर्शन दिले व ते परत आले. यावेळी राजूरला श्रीस्वामीमहाराज आपल्या मूळ रूपात उपस्थित होतेच.

या संहितास्वाहाकारयज्ञाच्या निमित्ताने छापून आणलेली वेदपाद स्तुतीची पुस्तके श्रीस्वामीमहाराजांनी स्वतः आपल्या हातांनी सर्व अधिकारी विद्वानांना वाटली. ही वेदपादस्तुती श्रीस्वामीमहाराजांनी स्वतः लिहिलेल्या "श्रीदत्तपुराण" या ग्रंथातील प्रथमाष्टकातील प्रथमाध्यायातच आली असून हा संपूर्ण पहिला अध्याय या स्तुतीने व्यापला आहे. श्रीदत्तपुराण या ग्रंथाच्या प्रथमावृत्तीच्या प्रस्तावनेत माझे सद्‌गुरुनाथ संतश्रेष्ठ महायोगी श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांनी "वेदपादस्तुतीची" माहिती सांगताना व महिमा गाताना असे म्हटले आहे की, "प्रथमाष्टकातील प्रथमाध्यायाचे नाव वेदपादस्तुती असे आहे. या अध्यायातील प्रत्येक श्लोकातून ऋक्संहितेच्या अध्यायातील मंत्रभाग जसाच्या तसा उद्‌धृत केलेला आहे. कोठे श्लोकाच्या एका पादात, कोठे दोन पादात तर कोठे तीन पादात मंत्रांची प्रतीके आली आहेत. उदाहरणार्थ पहिल्या श्लोकात "हृदिस्पृगस्तु शंतमः।" हा शेवटचा वेदपाद आहे. दुसऱ्या श्लोकात "तद्विष्णोः परमं पदम्।" हा वेदपाद आहे. याप्रमाणे पहिल्या अध्यायातील प्रत्येक श्लोकाचा आरंभ संहितेतील प्रत्येक अध्यायाच्या आरंभीची पदे घेऊन केला आहे. "अग्निमीळे," "अयं देवाय," "एता या," "अयं वा" व "प्रमन्महे" या पाच श्लोकांचा आरंभ जसा आहे तसाच तो ऋक्संहितेतील पहिल्या पाच अध्यायांचाही आहे. अशीच रचना

श्रीदत्तपुराणातील प्रत्येक अध्यायाच्या आरंभश्लोकातही केलेली आहे. यावरून श्रौतवाङ्मयाचा श्रीमहाराजांचा किती गाढा व्यासंग होता हे कळून येते. ज्यांच्या ग्रंथातून वेदाचा अर्थ तर येईलच; पण वेदातील जसेच्या तसे उल्लेखसुद्धा ज्यांच्या वाणीतून अप्रतिहत बाहेर पडतात अशा महापुरुषांना "वेदाचा तो अर्थ आम्हासीच ठावा," असे म्हणण्याचा पूर्ण अधिकार आहे. "वक्तारमासाद्य यमेव नित्या सरस्वती स्वार्थसमन्वितम्। निरस्तदुस्तर्ककलंकपंका नमामि तं शंकरमर्चितांघ्रिम्।।" जो महाभाग वक्ता मिळाल्यामुळेच नित्य सरस्वतीचा म्हणजे वेदवाणीचा चिखलाप्रमाणे असलेला दुस्तर्करूपी कलंक धुऊन जाऊन ती आपल्या खऱ्या अर्थाने प्रकाशमान झाली, त्या पूज्यपाद श्रीशंकराचार्यांना मी नमस्कार करतो. असे श्रीशंकराचार्यांना नमन आपल्या संक्षेपशारीरक ग्रंथाच्या आरंभी सर्वज्ञात्ममुनींनी या दृष्टीनेच केलेले आहे. ब्राह्मणाचा देह हा क्षुद्र विषयसुखाच्या लालसेत बुडून जाण्याकरिता दिलेला नसून अनन्त फलदायक अशी खडतर तपश्चर्या करण्याकरिता तो ईश्वराने दिलेला आहे आणि ती तपश्चर्या म्हणजे "वेदाभ्यासो हि विप्रस्य तपः परमिहोच्यते," "वेदोनित्यमधीयताम्," "ब्राह्मणेन निष्कारणं षडंगो वेदोऽध्येयो ज्ञेयश्च" इत्यादि वचनांवरून वेदाभ्यास अखंड करणे हीच होय. कलिकालामुळे, बुद्धिभेदामुळे, सात्त्विक धैर्याचा लोप झाल्यामुळे कोणत्याही प्रकाराने का होईना या आपल्या ईश्वरादिष्ट मार्गापासून ब्राह्मण भ्रष्ट झाल्यामुळेच त्यांचा अनेक मुखांनी अधःपात होत आहे, हे शास्त्रदृष्टीने पाहणाराला मान्य करावे लागेल. हैड्रोजन बाँबपेक्षा प्रभावी शस्त्रांनी देखील अर्जुनाला युद्धारंभी उत्पन्न झालेली कुमती घालविता आली नसती; पण अचिन्त्य शक्तीच्या भगवन्तांनी आत्मविद्येने ती सहज दूर

केली. ज्यामुळे पूर्वी "न योत्स्ये" असे नेभळटपणाचे उद्‌गार काढणारा अर्जुन "करिष्ये वचनं तव" असा खणखणीत कबुली जबाब देऊन कर्तव्यपालनाने शेवटी नराचा नारायण झाला. अशी आत्मविद्या वेदांच्या द्वाराच प्राप्त होणारी आहे; पण साम्प्रत हा स्वतःचाच वेदविद्यारूपी परंपराप्राप्त दायभाग ब्राह्मणांकडून उपेक्षिला जात असल्याने त्यांची तेजोहीन अवस्था अपरिहार्य आहे. कर्तव्य कोणते व अकर्तव्य कोणते असा संशय उत्पन्न झाला; तर त्यावेळी शास्त्र निःसंदिग्ध शब्दात असे सांगत आहे की, "अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः यथा ते तत्र वर्तेरन् तथा तत्र वर्तेथाः।" आचरणाबद्दल जर तुला संशय उत्पन्न झाला तर त्यावेळी शास्त्र-विवेकसंपन्न ब्राह्मण जसे वागत असतील तसे तू वाग. इतका विश्वास ज्यांच्याविषयी वेदपुरुषाने दाखविला आहे त्यांनीच त्या विश्वासाचा आणि पर्यायाने स्वतःचा घात करून घेतल्यास सृष्टि-कर्ता तरी काय करील? श्रीस्वामीमहाराजांचे विभूतिमत्त्व या ग्रंथावरून सर्वांना कळून यावे व सर्वांनीच त्यांनी दाखवून दिलेल्या मार्गाने जाण्याचा यावच्छक्य प्रयत्न करून सुखी व्हावे, हीच त्या सर्वसाक्षी प्रभूच्या जवळ प्रार्थना आहे."

अशा प्रकारे श्रीगुरुचरणांच्या उपरोक्त कथनावरून ही वेद-पादस्तुती किती अभ्यसनीय व मननीय आहे याची कल्पना साधक वाचकांना आल्याशिवाय राहणार नाही. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने या वेदपादस्तुतीचे सतत मनन व चिंतन घडावे म्हणून त्यांच्या चरणी अनन्य भावाने प्रार्थना करून ही वेदपादस्तुती येथे अर्थासह उद्‌धृत करीत आहोत.

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ श्रीमन्मंगलमूर्तये नमः ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥

॥ श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य

श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती विजयतेतराम् ॥

# ॥ वेदपादस्तुतिः ॥

॥ ॐ ॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

॥ श्रीदत्तात्रेयगुरुचरणाभ्यां नमः ॥

श्रीदत्तेनोदिता टीका वासुदेवसरस्वतीम् ॥
निमित्तीकृत्य विभुना चरितस्य गुरोर्वरा ॥ १ ॥
अथान्यापि तथैवेयं स्वमाहात्म्यार्थबोधिनी ॥
स्वल्पग्रन्था स्फुटार्था च टीका तेनैव तन्यते ॥ २ ॥
सरस्वतीमहानद्यास्तीरे सिद्धाश्रमेऽश्रमे ॥
श्रीक्षेत्रे विमले दत्तभक्त प्रार्थनया स्फुटम् ॥ ३ ॥

अग्निमीळे परं देवं यज्ञस्य त्वां त्र्यधीश्वरम् ॥
स्तोमोऽयमग्रियोऽर्थ्यंस्ते हृदिस्पृगस्तु शंतमः ॥ १ ॥

अर्थ :– " अथ " शब्दाने मंगल करून श्रीवासुदेवानंदसरस्वती वेदपादस्तुतिरूपाने श्रीदत्तपुराण लिहिण्यास आरंभ करतात " यज्ञाचा स्वयंप्रकाशमान असणारा जो अग्निदेव त्याची मी स्तुती करतो; कारण तो कर्मफल पोहोचविणारा, तीन स्वरूपाने म्हणजे अग्नी, आदित्य, वायुरूपाने सकल विश्वात व्यापून राहणारा, अन्तर्यामिरूपाने सूर्य, पावक, वायू यांचा नियामक असा, म्हणजे त्रिगुणमायानियन्ता श्रीदत्तदेवच आहे. त्याचीच ही स्तुती मी करतो. मी करीत असलेल्या आणि वर्णिलेल्या पुढील स्तुतीने साधकांना

चतुर्विध पुरुषार्थांचा लाभ होईल; कारण स्वयंप्रकाशित श्रीअग्निदेव म्हणजेच श्रीदत्तात्रेय देव हा भक्तांना फल देणारा आहे. याशिवाय तो श्रीदत्तदेव कल्याणप्रदही आहे. त्या देवांना आमची ही स्तुती आवडणारी अशीच आहे. याकरिता, हे देवा ! आम्ही परंपरागत केलेली स्तुती तुझ्या अंतरात चिरकाल राहो."

**अयं देवाय दूराय गिरां स्वाध्याय सात्वताम् ॥**
**स्तोमोऽस्त्वनेन विन्देयं तद्विष्णोः परमं पदम् ॥ २ ॥**

अर्थ :– स्वयंप्रकाश आणि वाणीच्या पलीकडे असलेल्या अशा या देवाची आम्ही करीत असलेली स्तुती भक्तांच्या आराधनेस उपयुक्त अशीच असो ( होवो. ) "या स्तुतीने साधकांना कोणता लाभ मिळेल ? " अशी शंका घेऊन ग्रंथकार उत्तर देतात, "हे देवा! तुझी स्तुती विश्वव्यापक अशा तुझ्या निरतिशयानंद पदास ( मोक्षास ) साधकांना पोहोचविते. ( साधक निरतिशयानंद मोक्ष-सुखाचा अनुभव घेतात. ) "

**एता या लौकिकाः सन्तु हीना वाचोऽपि नः प्रियाः ॥**
**बालस्येव पितुस्ते त्वं स नो मृळ महाँअसि ॥ ३ ॥**

अर्थ :– वाणीस अगम्य अशी तुझी ही स्तुती माझ्या अंतकरणात चिरस्थायी व प्रेमपात्र कशी होईल ? अशी शंका घेऊन ग्रंथकार म्हणतात, जरी ही स्तुती आमच्या मनात असलेल्या व अलंकार-रहित प्राकृत वाणीची स्तुती असली तरी यद्वत् मुलांची वाणी (स्तुती) पित्यास आवडते, (आनंददायक होते) तद्वत् हे दत्तदेवा ! तुला ती प्रिय होईलच; कारण तू सर्वांचा पिता आहेस, पूज्य आहेस, म्हणून आमच्या प्रेमवाणीने आम्ही तुझी स्तुती करीत असल्यामुळे तू आम्हास सुखी कर, उभयत्र क्षेम कर.

**अयं वां नात्मनोस्तत्त्वमधिगम्यास्ति दुर्मनाः ।।**
**हृद्रोगं मम सूर्य त्वं हरिमाणं च नाशय ।। ४ ।।**

**अर्थ** :– या स्तुतीने कोणता लाभ मिळणार ? अशी शंका घेऊन ग्रंथकार सांगतात की, भक्त हा इंद्रिये, वाणी, मन यास अगम्य असणाऱ्या श्रीदत्तात्रेयदेव स्वरूपास जाणत नाही; कारण ते गूढ आहे. उपाधिप्रतिबंधामुळे तत्त्वंपदार्थाचे निःसंशय ज्ञान भक्तास नसते. त्यामुळे तो दुःखी व खिन्न होतो. याकरिता हे अग्निदेवा ! तुझ्या स्तोत्राने आमचा त्रिविध ताप नाहीसा होवो व तुझा आत्मा जो सूर्य आहे व जो उत्पत्ती, स्थिती व प्रलय यांस निमित्तोपादान कारण आहे तो भगवान् सूर्यदेव आमचे कामादि षड्विकारजनित हृद्रोग दूर करो आणि तत्त्वं पदार्थाच्या उपाधींचा नाश करून आम्हास शुद्ध स्वरूपी नेवो.

**प्रमन्महेस्माऽन्विद्धीतिस्तोतारस्ते वयं नमः ।।**
**भगवो देव ते स्तोममारे अस्मे च श्रृण्वते ।। ५ ।।**

**अर्थ** :– हे भगवान् देवा ! आम्ही तुमचे प्रियभक्त आहोत, हे मान्य करा. परमात्मस्वरूपापासून आमच्या वाणी फारच दूर आहेत आणि आम्ही तर बहिर्मुख असल्याने सच्चिदानंद स्वरूपापासून दूर राहिलो आहोत. म्हणून आमची स्तुती ही बालवाणी आहे असे समजून ऐकावी. आमचा तुम्हाला नमस्कार असो.

**इंद्रो मदाय यातीह सत्वरं सोमिनो यथा ।।**
**स्तोतृनेहि तथाऽस्मांस्ते माध्वीर्गावो भवन्तु नः ।।६।।**

**अर्थ** :– हे देवा ! ज्याप्रमाणे इंद्र सोम करणाऱ्यांच्याकडे पुष्टचर्थ जातो, त्याप्रमाणे तू तुझे स्तोत्र गाणाऱ्या आमच्याजवळ ये. आमची

ही स्तुतिरूप रसभरित गोड बालवाणी ऐक. त्याशिवाय आमचा दुःखनाश होणार नाही.

**द्वे विरूपेऽत्र मायायास्तेऽत्र मग्नोऽस्मि पीडितः ॥**
**माभितः संतपन्तीह सपत्नीरिव पर्शवः ॥ ७ ॥**

**अर्थ** :– इतकेच नाही; तर हे देवा ! या जगात विक्षेप आणि आवरणशक्ती अशी मायेची भिन्नभिन्न दोन स्वरूपे आहेत. त्यात मी पार बुडालो आहे व पीडिलो आहे. या जगात, अनेक स्त्रिया असलेल्या पतीस ज्याप्रमाणे चोहोबाजूने व सर्वप्रकारे सवतीमत्सराने पीडतात, त्याप्रमाणे सर्व मानसिक व शारीरिक पीडा माझ्यावर तुटून पडून मला पीडा देत आहेत.

**इदं श्रेष्ठमपि प्राप्य जन्म गन्ताध एव तत् ॥**
**कुरु प्रसादं ज्ञात्वैतत्तेनाहं भूरि चाकन ॥ ८ ॥**

**अर्थ** :– हे देवा ! श्रेष्ठ मानवजन्म मिळूनसुद्धा या सांसारिक त्रिविध तापाने मी अधोगतीस चाललो आहे, हे समजून माझ्यावर सत्वर कृपा करावी. सर्व पीडापरिहारक अशा तुझ्या कृपेने मी पुष्कळशा गोष्टींची इच्छा करीत राहिलो आहे; कारण शेवटी तुझी कृपाच तारक अशी आहे.

**प्रवस्तुज्ञानाज्जहाति निष्कामश्चेन्मृतिं त्वहम् ॥**
**न तादृशोऽतः कामादि सर्वं रक्षो निबर्हय ॥ ९ ॥**

**अर्थ** :– सन्निहित दृग्गोचर पदार्थज्ञानाने जर मानव निष्काम झाला तर तो मृत्यूसही जिंकू शकतो; पण मी मात्र तसा निष्काम नाही. मला काममोहादि राक्षस पीडा करतात. त्यामुळे माझी सुवासनापूर्ती अवघड झाली आहे. याकरिता तू आमचे अविद्या, काम व कर्मादि सर्व बंध नाहीसे कर.

सुषुमार्मूधियः स्तोमैरागच्छैंते वयं विभो ।।
त्वदंशास्त्वं पतिर्नोऽसि देवो देवेषु मेधिरः ।। १० ।।

अर्थ :- हे व्यापक देवा ! याप्रमाणे जर तू आमचे दुःखमूलक संसारबंध नाहीसे केले नाहीस तर तुझी स्तुती करणारे आम्ही तुझ्या स्तोत्रांनी आमच्या बुद्धीचा शोध करू आणि शुद्धसत्वोपाधी व प्रकाशमान अशा तुझ्या ज्ञानस्वरूपाप्रत पोहोचू; कारण आम्ही तुझेच अंश आहोत व तू आमचा पालन कर्ता आहेस.

वसू रूपं रूपमिह प्रतिरूपोऽसि नो पृथक् ।।
एतानि भूतानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः ।। ११ ।।

अर्थ :–हे देवा ! तू चराचर जीवांचा आत्मा आहेस. मननशील विद्वान् ब्राह्मण चराचर सर्व सृष्टी तूच आहेस असे समजात; कारण या सृष्टीस विवर्तोपादान तूच आहेस. हिरण्यापासून तयार झालेल्या कुंडलादि अलंकाराप्रमाणे सर्वत्र सुवर्ण एक असते. नामरूप मात्र भिन्न असते. ही वेगवेगळी भासणारी जीवसृष्टी तुझ्याहून निराळी नाही.

तं नु त्वां किं ब्रुवेऽल्पज्ञो भगवन्तं क्षमस्व भोः ।।
ओषमागहि मां त्वं चेत्सखा सन्नतिमन्यसे ।। १२ ।।

अर्थ :–श्रीदत्ता ! मी अंतःकरण संभिन्न असल्याने अल्पज्ञ आहे. तू मात्र इंद्रियज्ञानातीत असून उत्पत्ती, विनाश, विद्या, अविद्या इत्यादींचा ज्ञाता म्हणजे सर्वज्ञ भगवान् आहेस. यामुळे मी तुझे स्वरूप एकदम निश्चयपूर्वक जाणू शकत नाही. मी यापेक्षा जास्त काय बोलणार ? काहीच बोलत नाही. हे भगवन् ! माझ्याकडून अपराध झालेले आहेत. तू मला क्षमा कर; कारण तू माझा मित्र आहेस.

जर खरोखरच मी तुला अतिप्रिय वाटत असेल तर ज्याप्रमाणे धेनू वत्साकडे धावत येते त्याप्रमाणे तू माझ्याकडे सत्वर धावत ये.

ता वासना घ्नन्ति यथा वृश्चिकस्यारसं विषम् ॥
अतो मां पाहि भूयिष्ठां नमउक्तिं विधेम ते ॥ १३ ॥

अर्थ :– हे देवा ! तू जर आता न येशील तर मी मरून जाईन. ज्याप्रमाणे इंगळीचे विष मनुष्यास ठार करते; त्याप्रमाणे अनेक जन्मातील वासना माझा घात करतील. याकरिता मी तुला वारंवार नमस्कार करीत आहे; कारण हे प्रभो ! तुला नमस्कार केला असताना तू भक्तांना ओलांडून जात नाहीस असे श्रुतिवचन आहे व त्यावर आमचा पूर्ण विश्वास आहे.

नि होता सीदसि विभो यस्त्वं यष्टुर्गृहे प्रिय ॥
तं त्वाव्हये ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पते ॥ १४ ॥

अर्थ :– हे व्यापक देवा ! यज्ञकर्त्या यजमानाच्या गृहात अग्निरूपाने तू हवनकर्ता होऊन राहात आहेस. हे प्रियदेवा ! अन्न, वेदी वगैरेंना वेदात ब्रह्म असेच म्हटले आहे. तू वेदांचा अधिपती आहेस. याकरिता ज्येष्ठराज अशा तुला मी पाचारण करीत आहे.

सेमामविड्ढि प्रभृतिमीशिषे योऽव मानिशम् ॥
त्वं विश्वेषां यदीशानो ब्रह्मणा वेषि मे हवम् ॥१५॥

अर्थ :– हे प्रभो ! तूंच आमचे पोषण कर व मायामय प्रपंचापासून आमचे रक्षण कर; कारण तू सर्व विश्वाचा सत्ताधीश आहेस. वैदिक मंत्राने केलेल्या माझ्या निमंत्रणाचा स्वीकार करून माझी प्रार्थना मान्य कर आणि माझ्या सन्निध प्रकट हो.

मन्दः स्वकोऽयं दीनोऽज्ञ इति विद्वान्भवान्प्रभुः ॥
इंद्र आशाभ्यः परि मां सर्वाभ्यो अभयं करत् ॥१६॥

अर्थ :– हे देवा ! मी जरी मतिहीन व दीन असलो तरी तुझा भक्त आहे असेच समज. तू मात्र समर्थ व परमेश्वर आहेस म्हणून सर्व दिशांपासून ( चोहोंकडून ) माझे रक्षण कर व आशापाशातून माझी सोडवणूक कर. जे आशेचे दास बनले ते अखिल जगात भ्रमण करतात व दुःख पावतात आणि जे आशादास बनले नाहीत ते सुखमय जीवन जगतात आणि पाशमुक्त होतात. अर्थात् जगच त्यांचे दास बनते, असे गरुड पुराणात म्हटले आहे. यामुळे ते स्वर्गसुख अनुभवतात.

**प्र य आरुपितां भ्रान्ति त्वत्प्रसादाज्जहाति सः ॥**
**विमुच्यते तद्विप्रास्त्वां जागृवांसः समिन्धते ॥ १७ ॥**

अर्थ :– अनात्मस्वरूप अशा देहादि जड वस्तूंच्या ठिकाणी आत्मस्वरूपाची भ्रान्ती ( देहादिकांना आत्मस्वरूप समजणे ) सामान्य जनांना असणे स्वाभाविक आहे; परंतु अशा प्रकारची ( देहादिकच आत्मा आहे ही ) भ्रांती केवळ तुझ्या कृपेनेच नाश पावते. त्यामुळे विचारशील ज्ञानी लोक आत्मस्वरूपबोधाविषयी सदैव जागे (दक्ष) राहतात आणि सावधानता ठेवून तुझी म्हणजे भगवंताची उपासना करतात.

**इच्छन्ति देवा अपि ते प्रसादाय नृजन्म तत् ॥**
**विद्वान्नामानि ते दत्त विश्वाभिर्गीर्भिरीमहे ॥ १८ ॥**

अर्थ :– श्रीदत्तदेवा ! केवळ सुखमय अशा स्वर्गलोकात वास्तव्य करून मग्न झालेले देव सुद्धा तुझी कृपा मिळावी म्हणून भूलोकी नरजन्म मिळावा अशी इच्छा करतात. याकरिताच श्रीदत्तात्रेया ! आम्ही प्राकृत, संस्कृत, लौकिक व अलौकिक वाणीने तुझे गुण गायन करतो आणि आमच्याकडून तसे घडावे एतदर्थ प्रार्थना करतो.

स्वर्गामध्ये सुद्धा, प्रेमाने तुझे गुणगान करण्यास मिळणें कठीण आहे; कारण मानवलोकातच तुझें नामगायन चित्तात स्फुरण पावते अर्थात् ही तुझीच कृपा आहे. मानवजन्मातच भगवन्नामगायन होते.

इन्द्र त्वा भजतः सूरेर्दुलभं किं तरामि तत् ॥
भक्त्या क्लेशादि ते नावा गम्भीराँ उदधीँरिव॥१९॥

अर्थ :– अहो परमेश्वर श्रीदत्तदेवा! भक्तीने तुमचे भजन करणाऱ्या ज्ञानी माणसास अशक्य काय आहे? अर्थात् काहीच नाही. याकरिता ज्याप्रमाणे नौकेने महासागर तरता येतो त्याप्रमाणेच तुमच्या भक्तिरूप नावेने अनेक जन्मांतरातील देहांमुळे दुःखमय झालेल्या संसारसागरातून मी तरून जाईन. सांप्रतचा काळ भक्तियोगास सुलभ आहे. तात्पर्य, कलिकालात ईश्वरप्राप्ती भक्तीनेच सुकर झाली आहे.

न ता रोद्धुं धियः शक्ता योगेनापि ततः सदा ॥
त्रातारं धीमहीश त्वां धियो यो नः प्रचोदयात् ॥२०॥

अर्थ :– हे श्रीदत्तदेवा! कामरागद्वेषादि बुद्धिवृत्तींचे निरोधन करण्यास आम्ही समर्थ नाही. योगाभ्यासानेही वृत्तिनियमन दुःसाध्य वाटते. मग उपायांवाचून हे कसे जमणार? हे देवा! तू सदैव सर्वांचे रक्षण करतोस. याकरिता तुझेच आम्ही ध्यान करतो. ईश्वराचे ध्यान नेहमीच मनाची प्रवृत्ती धर्माकडेच करते. तात्पर्य, ईशध्यान वृत्तिनियामक व सत्प्रवर्तक आहे.

वैश्वानराय दत्वाऽन्नं विधिलब्धं सदैव ते ॥
भवामो भजने सक्ता अस्माकं श्रृणुधी हवम् ॥२१॥

अर्थ :– सर्व जगतातील जीवांचा हितकर्ता किंवा सर्व जीवांचे आत्मत्वाने नियमन करणारा असा जो वैश्वानर देव, त्याचे आम्ही

दैवयोगाने मिळालेल्या अन्नाने हवन करून भजन करतो. याकरिता हे देवा ! तू आमचे आवाहान ऐक. तात्पर्य, आम्ही वैश्वदेवरूप उपासना करीत आहोत; तरी तू आम्हाला प्रसन्न हो.

एवा त्वामिन्द्र विप्रासो जागृवांसो विपन्यवः ।।
स्तुवन्त्येभ्यो हि ते कोऽपि न ज्यायाँ अस्ति वृत्रहन् ।।२२।।

अर्थ :– हे ईशा ! तुझीच आम्ही वैदिक मंत्राने स्तुती करीत आहोत. आमच्या वैदिक मंत्राच्या स्तुतीपेक्षा मोठे असे दुसरे काही नाही. विशेषेकरून जागरूकपणे स्तवन करणारे ज्ञानी रंगवर्णाचा द्विमात्रोच्चार करतात. हृदयात एक मात्रा, मूर्धास्थानी अर्धमात्रा आणि नासिकास्थानी अर्धमात्रा, अशी दोन मात्रोच्चारांनी स्तुती करतात. याकरिता हे अज्ञाननाशका देवा ! या स्तुतीने आमचे आत्मज्ञानावरणरूप अज्ञान नाश पावो.

प्रऋभुभ्यो गृणद्भ्यस्ते मर्त्येभ्योऽप्यमृतत्वमित् ।।
दत्तं स्मृत्वा तव मनोरथ आयातु पाजसा ।। २३ ।।

अर्थ :– हे देवा ! तुझे स्तुतिरूपच अन्न स्तुती करणाऱ्या अशा आम्हाला दे. हेच अन्न श्रेष्ठ आहे. या अन्नाचे भक्षण करून साधू तृप्त होतात. याच्यापुढे लोकप्रसिद्ध अन्नाचा उपयोग काय ? तात्पर्य ईश्वरभजन हेच भक्तजनांचे अन्न व भोजनामृत आहे.

इदमु त्यदिषं श्रेयो यज्जग्ध्वा परितृप्यति ।।
साधुस्तद्भजनं तेऽस्मे इषं स्तोतृभ्य आभर ।। २४ ।।

अर्थ :– हे अग्निदेवा ! हे इषान्न अमृत आहे. हेच अन्न सर्वात श्रेष्ठ आहे; कारण ते अन्न भक्षण करून साधू लोक तृप्त होतात. लोकप्रसिद्ध अन्न खाण्यास योग्य नाही काय ? आहे. परंतु त्या अन्नाने केवळ शरीर पोषण होते. ज्ञानामृताने भोजनतृप्ती मिळत

नाही. याकरिता तुझी स्तुती गाणाऱ्या आम्हास तुझे भजनरूप असेच अन्न दे.

त्वामग्ने मायिनं मायां जेतारमपराजितम् ।।
हित्वा कं शरणं यामः स नो बोधि श्रुधी हवम् ।।२५।।

अर्थ :– हे अग्निदेवा ! मायेवर तुझीच सत्ता आहे. मायेला तू ताब्यात ठेवले आहेस व तू मायेचा जेता आहेस. अशा तुला सोडून आम्ही कोणास शरण जावे ? तुझ्याशिवाय आमचा रक्षणकर्ता अन्य कोण आहे ? कोणीच नाही. यास्तव आम्ही तुला शरण आलो आहोत व म्हणून तू आमची प्रेमाची हाक ऐक.

मही महेशोऽज्ञानेन भवानवतु मावृतम् ।।
यथा वै सूर्यं स्वर्भानुस्तमसाविध्यदासुरः ।। २६ ।।

अर्थ :– नित्योत्सवांनी युक्त असलेल्या अशा हे महेशा ! किंवा ज्ञानरूप भूमीच्या ईशा ! किंवा हे ब्रह्मांडाच्या ईशा ! अज्ञानाने आवृत्त असलेल्या आणि स्वांशभूत असलेल्या अशा माझ्या आवरणाचा परिहार करून माझे रक्षण कर. स्वांशभूत असणाऱ्या तुला आवरण कसे झाले ? ज्याप्रमाणे पर्वकाली राहू हा सूर्याला आणि चंद्राला झाकून टाकतो त्याप्रमाणे मायेने मला झाकून टाकले आहे. आवरणरूपरहित वास्तवस्वरूप असणेच योग्य आहे असे श्रुतीत वर्णिले आहे.

प्रयुंजती यदात्मानं मनीषा मनसा सह ।।
तदैव भवतैकान्तं जानता संगमेमहि ।। २७ ।।

अर्थ :– हे देवा ! सच्चिदानंदाच्या निर्भेळ साक्षात्काराकरिता, अज्ञानाने आवृत्त अशा मनासह मनोनिग्रह करणारी बुद्धी ज्यावेळी प्रत्यगात्मस्वरूपाशी विशेषेकरून तादात्म्यस्वरूपाप्रत पोहोचते

त्याचवेळी तुझ्या कृपेचा योग्य काळ असतो, हे जाणणाऱ्या अशा तुझ्या स्वरूपी आणि तत्पदलक्ष्यभूत अशा शुद्ध स्वरूपाशी त्वंपदाने लक्षित असलेले असे आम्ही संगत (युक्त) होतो. तात्पर्य, एकान्तमत्यन्तमखंडैकरसरूप बनतो म्हणजेच जीवशिवाचे संपूर्ण ऐक्य होते.

ऋतस्य गोपास्त्वं देहि मह्यं शं युंजते धियः ॥
भीताय नाधमानाय ऋषये सप्तवध्रये ॥ २८ ॥

अर्थ :– हे प्रभो ! तू अवश्यंभावी कर्मफलाचा पालनकर्ता आहेस. तुझ्या ठिकाणी भक्तियोग करणाऱ्या माझे त्रिविध दुःख नाहीसे कर आणि बुद्धिग्राह्य व आत्यंतिक असे सुख दे; कारण मी संसारापासून भयभीत झालो आहे. "युंजते मन उत युंजते धियः" या मंत्राने मी आपली प्रार्थना करीत आहे. देहातिरिक्त आत्मप्राप्तिरूपाकडे जाण्याचा माझा स्वभाव आहे. याकरिता सर्वतोपरि माझे रक्षण कर.

त्वं हि पाताऽसि नो दत्त परिबाधस्व दुष्कृतम् ॥
कामादीन्यस्य बीजानि जहि रक्षांसि सुक्रतो ॥ २९ ॥

अर्थ :– हे दत्तदेवा ! ज्याअर्थी तू आमचा रक्षक आहेस त्याअर्थी तू आमचे दुष्कृत म्हणजे ज्ञानप्रतिबंधक पातक दूर कर, नाहीसे कर; कारण या पातकांचे मूळ कारण काम, राग, मोहादि आहेत. ते सर्वभक्षक आहेत. स्मृतीने या राक्षसाचे वर्णन "महाशनी महापाप्मा" असे केले आहे. भक्तांच्या दुष्कृताचा नाश करणाऱ्या आणि भक्तोद्धरण करणाऱ्या हे सुक्रतो ! हे दत्ता ! आमची सकल पापकर्मे नष्ट कर.

**पिबा सोममिति श्रुत्वा यष्टुर्हूतिं शुभं द्रवत् ।।**
**आयासि पुरुरूप त्वमासु गोषूपपृच्यताम् ।। ३० ।।**

अर्थ :– हे इंद्ररूपी दत्ता ! "पिबा सोममिती" अशा मंत्राने यजन करणाऱ्या यजमानाचे निमंत्रण तू स्वीकारतोस आणि त्या शुभकारक यज्ञामध्ये तू उपस्थित असतोस. हे पुरुहूता ! हे पुरुष्टुता, इंद्रा ! ! सेंद्रियांतःकरणाची तू तृप्ती करतोस. त्यायोगे यजमानाच्या सकल आशाआकांक्षा तृप्त होऊन इंद्रियांकरवी विषयसेवन घडून शांतता व समाधान लाभणे सुकर होईल. तात्पर्य, इन्द्रियतोषानंतर ईशप्राप्तीचा मार्ग सुगम होण्याची एकप्रकारे शक्यता होते.

**इन्द्रं वोतान्यं न पृथङ् मन्ये मायाभिरिद्भुवान् ।।**
**पुरुरूप इतीक्षे त्वममित्राँ सुषहान्कृधि ।। ३१ ।।**

अर्थ :– हे देवाधिदेवा ! यदर्थ सर्व कामना परिपूर्ण करण्यास सोमप्रिय इंद्र आहे तर त्यालाच बोलवावे, तुला बोलविण्याचे कारण नाही असे तुला वाटत असेल; तर आमचे असे म्हणणे आहे की, देवराज इंद्र, वायू किंवा अग्नी इत्यादि देवता तुझ्यापासून निराळ्या नाहीत. याचे कारण मायेने ईश्वर पुष्कळ रूपे धारण करतो, असे श्रुतिवचन आहे. याकरिता आमच्या शत्रुरूप काममोहादिकांचा, बहुरूपी असलेल्या अशा तू नाश कर किंवा ते शत्रू आम्हास सुसह्य होतील असे कर. त्यामुळे शत्रूंचा त्रास आम्हास होणार नाही.

**यज्ञा यज्ञाधीश सर्वे त्वन्मया अपि तेषु नः ।।**
**जपयज्ञो मतस्तेन समु पूष्णा गमेमहि ।। ३२ ।।**

अर्थ :– हे यज्ञाधीशा देवा ! "दैवमेवापरेयज्ञं" इत्यादि (१२) यज्ञ आहेत. ते सर्व तुझेच स्वरूप आहेत; परंतु त्या सर्व यज्ञात

जपयज्ञ अधिक व आम्हास मान्य असा आहे. "यज्ञानां जपयज्ञोऽस्मि" या वचनाने अखिल यज्ञ म्हणजे तुझीच विभूती ( स्वरूप ) आहे, असे वर्णिले असले; तरी पण इतर यज्ञ अनात्मव्यापार उत्पन्न करणारे व अन्य गोष्टी निर्माण करणारे असतात. जपयज्ञाने मात्र मनाची परिपक्वता करून आत्मस्वरूपाची अभिव्यक्ती (ओळख) करविण्यास मदत होते. "श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः" या वचनानुसार सृष्टी, स्थिती व लय यांपासून तू जगताचे रक्षण व पालन करतोस. याकरिता तत्पदलक्ष्य अशा तुझ्याशी त्वंपदलक्ष्य असे आम्ही एकरूप होतो. तात्पर्य, जपयज्ञाने तुझे सत्यस्वरूप आम्हास मिळावे.

स्तुषे नराप्यं तुष्टः सन्नथो यस्या अयोमुखम् ।।
मायां जित्वा भवान्तां मे विश्वाहा शर्म यच्छतु ।३३।

अर्थ :– हे देवा! मानवांनाच मिळविण्यास योग्य अशा भगवान् नारायणाची आम्ही स्तुती करतो. त्यायोगे तुझी कृपा होईल. तू प्रसन्न झाल्याने, लोखंडाप्रमाणे जिचे तोंड कठीण व भयंकर आहे अशा मायेचा जय करता येईल हे देवा ! तू आमचे आत्यंतिक कल्याण कर व ज्ञानानंद देऊन सुखी कर.

जुषस्व स्तोममीशैते प्रियासः सन्तु सूरयः ।।
वयं स्तोमप्रियानेन यच्छा नः शर्म दीर्घश्रुत् ।। ३४ ।।

अर्थ :– हे ईशा ! तू आमच्या या स्तुतीचा स्वीकार कर. ( श्रवण कर ) हे स्तुतिप्रिया ! तुझी स्तुती करणारे माझ्यासारखे तुला प्रिय होवोत. तुझी स्तुती करून आम्ही सुद्धा तुला प्रिय होऊच. जरी तू आमच्यापासून भिन्न व दूरस्थित आहेस तरी आम्ही केलेली

स्तुती तुला ऐकू येईलच; कारण तू दूरचेही ऐकणारा ( दीर्घश्रुत ) आहेस. याकरिता आमची स्तुती ऐकून आमचे उभयत्र सत्वर कल्याण कर. तुझ्याविना आमचे कल्याण होणार नाही.

**उग्रो जज्ञे मृत्युरयमदुग्धा इव धेनवः ।**
**धियो मेऽनेनेदृगीश न जातो न जनिष्यते ।। ३५ ।।**

अर्थ :– हे श्रीदत्ता ! माझ्या मनामध्ये जो प्रमादरूप ( अनवधानता ) काळ उत्पन्न झाला आहे तो फारच भयंकर आहे. त्यांनी माझी बुद्ध्यादि इंद्रिये ( इंद्रियरूपि गाई ) निष्क्रिय व निष्फळ बनविली आहेत. ज्याप्रमाणे नुकत्याच प्रसूत झालेल्या गाई, अर्थात् तरुण धेनू दूध देत नाहीत (त्या जशा निरर्थक असतात) त्याप्रमाणे माझी गात्रे निरुपयोगी झाली आहेत. प्रसिद्ध महामृत्युपेक्षाही प्रमादमृत्यू महाभयंकर आहे. याच्यापेक्षा दुसरा कोणीही भयानक घात करणारा असा झाला नाही व पुढेही होणार नाही; कारण मृत्यू देह आणि प्राण यांचाच वियोग करतो. परंतु हा प्रमादरूप मृत्यू मात्र जीवनभूत अशा तुझ्याशी अनवधानतेने वियोग करतो. तात्पर्य, अनवधानता दोषामुळे सन्निध अशा जीवशीवाचे ज्ञान होत नाही. ही फारच भयंकर व मृत्यूवर मात करणारी हानी आहे.

**प्रब्रह्मैहीदमाकर्ण्योर्वारुकमिव बन्धनात् ।।**
**मृत्युंजय प्रमादाख्यान्मृत्योर्मुक्षीय माऽमृतात् ।। ३६ ।।**

अर्थः – हे भगवन् ! आपण वर केलेली स्तुती ऐकावी व माझ्या समीप यावे. ज्याप्रमाणे पिकलेले फळ देठापासून आपोआप गळून पडते त्याप्रमाणेच हे मृत्युंजया ! प्रमादरूप मृत्युपासून माझी सुटका कर व अमृतस्वरूप मोक्ष दे; कारण अभ्युदय आणि नःश्रेयस् अशा या दोन्ही फलापासून मी भ्रष्ट होता कामा नये.

भावार्थं, मला निरतिशय सुख मिळून कृतार्थता व धन्यता मिळाली पाहिजे.

**यदद्य वर्ष्म तेनैव पश्येम शरदः शतम् ॥**

**स्तोत्राय ते हते मृत्यौ जीवेम शरदः शतम् ॥३७॥**

अर्थ :– हे देवा ! आम्ही करीत असलेल्या व केलेल्या या तुझ्या स्तोत्रामुळेच आमचे शरीर आम्ही १०० वर्षे पूर्णपणे पाहू शकू. हे शरीर क्षणभंगुर व मृत्यूने नाश पावणारे असे जरी आहे; तरी सुद्धा मानव देहाची सार्थकता म्हणून तुझ्या स्तुतीसाठीच केवळ १०० वर्षे जिवंत राहूच. इतर कोणत्याही गोष्टींनी मानवजन्म सफल होत नाही व मानवजन्मीच तुझे स्तवन घडणार आहे. अन्यत्र नाही.

**प्रत्युत्तमं महेश त्वां मनामह इहागहि ॥**

**मृळा सुक्षत्र मृळय मा नो दुःशंस ईशत ॥ ३८ ॥**

अर्थ :– हे महेशा ! तू उत्तम आहेस, म्हणूनच तुझ्याकडे मी प्रार्थना करून याचना करीत आहे. तू मला दर्शन दे हे सुक्षत्रा ! ( महाबलिष्ठा ! ) आम्हाला सुखी कर व दुर्जनांनी आमच्यावर केलेले शापप्रयोगादि निष्फल होवोत, हीच आमची तुझ्याजवळ सतत प्रार्थना आहे.

**तिस्रो वाचस्तेऽत्र वरां क ईशानं न याचिषत् ॥**

**भक्त्या गृणीमस्त्वां स्तोत्रैस्तेभिर्नस्तूयमागहि ॥३९॥**

अर्थ :– हे देवा ! तुझी कृपा मिळविण्यासाठी क्रिया, भक्ती व ज्ञान या तीन प्रकारच्या वाणीचा उपयोग होतो. त्यांपैकी सुलभ अशा भक्तिरूप वाणीचा उपयोग कोण करणार नाही ? सर्वच करणार. भक्तिस्तोत्रांनीच आम्ही तुझे ग्रहण करतो. तू लवकर आमच्या सन्निध ये आणि आमच्यावर अनुग्रह कर.

**दूराद्विहाय सर्वं त्वामृषयो ये च तुष्टुवुः ॥**
**मर्ता अमर्त्यस्य ते तद्भूरि नाम मनामहे ॥ ४० ॥**

अर्थ :– हे प्रभो ! प्राचीन ऋषी योग, तप, यज्ञादि कर्मे जपादि अनुष्ठाने करण्याचे सोडून केवळ भक्तीने तुझे स्तवन करतात, म्हणून मर्त्य असे आम्ही संसारधर्मवर्जित अशा तुझेच नामस्मरण बव्हशी करतो; कारण तुझे नामस्मरण अनादि व विस्तीर्ण संसाराच्या नाशास कारणीभूत होते. ते सांसारिक विषयनाशास पूर्णपणे समर्थ असेच आहे. संसारी जीवांना नामस्मरण हाच एक सुलभ, सर्वत्रसाध्य व सर्वावस्थेत योग्य असा तरणोपाय आहे.

**य इन्द्र त्वं यो नमसा स्वध्वरो हीति संस्तुतः ॥**
**इन्द्रो ब्रह्मेन्द्र ऋषिरित्युप ब्रह्माणि नः श्रुणु ॥४१॥**

अर्थ :– हे देवा ! " नमस्कारेणैवशोभनोऽध्वर: " इत्यादि वेदवाक्यांनी ( स्तोत्ररूपांनी ) तुझी आम्ही स्तुती केली आहे. तूच इन्द्र, ब्रह्मा व प्रजापती आहेस. याकरिता आमची स्तुती ऐक आणि आमच्या सन्निध राहा.

**वयमु त्वा वरं देवमस्मभ्यं शर्म सप्रथः ॥**
**मनामहे पृणन्तं तदभित्वामिन्द्र नोनुमः ॥ ४२ ॥**

अर्थ :– हे देवा ! तूच अखिल जगतांचा विस्तार करणारा आहेस असेच आम्ही समजतो. तूच सर्वकल्याणकारी, श्रेष्ठ, शूर व प्रसिद्ध आहेस. यामुळेच प्रामुख्याने तुझीच स्तुती आम्ही करीत आहोत. इतरांची स्तुती करीत नाही.

**प्रकृतान्यपि सूक्तानि श्रुण्वन्तम् जातवेदसम् ॥**
**त्वां गृणन्ति न के त्वं हि येषामिन्द्रो युवा सखा ।४३।**

अर्थ :- हे देवा ! आम्ही करीत असलेली प्रस्तुत स्तोत्रे तू प्रेमाने ऐकत आहेस अशीच आमची समजूत आहे. त्यामुळे आमच्या सन्निध तुझे वास्तव्य झाले आहे. मग आमच्या इतक्या जवळ तू असताना कोणता समंजस माणूस तुझे ज्ञान ग्रहण करणार नाही ? तुझे ज्ञानग्रहण करणाऱ्या अशा आम्हा सर्वांचा तू नित्य जिवलग मित्र आहेस. तूच भवतारक आहेस.

त्वावतः पाहि नो मर्त्यान्यत इन्द्र भयामहे ॥
आदिश्य पदभक्ति ते ततो नो अभयं कृधि ॥ ४४ ॥

अर्थ :- हे देवा ! आम्ही सर्वजण तुझे स्तुतिपाठक आहोत. आम्ही मर्त्य ( मरणधर्माचे ) आहोत. आमचे सर्वत्र रक्षण कर; कारण हे श्रीदत्तात्रेया ! आम्ही संसाराला अतिशय भ्यालो आहोत. संसार हा महाभयप्रदच आहे. आम्ही तुझ्या चरणकमलांची निःसीम भक्ती करीत आहोत. ती ध्यानी घे आणि आम्हास संसारापासून निर्भय कर. तात्पर्य, जेणेकरून आम्हास कोठूनही भय राहणार नाही असे कर.

आ त्वा रथं न तुरगैः स्तोत्रैस्त्वा वर्तयामसि ॥
स त्वं न इन्द्र मृळय यस्य ते स्वादु सख्यमित् ॥४५॥

अर्थ :- हे देवा ! ज्याप्रमाणे घोड्यांच्या साहाय्याने सारथी रथाला वाटेल तसे वळवितो त्याप्रमाणेच स्तोत्रसामर्थ्याने तुला ( तुझी कृपादृष्टी ) आम्ही यथाभिमत ( पाहिजे तशी ) वळवू शकतो. याकरिता तू आम्हास सुखी कर; कारण तुझी मैत्री अतिशय गोड व हितकर अशी आहे. तुझ्या भक्तीमुळेच मोक्ष मिळू शकतो. याकरिता तू आम्हास सर्व प्रकारांनी सुखी ठेव.

**आ प्रबोधं भवोऽबोधः स्वप्नवद्दुःखदोऽशुचिः ॥**
**पतितान्दुःखितान्नृन्नः पाहि त्वं श्रृणुधी गिरः ॥४६॥**

**अर्थ :–** हे देवा ! निर्मळ व सत्य ज्ञान झाल्यानंतर संसार आणि तज्जन्य सुखदुःखे राहात नाहीत. हे जरी खरे आहे तरी संसार हाच मुळी ज्ञानविरोधी आहे. त्यामुळेच संसारी जीवांना लवकर ज्ञानबोध होत नाही. मुळातच संसार हा दुःखपर्यवसायी, अपवित्र व केवळ सुखाभास निर्माण करणारा असाच आहे. याकरिता संसारात पडलेल्या अशा आमचे तू रक्षण कर. तू भवतारक आहेस. तू आमची स्तोत्ररूपवाणी प्रसन्न अंतःकरणाने श्रवण कर.

**इंद्राय साम ते गातुं न क्षमो नाम ते गृणे ॥**
**बण्महाँऽअसि सूर्य त्वं सत्रादेव महाँऽअसि ॥ ४७ ॥**

**अर्थ :–** हे इन्द्ररूपी देवा ! तुझे गायन सामवेदांनी करणे आम्हास शक्य नाही म्हणून आता आम्ही तुझे केवळ नामस्मरणच करीत आहोत. हे सूर्यदेवा ! तू खरोखरीच फार मोठा आहेस. तूच जगताची प्रेरक शक्ती आहेस. तात्पर्य, सर्वजगताची अंतर्यामी प्रेरक शक्ती तुझेच स्वरूप आहे. हिरण्यगर्भरूपाने तूच जगतात आहेस.

**सोमः पुनानोन्तारामो मया त्वं नाधिलक्षितः ॥**
**ईक्षे तुच्छान्बहिर्भोगान् योषा जारमिव प्रियम् ॥४८॥**

**अर्थ :–** हे प्रभो ! अंतर्हृदयात आराम करून तू राहिला आहेस. तू केवळ आत्मविद्याच आहेस; परंतु येवढ्याजवळ असूनसुद्धा तुला मी पाहू शकत नाही; कारण मी तुच्छ अशा बाहेरच्या भोगांच्या नादी लागलो. ते विषय क्षणभरच सुखदायी वाटतात व त्यामुळे मी पराधीन बनतो. ज्याप्रमाणे तरुण कामिनी स्त्री आपल्या पतीला

सोडून जाराकडे धावते त्याप्रमाणे मी परतंत्र होऊन विषयांकडे धाव घेत आहे व दु:खी होत आहे,

प्रण इन्दोरपि स्मेरं रूपं ते दर्शयामलम् ॥
नृन्स्तोतृन्पाह्यहंसो नो जहि रक्षांसि सुक्रतो ॥ ४९ ॥

अर्थ :– हे परमेश्वरा ! चंद्रापेक्षाही अधिक तेजस्वी आणि अतिपवित्र असे तुझे रूप तू आम्हास दाखव; कारण आम्ही तुझी नित्य स्तुती करीत आहोत. पापापासून आमची सोडवणूक कर. हे सुक्रतो ! शोभनप्रज्ञा ! आम्हास समूळ भक्षण करणारे काम-मोहादि क्रूर राक्षस यांचा तू मूलतः नाश कर. काममोहामुळे परतंत्र झालेल्या अशा आमचे तूच रक्षण करणार आहेस.

हि न्वन्ति द्वैतमस्त्यस्माद्भूयं विन्दति मामिह ॥
यदन्ति दूरके यच्च पवमान वि तज्जहि ॥ ५० ॥

अर्थ :– हे देवा ! आमच्या सभोवार द्वैताचा पसारा फारच झाला आहे. त्यापासून आम्हास अतिशय भय वाटते. “ द्वितीयाद्वैभयं भवति ” असे शास्त्रवचन आहेच. हे जे आमचे सन्निध्र ठाण मांडून बसलेले आभासस्वरूप व तिरस्करणीय असे भय ( द्वैतभय ) त्याचा तू सत्वर नाश कर. संसारभीती अतिशय दूर असली तरीसुद्धा तिच्यापासून साधकांना फारच मोठा धोका उत्पन्न होण्याची शक्यता असते. याकरिता दूर अथवा जवळ असलेले संसारभय मुळासकट नाहीसे कर; कारण ते अपवित्र आहे व तू मात्र पवित्र आहेस.

धर्ता कारकशक्तीनां सर्वेषां त्वमिहैक इत् ॥
यशोऽत्रेदं पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते ॥ ५१ ॥

अर्थ :– हे देवा ! जगातील अखिल कारकशक्तीचा धारणकर्ता तूच एक आहेस. याकरिता सुखदु:खादि द्वैतविकारांनी भीतिमत झालेल्या अशा लोकांना संसारसंकटातून तुझ्याविना दुसरा कोणीच रक्षणकर्ता नाही. हे वेदपालका परमेश्वरा ! याकरिता तूच भक्तोद्धारक व तारक आहेस. अशा प्रकारचे तुझे यश अवनीतलावर विस्ताराने प्रसिद्ध पावले आहे.

असर्जि भवता विश्वमनित्यमवशं बृहत् ॥
त्वं संस्मर ज्ञ शरण वत्सं जातं न धेनवः ॥ ५२ ॥

अर्थ :– हे भगवंता ! तूच हे जडाजड स्वरूप, अनित्य, परतंत्र आणि अतिशय विस्तारात्मक ब्रह्मांड उत्पन्न केले आहेस. कर्मफल जाणणाऱ्या हे ईश्वरा ! तूच आमचा शरण्य व भक्तरक्षक आहेस. याकरिता ज्याप्रमाणे नूतनोत्पन्न वत्साचे गाई सतत स्मरण ठेवतात त्याचप्रमाणे आमचेही स्मरण तुझ्या चित्तात सतत ठेव व आमच्यावर प्रेम कर.

पुरोजितीश भो भूमन्तत्र माममृतं कृधि ॥
यत्रानन्दाश्च मोदाश्च मुदः प्रमुद आसते ॥ ५३ ॥

अर्थ :– हे त्रिपुरनाशका गिरिजापते ! हे जगद्व्यापका ईशा !! पितृलोकात पितरांना मिळणारे आनन्द, देवलोकात देवांना मिळणारे आनंद, इन्द्रलोकात इन्द्राला मिळणारे आनन्द, ब्रह्मलोकात ब्रह्मदेवाला मिळणारे आनन्द, ते सर्वच्या सव म्हणजे ब्रह्मानंद, मोद, प्रमोद, आनंद व परमानंद आम्हास दे आणि आम्हास अमर कर.

अयं स इति विद्वान्त्सन्यमाय धृतवद्धविः ॥
कुतो जुहोम्यतोऽदेवा यमाय जुहुता हविः ॥ ५४ ॥

अर्थ :– हे दत्तात्रेया ! हा जो देहान्तर्यामी आत्मा आहे तोच तू ईश्वर आहेस. व्यतीहार न्यायाने दोघेही अखंडैकरस असे एकरूपच आहेत. हे सर्व मी जाणतो. मग मी ज्याप्रमाणे अग्नीमध्ये घृताहुती घालावी त्याप्रमाणे माझा देह यमाला हविर्भागाप्रमाणे कां बरे देईन ? देणार नाहीच; कारण ज्ञानोत्तर उत्क्रांती होत नाही. त्यामुळे देहांतर संबंध राहात नाही. केवळ ज्ञानविरहित लोकच आपल्या देहाची आहुती यमास देतात. "जायस्व म्रियस्व" असे श्रुतिवचन आहेच.

**निवर्तध्वमितो देवा भद्रं नो अपि वातय ॥**
**मनो हरे मां पाह्यार्तं पिता पुत्रमिव प्रियम् ॥ ५५ ॥**

अर्थ :– हे देवांनो ! याकरिता आमची ज्ञानकर्मेंद्रिये व मन, तुच्छ व अशुची अशा विषयांपासून परावृत्त करा. हे हरे ! तू आमचे संसारदुःख नाहीसे कर. आमचे कल्याण व मंगल साधणाऱ्या मनास योग्य गती दे. मनाच्या गतीने आमच्या शुभ कार्यांत बाध नसावा. आम्हास तुझे स्तोत्रगायन करण्यास प्रेरणा दे. माझे काही प्रारब्धभोग अद्याप शिल्लक आहेत व मी तुझा बालक आहे. तू पिता आहेस. पुत्रवत्सलतेने माझे रक्षण कर व तुझे कृपाछत्र दे.

**प्रमा प्रमाता प्रमेयं त्रिपुटीह न विद्यते ॥**
**रूपं तेऽविकृतं सत्वं मधुमन्मे परायणम् ॥ ५६ ॥**

अर्थ :– भो प्रभो ! प्रत्यक्षादि दृश्य वस्तुजात प्रमाता, जीवस्वरूप प्रमेय व प्रत्यगात्मस्वरूप अशा प्रकारची त्रिपुटी तुझ्या स्वरूपात नाही; कारण तुझे रूप अखंड असेच आहे. अशा प्रकारचेच तुझे स्वरूप सर्व विकाररहित असते; कारण तू परमात्मस्वरूप

आहेस. ते स्वरूप सुंदर आहे आणि तेच माझे परम वास्तव्यस्थान व निरतिशयानंद स्वरूप आहे.

**प्रहोतारोऽत्रैव मनोन्वाहुवामह इत्यतः ।**
**गमादि मनसो नास्य यो यज्ञस्य प्रसाधनः ॥ ५७ ॥**

अर्थ :– हे देवा ! ईशस्वरूप पूर्वश्लोकातील वर्णनाप्रमाणेच आहे. कशावरून ? अभिचारादिकांच्या योगाने आपल्या मृत सुबंधूचे मन इतर बंधू आप्त वगैरे जाणतात; कारण गमादि सर्व प्रकार मनाचेच आहेत. यज्ञाचे आत्यंतिक उपयुक्त साधनभूत असलेल्या आत्मस्वरूपाच्या ठायी गमादि प्रकार नसतात असे आचार्यांनी शत-श्लोकी ग्रंथात वर्णिले आहे. "नायाति प्रत्यगात्मा," "आसीत्पूर्व सुबंधुरिति" हेच ते दोन श्लोक होत.

**ये यज्ञेनार्चन्त्यनेन सर्वे नन्दन्ति ते त्वया ॥**
**नान्येऽतस्त्वत्प्रिया एव विरूपासो दिवस्परि ॥ ५८ ॥**

अर्थ :– हे प्रभो ! जे लोक अशा प्रकारच्या ज्ञानयज्ञानी तुझे अर्चन करतात तेच लोक तुझ्या स्वरूपी एकरूप होऊन परमानंदात निमग्न असतात. अर्थात् इतरांना तो आनंद मिळत नाही. याचे कारण ते बहिर्मुख असतात. यामुळेच ज्ञानी तुला प्रिय होतात; कारण ते तुझ्या स्वयंप्रकाशरूपात स्वतःचे नामरूप विसरून तन्मय झालेले असेच असतात.

**देवानां नु वशे योऽस्य सुमङ्गलीरियं वधूः ॥**
**स्नेहेषु त्वच्च्युतो भोगी पतिर्बन्धेषु बध्यते ॥ ५९ ॥**

अर्थ :– हे ईश्वरा ! जो देवांच्या विषयी बहिर्मुख झाला आणि इंद्रियांच्या पूर्ण स्वाधीन झाला तो, त्याची स्त्री अशुची असली

तरी तिला तो मंगलस्वरूपच समजतो; कारण भोगी मनुष्य स्वस्त्रीच्या ठायी अत्यंत आसक्त असतो. त्यामुळे तो सच्चिदानंद अशा ईश रूपापासून भ्रष्ट होतो; कारण पतिरूपाने स्वस्त्रीचा भोग घेण्यास काहीच प्रत्यवाय नाही असे तो समजतो आणि तत्संबंधी अभिमानी बनतो. नंतर प्रेममय बंधनाने पूर्ण बद्ध होतो. अशा लोकांना मोक्ष मिळत नाही; कारण लाकूड व लोखंड यांच्या पाशाने बद्ध झालेला पुरुष केव्हा तरी अदृष्टवशात् मुक्त होण्याची शक्यता असते; परंतु प्रेमपाशात सापडलेला मात्र मुक्त होण्याची शक्यता नसते असे, गरुडपुराणात स्पष्ट म्हटले आहे.

**विहितं सर्वमित्ते त्वमतो ज्यायांश्च पूरुषः ॥**
**पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ।६०।**

अर्थ :- हे पुरुषस्वरूपी देवा ! भूतकाळ, वर्तमानकाळ व भविष्यकाळ हे तुझ्याच एका अंशापासून उत्पन्न झालेले आहेत. जगत् हा तुझाच एक अंश आहे असे श्रुतिवचन आहे. अचर, चर व चराचर भूते हे तीन पाय तुझेच आहेत. तू त्रिपाद आहेस. प्रकाशमान अशा स्वरूपप्राप्तीने अमृत म्हणजे मोक्ष मिळतो. तू जरी निरंश आहेस; तरीसुद्धा तुझ्या ठिकाणी अंश कल्पना करतात, हे सुप्रसिद्ध आहे. निरंश व पूर्णांशाचे ठायी अंश कल्पना करूनच मानवाचे हित करणारी श्रुतिमाता द्वैतभाषेनेच उत्तर देते, अशा प्रकारचे विद्वानांचे मत आहे.

**हये जाये इति वदन्या सालावृकहृत्समा ॥**
**तन्मयो न स वेदामुमात्मानं तव पूरुष ॥ ६१ ॥**

अर्थ :- हे देवरूपी पुरुषा ! स्त्रिया म्हटल्या म्हणजे त्या लांडग्याप्रमाणे निर्दयच असतात म्हणून स्त्रियांची मैत्री कोणाशीच नसते.

अशा स्त्रियेला हे हये ! जाये ! हे असे संबोधणारा पुरुष स्त्रैण बनतो व स्त्रीपाशात अडकतो. त्यामुळे साक्षात् सन्निध असलेल्या अशा तुला तो ओळखत नाही व आत्मज्ञानापासून वंचित होऊन राहतो.

**उभा उपाधितोऽत्रैकः पाकेन मनसान्तितः ।।**

**त्वां यदीक्षेत तं माता रेहि्ळ स उ रेहि्ळ मातरम् ।।६२।।**

अर्थ :– श्रीदत्ता ! असे जर आहे तर मग तुझ्या स्वरूपास कोण जाणतो बरे ? ईश्वर एकच आहे; पण उपाधिमुळे तो भिन्न वाटतो. श्रीसद्‌गुरूंची उपासना करून ज्यांचे अंत:करण परिपक्व बनले तेच अभयरूपानें तुला ओळखतात. नंतर त्यांची मायोपाधी नाश पावते. इतर लोक मात्र अविद्येने गुरफटल्यामुळे तुझे अभेद स्वरूप ओळखीत नाहीत.

**तदिदात्मन्हृदि वपुः पश्यन्तस्ते मनीषया ।।**

**मुनयो वातरशनाः पिशङ्गा वसतेऽमलाः ।। ६३ ।।**

अर्थ :– हे आत्मरूप देवा ! अशा प्रकारचे तुझे अभेदस्वरूप मनीषी लोक सात्त्विक अंतःकरणात पाहतात व साक्षात् अनुभवतात. असे साक्षात्कारी मुनी दिगंबर असतात हे खरे आहे. ते स्नानादि नित्य विधीतून मुक्त झालेले असतात. अंगाला राख माखून राहातात. जरी ते मलीन असले तरीही इतरांचा मल नाहीसा करतात.

**त्यं चिन्मयं बुधा रूपं संजानाना उपासते ।।**

**यो अस्य पारे रजसः स नः पर्षदति द्विषः ।। ६४ ।।**

अर्थ :– हे चिन्मया देवा ! ज्ञानी लोक चिदेकरसस्वरूप अशा तुझ्या स्वरूपास वेदांताभ्यासानें जाणतात. वेदांतप्रतिपाद्य अशा

तुझ्या अभिन्न स्वरूपाची ओळख ठेवून उपासना करतात. जो रज व तमोगुणातीत आहे अशा आत्मस्वरूपाचे हे रजतम वैरी आहेत. अशा शत्रूलाही ओलांडून ज्ञानी लोक जातात व अभिन्न अशा आत्मस्वरूपाशी तन्मय होऊन राहतात.

इषे त्वोर्जे चौदनेन नित्यहोमेऽपि गव्यतः ॥
यजन्त्यहं त्वकामस्त्वां श्रेष्ठतमाय कर्मणे ॥ ६५ ॥

अर्थ :– भो यज्ञदेवा ! हवन करणाऱ्या यजमानास वृष्टी व अन्नादि यांची जरूरी असतेच. याकरिता वृष्टी व धान्योत्पादक अशा तुझ्याकरिता यजमान गाईच्या तुपाने तुझे हवन करतो. होम हा घृताने, पयाने व यवागूने करावा असे सांगितले आहे. नित्यहोम सकाम कर्मासाठी आहे; परंतु अजिबात कर्म न करण्यापेक्षा सकाम कर्म करणे श्रेष्ठ आहे त्याहीपेक्षा निष्काम कर्म अधिक श्रेयस्कर आहेच; परंतु मी मात्र नैष्कर्म्यसिद्धीकरिता यजन करतो.

अग्न आयाहीति गातुं त्वाऽक्षमः स्तौमि केवलम् ।
निषीद मे हृदि यथा निहोता सत्सि बर्हिषि ॥ ६६ ॥

अर्थ :– हे अग्निरूप ईश्वरा ! तूं माझ्यासमीप सत्वर यावेस. सामवेदाने तुझे गायन करण्यास मी असमर्थ आहे. त्यामुळे केवळ लौकिक वाणीनेच मी तुझी स्तुती करतो. ज्याप्रमाणे यज्ञात स्तुती केल्यावर तू होतृरूप घेऊन उपविष्ट होऊन राहतोस त्याचप्रमाण सात्त्विक अशा माझ्या हृदयात वास्तव्य करून राहा, हीच प्रार्थना.

शं नो देवीः प्रसादात्ते सन्तु धीवृत्तयोऽनिशम् ॥
आत्मप्रवाहाः स्वारस्याच्छंयोरभिस्रवन्तु नः ॥ ६७ ॥

अर्थ :– हे आत्मदेवा ! अंतरात्मस्वरूप अशा तुझ्या प्रकाशमान

बुद्धिवृत्ती आणि त्या वृत्तींचा प्रवाह माझ्या मनात सतत निश्चल असावा; कारण त्या योगे दुःखाचे मिश्रण नसलेले असेच सुख मला मिळेल. रोगांचे शमन होईल. स्वात्मस्वरूपाविषयी आस्था निर्माण होईल. तुझ्या स्वरूपाचा निदिध्यास लागेल अर्थात् विपरीत भावनांचा लयही होईल.

**ज्ञातेस्मिन्पाशमुक्तिः सकलविदिति तत्स्यादनिर्देश्यमेकं**
**सूक्ष्मं चातीन्द्रियं सत्तदयमिति गिरा शाब्दनिर्देश्यमेव ।।**
**वाक्यैस्तत्त्वंविरोधेऽपि सति सुमतिभिः सोऽयमित्यादिवत्तद्-**
**भागत्यागेन लक्ष्यं वरगुरुकृपया लभ्यमैक्यं हि तज्ज्ञैः ।।६८।।**

अर्थ :– हे श्रीसद्गुरो ! स्वयंप्रकाश अशा आत्मस्वरूपाचे ज्ञान झाल्यावर यजन करणाऱ्यास अविच्छिन्नैकरस असा मीच आहे असे ज्ञान होऊन तो सर्वज्ञ होतो. सकल वेत्ता होतो. त्यावेळी एकच आत्मरूप सजातीय भेदशून्य, सादृश्य व उत्पत्तिरहित, उपमान-प्रमाणाचा अविषय, अतीन्द्रिय, शब्दाने अज्ञात, स्पर्शरहित, रूप नसलेला, सन्निकर्ष षटकजन्य सहा प्रमाणांनी ज्ञात न होणारा, उत्पन्न होणाऱ्या अग्निरूपाप्रमाणे, अनुमानाने सिद्ध न होणारा (अर्थात्, प्रत्यक्ष, अनुमान, शब्दादि तीनही प्रमाणाचा विषय न होणारा) अशा आत्मस्वरूपाचे स्वचित्तात स्फुरण होते; कारण तो कालत्रयातीत असाच आहे. कोणत्याही साधनाने आत्मरूपाचे ज्ञान करवून देता येत नाही; तर मग त्या स्वरूपाचे ज्ञान तरी कसे होणार ? अशी शंका घेऊन ग्रंथकार उत्तर देतात, " तत्त्वमसि, " "अयमात्मा परब्रह्म " इत्यादि वेदरूप वाणीच्या साहाय्याने व तत्त्वं-पदार्थाची इतर वाक्ये, आप्तवाक्ये, यांच्या मदतीने एकात्मस्वरूप ईश्वराचा बोध होतो. जरी तत्त्वंपदार्थात अपरोक्षत्व, परोक्षत्व असा

विरोध असला तरीसुद्धा लक्षणाज्ञान असलेल्या बुद्धिवान् विद्वानांनी "सोऽयं देवदत्तः" या वाक्यातील भागत्यागाप्रमाणे विरुद्ध वाच्यांशत्याग, अविरुद्ध वाच्यांशग्रहण करून व गुरुकृपेने श्रवण मनन इत्यादींचा योग्य अभ्यास करून एकच अखंडैकरस असे ईश्वरस्वरूप समजून घ्यावे. तर्कज्ञानाचा येथे उपयोग होणार नाही. श्रीसद्‌गुरूपदेशाने व अभ्यासाने ईश्वरप्राप्ती असाध्य नाही.

।। इति श्रीमद्दत्तात्रेयपुराणे सार्धत्रिसाहस्त्र्यां त्रिकाण्डमण्डितायां संहितायां वासुदेव्यां प्रथमाष्टके ज्ञानकाण्डे वेदपादस्तुतिर्नाम प्रथमोऽध्यायः ।।

अशा रीतीने राजुरीहून निघून प्रवास करीत करीत श्रीस्वामीमहाराज फाल्गुन शुद्ध पौर्णिमेला दुधना व पूर्णा या नद्यांच्या संगमावर आले. तेथे स्नान करून पिंपरीमार्गे आवंढ्या नागनाथाला गेले. आवंढ्या नागनाथ हे बारा ज्योतिर्लिंगांपैकी श्रीशंकराचे एक प्रमुख स्थान आहे. येथे जवळच श्रीस्वामीमहाराजांनी पूर्वी स्थापन केलेले एक श्रीदत्तमंदिर आहे. येथील दोन्ही देवतांना नमस्कार करून श्रीस्वामीमहाराज पुन्हा पिंपरीवरून उटी या गावी आले. या गावी श्रीअगस्ती ऋषींचा आश्रम असल्यामुळे या गावास "अगस्तीतीर्थ" असेही म्हणतात. श्रीक्षेत्र कुरवपूर येथे असताना हरद्याचे श्री. वामनराव यांना उटी गावी रुद्रस्वाहाकारासाठी उपस्थित राहण्याचे श्रीस्वामीमहाराजांनी कबूल केलेले असल्यामुळे ते उटी गावी आले होते.

श्री. वामनराव यांच्या मनात जरी रुद्रस्वाहाकार करावयाचे असले तरी त्यांच्या नातलगांना ही गोष्ट पसंत नव्हती. खुद्द त्यांचा मुलगाही या गोष्टीला संमत नव्हता. "वामनराव वेडा आहे," असे सांगून "हा स्वाहाकार त्यांच्या मुलाच्या हातून

करावा," असे त्यांच्या नातलगांनी सुचविले होते; परन्तु श्री. वामनराव यांच्या मित्रमंडळींना ही गोष्ट आवडली नाही. असे असले; तरी श्री. वामनरावांनी श्रीस्वामीमहाराजांना अशी प्रार्थना केली की, "स्वाहाकाराची सर्व तयारी मी करतो. आपण फक्त श्रीगांडामहाराजांना बरोबर घेऊन स्वाहाकाराला उपस्थित राहावे म्हणजे त्यात सर्व आले. आपण या यज्ञाला आलात की, श्रीगंगादि-सकल तीर्थे, सकल संतमहात्मे व पुण्यपुरुष, सकल शुभ मुहूर्त आणि निखिल ब्रह्माण्डातील सकल देवदेवतादि सर्वकाही उपस्थित झाले आहेत असे होणार आहे. प्रभो ! आपली उपस्थिती म्हणजे साक्षात् श्रीदत्तप्रभूंचीच उपस्थिती आहे याची मला खात्री आहे." श्री. वामनरावांची ही अपरपार श्रद्धाभक्तिपूर्ण व संपूर्ण शरणा-गतीपूर्वक केलेली प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराज अत्यन्त प्रसन्न झाले. त्यामुळे हा स्वाहाकार श्री. वामनरावांच्या पैशातून न होता तो देवांच्या पैशातून झाला पाहिजे असे ठरवून श्रीस्वामीमहारा-जांनी देवांच्या खजिन्यान्यातून दोन हजार रुपये देऊन त्यांच्या-कडून त्यांच्याकडून त्यांच्या इच्छेप्रमाणे रुद्रस्वाहाकार करविला. या स्वाहाकाराकरिता श्री. वामनरावांच्या घरचा पैसा खर्च झाला असता; तर या कार्यात त्यांच्या मुलांकडून विघ्न उपस्थित झाले असते.

श्री. वामनरावांनी या रुद्रस्वाहाकाराची एकंदर सर्वच व्यवस्था अत्यन्त उत्तम ठेवली होती. ही सर्व व्यवस्था पाहून श्रीस्वामी-महाराजांना परम संतोष झाला. हा यज्ञ पाहून व श्रीस्वामीमहा-राजांचे श्री. वामनरावांवरील प्रेम पाहून उटी गावाच्या आजू-बाजूला त्यांची कीर्ती सर्वत्र पसरली. त्याचबरोबर श्री. वामन-रावांनी केलेल्या रुद्रस्वाहाकाराच्या निमित्ताने आपल्याला

श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाचा लाभ झाला या भावनेमुळेही त्यांच्याबद्दल सर्व लोकांना मोठी कृतज्ञता वाटू लागली.

श्रीस्वामीमहाराज या प्रांतात संचाराला आल्यावर व त्यांचे परमपवित्र, मंगल व कोमलचरण या भागातील भूमीला लागल्यावर येथील निरनिराळ्या ठिकाणी एकूण वीस स्वाहाकार, अग्निहोत्र्यांचे दोन चातुर्मास्य याग व दोन ठिकाणी श्रीदत्तपादुकांची स्थापना इतकी सर्व धार्मिक कार्ये झाली. या सर्व धार्मिक कार्यांमध्ये श्री. वामनरावांनी केलेला रुद्रस्वाहाकार हा सर्वच दृष्टीने अत्यंत श्रेष्ठ व वरच्या दर्जाचा ठरला. श्री. वामनरावांची श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी जी अतुलनीय व अनुपमेय श्रद्धा व निष्ठा होती त्याचेच फल त्यांना मिळाले, यात काहीच शंका नाही. त्याचप्रमाणें श्रीसमर्थ-रामदासस्वामीमहाराज ज्या ज्या ठिकाणी गेले त्या त्या ठिकाणी त्यांनी ज्याप्रमाणे श्रीमारुतीरायांच्या मूर्तीची प्रतिष्ठापना केली त्या-प्रमाणे श्रीस्वामीमहाराज ज्या ज्या ठिकाणी गेले त्या त्या ठिकाणी त्यांनी श्रीदत्तपादुकांची किंवा श्रीदत्तमूर्तीची प्रतिष्ठापना केली.

श्रीस्वामीमहाराजांचा या भागात संचार चालू असताना वीस संहिता स्वाहाकारादि यज्ञ झाल्याचे वर्णन वर आले आहे. सर्व यज्ञ जरी सामान्य लोकांच्या दृष्टीने स्थूल असले तरी त्यात सूक्ष्मार्थ व परार्थ साठविलेला आहे, हे आपण लक्षात घेतले पाहिजे. या दृष्टीने प्रथम आपण यज्ञाचा स्थूलार्थ पाहू. "वैदिक विज्ञान और भारतीय संस्कृति," या ग्रंथात म. म. गिरिधरशर्मा चतुर्वेदी यांनी हा अर्थ स्पष्ट करताना या ग्रंथाच्या भूमिकेत असे म्हटले आहे की, "वैदिक सृष्टिविद्येच्या दृष्टीने प्रजापती विद्येचे अत्यन्त महत्त्व आहे. या प्रजापती विद्येची अग्निविद्या आणि संवत्सरविद्या अशी दोन रूपे

आहेत. अग्निविद्या किंवा शक्तितत्त्व आणि संवत्सरविद्या किंवा कालतत्त्व या दोहोंच्या एकत्रित रूपाचे नाव यज्ञविद्या असे आहे. वैदिक तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने अग्निविद्या ही अत्यन्त महत्त्वपूर्ण आहे. प्रजापती, ब्रह्म, महाकाल आणि शक्तितत्त्व ही सर्व अग्नीचीच रूपे आहेत. मनूने ज्या तमोभूत, अप्रज्ञात, अलक्षण आणि प्रसुप्त अवस्थेचे वर्णन केले आहे त्याच्या पृष्ठभूमीवरच अग्नीचा जन्म होतो. ज्ञान आणि कर्माची जितकी शक्ती आहे त्या सर्वांचे प्रतीक अग्नी आहे. "अग्निः सर्वा देवताः।," म्हणजे सर्व देव हे अग्निस्वरूप आहेत असे "ऐतरेयामध्ये" म्हटले आहे. खरा प्रश्न हा आहे की, अग्नितत्त्व काय आहे ? खरोखर चुलीत जळणारा आणि लाकडांपासून उत्पन्न होणारा अग्नी हा एखादी देवता आहे काय ? वेदात कोणत्या अग्नीचे वर्णन केले आहे ? याचे उत्तर देताना असे म्हणावे लागेल की, मुळातील सूक्ष्मरूपात आणि विस्तारित रूपात जितकी शक्ती आणि त्याचे भेद आहेत ती सर्व अग्नीचीच भिन्न-भिन्न रूपे आहेत. "एक एवाग्निर्बहुधा समिद्धः।" ज्याचा समिन्धनक असतो अर्थात जो जळत असतो त्याला अग्नी असे म्हणतात. स्थूल लाकडे किंवा समिधा हचा अग्नीच्या जळण्याचे एक प्रतीक आहे किंवा फक्त उदाहरण आहे. याचा अर्थच असा आहे की, जोपर्यन्त वरील प्रकारे कोणत्या तरी माध्यमातून अग्नी प्रकट होत नाही तोपर्यंन्त आपण तो प्रत्यक्ष पाहू शकत नाही. भूतांना क्षर असे म्हणतात आणि त्या क्षराच्या आत निवास करणाऱ्या अक्षराला देव असे म्हणतात. या अर्थानेच श्रीमद्‌भगवतगीतेत "क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १५.१६ ॥ असे म्हटले आहे. (पृष्ठ ७–८)

वेदांमुळे यज्ञ सम्पन्न होतो. यज्ञाच्या द्वाराच सत्याचा विस्तार होतो आणि तिन्ही वेदविद्या सत्यामध्येच राहतात.

आता यानन्तर या यज्ञाचा अर्थात् तदंगभूत अग्नीचा सूक्ष्मार्थ काय आहे तो उपरोक्त ग्रंथाच्या आधाराने पाहू. अग्नी म्हणजे प्राण किंवा जीवन होय, हे सांगताना म. म. श्री. गिरिधरशर्मा चतुर्वेदी असे म्हणतात की, "अस्यवामीय सूक्तात," असे म्हटले आहे की, अक्षरापासूनच क्षराचा जन्म होतो. "ततः क्षरत्यक्षरम्" अर्थात् देव किंवा शक्तीपासूनच भूतांची निर्मिती होते. या अक्षर किंवा देवतत्त्वाची अभिव्यक्ती तीन रूपात होत राहते. एक वृक्ष-वनस्पतींच्या रूपाने, दुसरी पशु-पक्षांच्या रूपाने आणि तिसरी मानवाच्या रूपाने ही उत्पत्ती होते. या तिन्हींमध्ये जे शक्तितत्त्व आहे त्याला प्राणाग्नी असे म्हणतात. प्राण किंवा जीवन हे चैतन्याचेच रूप आहे. हे चैतन्य विश्वातील सर्वात् महान् असे रहस्य आहे. प्रजापतिविद्येचे सर्वात् उत्कृष्ट आणि रहस्यात्मक रूप प्राण किंवा जीवन हेच आहे. प्राणाचे स्रोत, उद्‌गम, वृद्धी, विकास आणि ऱ्हास या सर्वांचे नियम मानवांकरिता सर्वात् अधिक महत्त्वपूर्ण असे आहेत. प्राणच आयुष्य आहे आणि प्राणच अग्नी आहे. प्राण—विद्या ही सर्व विद्यात मूर्धन्य म्हणजे श्रेष्ठ अशी विद्या आहे. खरे पाहता, ऋषींच्या दृष्टीने प्राणविद्या ही विश्वविद्या आहे. यज्ञांच्या द्वाराच या प्राण किंवा विश्वविद्येची व्याख्या करता येते. हे प्राणातत्त्व काय आहे ? ऋषींनी या गूढ प्रश्नावर खू र विचार केला होता. पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश ही पंचमहाभूते, प्राण आणि मन या तिन्ही गोष्टी प्रकृतीने एकत्रित गुंफून रहस्यात्मक जीवनतत्त्व निर्माण केलेले पाहून फार मोठे आश्चर्य वाटते त्या जीवनतत्त्वाचे नियम कोणते आहेत ? आणि त्याचे रहस्य काय आहे ? त्याचा शोध घेऊन संशोधन करणे हेच वेदविद्येचे मुख्य लक्ष्य आहे. जेथे जीवन आहे त्या स्थानाला यज्ञ असे म्हणतात. त्या यज्ञाचा आरंभ प्राणा-

पानाच्या स्पंदाने होतो. प्राण हे शक्तीचे रूप आहे आणि शक्ती नेहमी ऋण व घन रूपाने सहकारीरूपात प्रकट होते. या मूलभूत प्राणशक्तीचेच प्राण आणि अपान हे दोन भेद आहेत. स्पन्दन हे प्राणाचे स्वरूप आहे. ज्याप्रमाणे एखादे झोपलेले बालक जागृत होऊन आपल्या जीवनाला आरम्भ करते त्याप्रमाणेच बीजाच्या केंद्रातील प्रसुप्त प्राण-बिन्दूचे जागरण किंवा क्षोभ होतो. प्राणाच्या जागरणालाच वैज्ञानिक भाषेत समंचन प्रसारण असे म्हणतात.

**प्राणो वै समंचनप्रसारणं ( शतपथ ८–१–१० )**

आकुंचित होणे आणि प्रसरण पावणे हेच स्पन्दनाचे रूप आहे. घनापासून ऋणबिन्दूकडे आणि ऋणापासून घनबिन्दूकडे जाणे आणि येणे हाच विद्युत किंवा शक्तीचा क्रम आहे. यालाच वैदिक भाषेत "एतिच प्रेतिच" असे म्हणतात. प्राणरूपी एकज्योती किंवा कमळ मानवी केन्द्रात प्रकट होते आणि प्राण व अपान यांच्या रूपात स्पन्दित होऊन ही ज्योती आयुष्यभर सक्रिय राहते.

**अन्तश्चरति रोचनास्य प्राणादपानती । व्यख्यन्महिषो दिवम् ॥**
**( ऋ १०–१८९–२ )**

हेच जीवनाचे रूप आहे. या मंत्राची देवता आत्मा किंवा सूर्य आहे. वैदिक परिभाषेत विराट् आत्मतत्त्वाचे सूर्य हेच सर्वोत्तम प्रतीक आहे असे मानले आहे. "सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च।" मैत्रायणी उपनिषदानुसार मूर्त्त व अमूर्त्त अशी ब्रह्माची दोन रूपे आहेत. जे मूर्त्त आहे ते असत्य आहे आणि जे अमूर्त्त आहे ते सत्य आहे. हे सत्यच ब्रह्म आहे व तीच ज्योती आहे. जी ज्योती आहे तोच सूर्य आहे आणि जो आदित्य आहे तोच आत्मा आहे. ( मै. उ. ६–३) ( पृ. ८–९ )

आता यानन्तर यज्ञाचा परार्थ काय आहे ते पाहू. "भारतीय

संस्कृति और साधना," खंड १ ला या ग्रंथातील "यज्ञ का रहस्य" या लेखात हा अर्थ स्पष्ट करताना म. म. श्रीगोपीनाथ कविराज असे म्हणतात की, "आता यानन्तर यज्ञाचा अन्तरंग भाग कोणता आहे ते समजावून देण्याचा प्रयत्न करू. श्रीमद्भगवद्गीतेमध्ये (४-२५ ते ३०) श्रीभगवन्तांनी अनेक यज्ञांचे प्रतिपादन केले आहे. परन्तु समन्वयाच्या दृष्टीने पाहिले तर हे लक्षात येते की, या सर्व यज्ञांमध्ये एकच आदर्श विद्यमान आहे. असे असले; तरी ज्या प्रमाणात त्यात लक्ष्यप्राप्तीची स्पष्टता किंवा अस्पष्टता राहील त्या प्रमाणात त्यात तारतम्य दृष्टोत्पत्तीस येते. श्रीमद्भगवद्गीतेत दुसऱ्या प्रसंगी (१०-२५) श्रीभगवन्तांनी निरनिराळ्या प्रकारच्या यज्ञांमध्ये मी "जप-यज्ञ" स्वरूप आहे असे म्हटले आहे. शास्त्रामध्ये अन्यत्रही असे म्हटल्याचे दृष्टीस पडते की, सम्पूर्ण कर्मकाण्ड, दान आणि तपस्या या सर्व गोष्टी जरी एकत्रित केल्या तरी त्या जप-यज्ञाच्या सोळा कलांपैकी एक कलेच्या बरोबर असत नाहीत. जप आणि विशेषत: मानस जप हे अत्यन्त श्रेष्ठ साधन आहे, यात काहीच शंका नाही.

धर्मसूत्रकार बौधायनाने असे म्हटले आहे की, "सर्वक्रतुः याजिनामात्मयाजी विशिष्यते।" याचा अर्थ असा आहे की, सर्व प्रकारच्या यज्ञांमध्ये आत्मयज्ञच सर्वश्रेष्ठ आहे. कारण आधानानन्तर जेव्हा निरनिराळे अग्नी यजमानामध्ये राहतात तेव्हा गार्हपत्य अग्नी यजमानाच्या प्राणरूपाने राहतो, त्यानन्तर दक्षिणाग्नी अपानरूपाने, आहवनीय व्यानरूपाने, सभ्य उदानरूपाने व आवसथ्य समान रूपाने राहतो. हे पाचही अग्नी आत्मस्थ म्हणजे आत्म्यात राहतात. यावेळी कोणताही अग्नी बाहेर राहात नाही. त्यामुळे त्यावेळी "आत्मन्येव जुहोति," या न्यायाने आत्म्यातच हवन होते. याचेच

नाव आत्मयाग, आत्मनिष्ठा व आत्मप्रतिष्ठा असे आहे. (बौधायन पृ. २१०-२११). जर मानस जप उत्तम प्रकारे केला गेला तर तो आत्मयज्ञात परिणत होतो. त्यामुळे त्याचा महिमा अपार आहे.

यज्ञ शब्दामुळे कर्माचा बोध होतो यात काहीच शंका नाही. परन्तु कोणत्याही कर्माला यज्ञ असे म्हटले जात नाही. जरी काम्य कर्म हे यज्ञ या नावाने परिचित असले तरी हा यज्ञाचा वास्तविक आदर्श नाही. ज्या कर्माने शुद्धी म्हणजे देहशुद्धी, इन्द्रियशुद्धी, अहंकारशुद्धी आणि चित्तशुद्धी होते, ज्या कर्माचे फळ स्वार्थ नसून परार्थ आहे, ज्या कर्मामुळे नवे आवरण तयार होत नाही; उलट पहिले आवरण क्षीण होत जाते, जो (कर्म) मार्ग जीवाला क्रमश: कल्याणाच्या मार्गावर पुढे जाण्यासाठी साहाय्यता करतो आणि शेवटी महायज्ञाचीही प्राप्ती करून देतो, त्यालाच यज्ञ असे म्हणतात. याकरिता यज्ञार्थाच्या शिवाय केलेल्या अन्य कर्मांनी बन्धन होते असे श्रीमद्‌भगवद्‌गीतेत म्हटले आहे. वास्तविकरीत्या निष्काम भावाने केलेले असे फलाकांक्षारहित योगस्थ कर्म किंवा स्वभावसिद्ध कर्म म्हणजेच यज्ञ होय. (श्रीसीतारामहाराजांनी केलेल्या संहिता-स्वाहाकारयज्ञाप्रमाणे) फलाकांक्षा नसतानाही जर कर्म विधिपूर्वक केले गेले तर स्वाभाविक नियमानुसार ते फल उत्पन्न केल्याशिवाय राहणार नाही आणि हे फल निष्काम कर्मकर्त्यामध्ये प्रविष्ट न होता सम्पूर्ण विश्वाच्या साधारण सम्पत्तीच्या रूपात व्याप्त होऊन यज्ञेश्वराची प्रीती उत्पन्न करते. ही प्रीती, प्रसन्नता किंवा प्रसादच निष्काम कर्मकर्त्याचा खरा सन्मान आहे. हेच अमृत आहे. पंचमहायज्ञ केल्यानंतर शिल्लक राहिलेल्या अन्नाला आणि यजमानाच्या भोग्य अन्नाला अमृत असे म्हणतात. खरे पाहता, हा प्रसाद म्हणजे निराळ्या रूपाने मिळालेले भगवत्प्रेमच आहे. हा प्रसाद खाल्ल्यावर

चित्त शुद्ध होते आणि अशुचिस्पर्शाने उत्पन्न झालेले पाप, बुद्धिपूर्वक केलेले पाप आणि अबुद्धिपूर्वक केले गेलेले पाप नष्ट होते.

त्याग आणि ग्रहण ही दोनच कर्माची अंगे आहेत. जे असार असल्यामुळे त्याज्य आहे त्याचा त्याग करणे आणि जे सारयुक्त असल्यामुळे ग्राह्य आहे त्याचे ग्रहण करणे या दोन्ही क्रियाच कर्माचे किंवा यज्ञाचे स्वरूप आहे. प्रकृतीच्या राज्यात सर्व पदार्थ सांकर्य दोषाने युक्त असतात. येथे अशी कोणतीही वस्तू नाही की, जिच्यामध्ये बिलकूल मल नसल्यामुळे ती आत्यंतिक शुद्ध आहे. आणि अशीही वस्तू नाही की, जिच्यामध्ये केवळ मलच मल असून बाकी काहीच नाही. जगतातील सर्व वस्तूंमध्ये शुद्ध आणि अशुध्द अंश मिसळलेले असतात. क्रिया-कौशल्याच्या द्वारा शुद्धाशुद्ध-मिश्रित पदार्थांमधून क्रमशः त्यातील अशुद्ध अंशाचा त्याग होऊन शुद्ध अंशाची वृद्धी होते. हे क्रियाकौशल्यच यज्ञाचे रहस्य आहे. ज्याच्या द्वारा ही त्याग-ग्रहण-रूप सारासार-विवेचन-क्रिया निष्पन्न होते, त्या क्रिया कौशल्यालाच चैतन्यशक्ती असे म्हणतात. यज्ञीय परिभाषेत या क्रियाकौशल्याचा प्रतिनिधी यथाविधी सुसंस्कृत केलेला " अग्नी " आहे. शक्ती सुप्त अर्थात् निद्रिस्त राहिली. तर कर्म होत नाही. अग्न्याधान आदि क्रिया या क्रिया-कौशल्याच्या पारिभाषिक संज्ञा आहेत. ज्याप्रमाणे कुण्डलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय योग-क्रिया सिद्ध होत नाही. त्याप्रमाणे होमाग्नी प्रज्वलित झाल्याशिवाय यज्ञाचे काम सिद्ध होत नाही.

मूळ शक्ती एक आणि अभिन्न असली; तरी व्यवहाराच्या पातळीवर ती अनेक आणि भिन्न प्रकारची असते. जरी मूळ शक्तीत कोणताही क्रम नसला तरीही जागतिक शक्तीत जो क्रम आहे त्याचा अपलाप करता येत नाही. या शक्तीच्या स्तरांमधील भेदामुळे उर्ध्व-

गती किंवा विकासाची क्रमिक अभिव्यक्ती इत्यादि सर्व त्या शक्तीवर अवलंबून असते. वर जाणाऱ्या शिडीवर पदार्पण करण्यापूर्वी सर्वप्रथम शक्तीच्या जागृतीचा अनुभव येतो. त्यानन्तर या स्तरावरच जागृत शक्तीच्या प्रभावाने मलिनांश दूर होतो आणि शुद्धांश प्रकाशित होतो. त्यानन्तर उच्चतर भूमीच्या जागृत शक्तीत त्या शुद्धांशाची आहुती दिली जाते. पहिल्या अग्नीपेक्षा दुसरा अग्नी तीव्रतर असतो. प्रथम अग्निपरीक्षेत ज्याचा शुद्धांशरूपाने निर्णय केला जातो त्याचीच द्वितीय अग्नीत आहुती दिल्यानन्तर त्या शुद्धांशातही सूक्ष्म मल दृष्टीस पडतो. त्या मलाला दुसरा अग्नी जाळून टाकतो आणि त्या शुद्धांशाला शुद्धतर करून प्रकाशित करतो. जरी हा शुद्ध अंशही सर्वथा अशुद्धिरहित नसला तरी द्वितीय अग्नीच्या क्रियेने ती अशुद्धी प्रतीत होत नाही. त्यानन्तर तृतीय अग्नीची क्रिया चालते. अशा प्रकारे जोपर्यंन्त अशुद्धी राहते तोपर्यंन्त अग्नीची दाहिकाशक्ती ही अशुद्धी जाळण्याच्या कार्यात आणि मल दूर करण्याच्या कार्यात मग्न असते. ज्यावेळी सत्त्वामुळे मल पूर्णपणे निघून जातो त्यावेळी ते सत्त्व विशुद्धसत्त्व या नावाने ओळखले जाते. त्यावेळी अग्नी हा अग्नी राहात नाही; कारण की, मल किंवा विशुद्धी ही दाह्य म्हणजे जाळण्यास योग्य असते. परंतु ज्यावेळी दाह्य राहात नाही त्यावेळी दाहिका शक्तीही कार्य करीत नाही. त्यावेळी अग्नी हा अग्नी आहे असे न म्हणता तो विशुद्ध ज्योतिमात्र आहे, हे म्हणणेच योग्य ठरते. खरे तर त्या स्थितीत अग्नीमध्ये एकीकडे विशुद्ध ज्योती व दुसरीकडे विशुद्धसत्त्व विद्यमान राहते.

हाच विषय अधिक स्पष्ट करून समजविण्याचा प्रयत्न करतो. मनुष्य देहात्मबोधाने युक्त होऊन ज्या भूमीत राहत असतो ती अगदी निम्नतम भूमी आहे. ज्याप्रमाणे निरनिराळ्या जीवलोकां-

मध्ये पृथ्वी ही निम्नतम आहे त्याप्रमाणेच ज्ञानभूमीमधील ज्या भूमीमध्ये स्थूलदेहात आत्मप्रतीती होते, तीही निम्नतम भूमी आहे. या कारणामुळेच या अधोभूमीत सुरुवातीलाच शक्तीच्या जागृतीची आवश्यकता आहे. (जरी एका दृष्टीने शक्ती सर्वदा आणि सर्वत्र जागृतच असली, तरी जोपर्यंत तिची आपल्याला ऊर्ध्वगती होऊन प्राप्ती होत नाही तोपर्यन्त तिची सुप्तावस्थेतच गणना होते. शक्ती प्राप्त करणे हीच शक्तीची जागृती आहे. ज्यावेळी हे घडते त्यावेळीच ती व्यावहारिक भूमीवर अवतीर्ण होते.) आत्मबोधाला स्थूल देहापासून दूर करून तो वरच्या स्तरावर नेणे, हे जागृत शक्तीचे पहिले कार्य आहे. व्यष्टी मानव-देह किंवा पिण्ड, समष्टी देह किंवा ब्रह्मांड आणि महासमष्टी देह किंवा विश्व या सर्वांचे, सर्वांगीण विश्लेषण केल्यावर अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनन्दमय या पाच प्रधान स्तरांची किंवा कोषांची माहिती होते. त्याच्या करिता सप्तधातुमय अन्नमय कोषाचे सार असलेल्या वीर्यरूप बिन्दूचे दोहन करून त्याला अनुरूप अशा अग्नीत आहुती द्यावी लागते. ऊर्ध्वरेता होण्याचे किंवा बिन्दूची ऊर्ध्वगती करण्याचे हेच मूळ साधन आहे. पंचाग्निमय महायज्ञाच्या सुरुवातीला प्रथमच अग्नीमध्ये किंवा जठरानलात सौम्यवस्तूची किंवा खाण्याच्या वस्तूची आहुती दिल्याने अर्थात् प्राणाग्निहोत्ररूपी यज्ञाच्या प्रभावाने क्रमशः सप्तधातूंचा विकास होतो. जो अभिमान स्थूल देहात अहंभाव प्रकट करतो तो मुळात त्या बिन्दूचे अवलम्बन करूनच राहतो. साधारणपणे बिन्दूची आहुती देता येणे शक्य होत नाही. त्यामुळे बिन्दू बहिर्मुख होतो आणि निश्चितपणे मृत्यूचे कारण होतो. ज्ञानपूर्वक बिन्दूची ऊर्ध्वगती

झाल्यावर "जीवनं बिन्दुधारणात्" या नियमानुसार नित्य जीवन अवश्य प्राप्त होते.

बिन्दूच्या बहिर्मुख होण्याच्या गतीची रीत अशी आहे. मनुष्य देहात विद्यमान असलेल्या असंख्य नाड्यांमध्ये किंवा शिरांमध्ये हृदयाशी संलग्न असलेली मनोवहा नावाची नाडी आहे. त्या नाडीच्या शाखा–प्रशाखा सर्व शरीरभर पसरलेल्या असतात. त्या नाडीसंबंधी शास्त्रात पुढीलप्रमाणे विवरण सापडते.

"अश्वत्थनाडीवद्व्याप्ता द्विसप्ततिशताधिका।
नाडी मनोवहेत्युक्ता योगशास्त्रविशारदैः ॥"

श्रुतीमध्ये असे म्हटले आहे की, "अन्नमयं हि सौम्यं मनः।" मनोवहा नाडी अन्नरसाच्या द्वारा हृदयान्तर्वर्ती मनाला पुष्ट करते. ही अन्नरसाची सूक्ष्मसत्ता संपूर्ण देहामध्ये तेजाच्या रूपाने संचित होते. यामुळेच देहामध्ये कान्ती, सौंदर्य, लावण्य, धृती, स्वास्थ्य आदि गुणांचा विकास होतो. ज्यावेळी कोणत्याही कारणाने चित्तामध्ये वासनेचा उदय झाल्यावर वासना व तिला साहाय्य करणारी इन्द्रिये मिळून त्या व्यापक तेजाला घुसळून स्थूल वीर्यरूपात रूपान्तरित करते त्यावेळी त्याबरोबरच मनोवहा नाडी त्या वीर्याला सर्व शरीरातून खेचून घेऊन त्याला घट्ट बिन्दूचे रूप देते आणि त्याला आपल्या बहिर्मुख वेगाने देहातून बाहेर फेकते अर्थात् देहामध्ये राहू देत नाही. यालाच बिन्दूचे क्षरण असे म्हणतात. या कारणामुळेच महर्षी अत्रींनी अन्नरस, कामना आणि मनोवहा नाडी या तीन कारणांनी एकत्रित होऊन अभिव्यक्त होणाऱ्या बीजाला "त्रिबीज" असे नाव दिले आहे. कालाग्नि कुंडात बिन्दूचे क्षरण होते. जरा, मरण, विकार, मालिन्य इत्यादि त्याची फले आहेत. ज्ञानपूर्वक नसली तरी स्वाभाविक नियमानुसार बिन्दूची ऊर्ध्वगती क्षीणरूपाने

व मन्दगतीने होतच असते. ही गती थांबविण्याची शक्ती कोणातही नाही. हा बिन्दूच क्रमशः शुद्ध होऊन सहस्रारातील मध्यबिन्दूत सदाख्य कलेमध्ये प्रकट होतो. शंखिनी नाडी अन्नाचे सार घेऊन मस्तकात अमृताचा संग्रह करते हे योगशास्त्रात प्रसिद्ध आहे.

"अन्नसार समादाय मूर्ध्नि संचिनुते सुधाम् ॥"

हा दैहिक प्रकृतीचा नियम आहे. परन्तु हे अमृत किंवा चन्द्रबिन्दू हा पूर्ण अक्षरबिन्दू नसतो; कारण आंशिक रूपाने त्याचे क्षरण होते. यामुळे ब्राह्मी स्थिती प्राप्त होत नाही आणि कालराज्यापासून सुटका होत नाही. खरे पाहता; हा बिन्दूच कालाग्निकुण्डात सतत पडत असल्यामुळे जीव–देह हा म्हातारपण आणि मृत्यूपासून आपला बचाव करू शकत नाही. ज्ञानपूर्वक बिन्दूची क्रमिक ऊर्ध्वगती सिद्ध झाल्यावर स्थिती प्राप्त होते. ही ऊर्ध्वगतीची सिद्धी क्रमाशिवायही होऊ शकते. तरीही सज्ञानभाव आवश्यक आहे. किंवा असेही होऊ शकते की, ऊर्ध्वगतीचा प्रश्नच उपस्थित होत नाही किंवा कोणत्याही प्रकारची गती असत नाही. सर्व प्रकारच्या गतींच्या मध्येच गतिहीन स्वप्रकाशमय स्थिती प्राप्त होते. परन्तु प्रकाशाला स्वप्रकाश होणे आवश्यक आहे; कारण असे नसेल तर त्याचे असणे न असण्यासारखेच आहे.

बिन्दूची द्वितीय अग्नीत आहुती पडते. त्याचा ओजोरूप सारभाग प्राणमय द्वितीय कोशाची पुष्टी करतो. वीर्य हे देहाचे प्रथम अमृत आहे. हे अमृत अन्नमय कोषाचे पोषण करणारे आहे. द्वितीय अमृत ओज आहे. ते प्राणमय कोषाचे पोषण करणारे आहे. परन्तु जोपर्यन्त ओज शुद्ध होत नाही तो पर्यन्त तो मनोमय कोषाची पुष्टी करू शकत नाही. या शुद्धीकरिता तृतीय अग्नीत ओजाची आहुती द्यावी लागते. हे ज्यावेळी घडते त्यावेळी ओज निर्मल होऊन मनोमय

रूपाने प्रस्फुटित होते आणि ओजाचा मलिन अंश निघून जातो व शुद्ध अंश मनोमय कोषाची पुष्टी करतो. संकल्प व विकल्प हाच मनाचा धर्म आहे. त्यामुळे मनोमय सत्त्व पूर्णपणे निर्मल असत नाही. सर्वसाधारणपणे फक्त मनुष्यच वरील विकल्पाच्या आधीन असतो. चतुर्थ अग्नीत मनाची आहुती पडल्यावर मनातून तो विकल्पांश दूर होतो आणि विशुद्ध संकल्प फक्त खाली उरतो. याचे नाव विज्ञान असे आहे. विज्ञानाच्या द्वारा विज्ञानमय कोषाची पुष्टी होते. हीच योगभूमी किंवा ऐश्वरिक जीवाची भूमी आहे. विज्ञानामध्ये अनुकूलता व प्रतिकूलता अशा दोन्ही गोष्टी असतात. अनुकूल ज्ञान म्हणजे सुख व प्रतिकूल ज्ञान म्हणजे दु:ख होय. प्रतिकूलता हा विज्ञानाचा मल आहे. याकरिता विज्ञानाचीही अनुरूप अग्नीत आहुती द्यावी लागते. पंचम अग्नी शुद्ध होऊन विज्ञान हे आनन्दरूपात परिणत होते. हेच पंचम अमृत असून ते आनन्दमय कोषाचे पोषण करणारे असे आहे. आनन्दमय कोषामध्ये मल नसल्यामुळे त्याचे शुद्धीकरण होत नाही. हा आनन्दमय कोष नित्य अमृत आणि अक्षय आहे. हा आनन्दमय कोष जरी व्यष्टिरूप असला किंवा जरी तो समष्टिरूप असला तरी हा कोष ही आईची कुशीच अर्थात् आनन्दरूप आईची सत्ताच असते. हे पंचम अमृत विशुद्ध सत्त्वमय असा परमानन्द आहे. याची पुन्हा आहुती द्यावी लागत नाही.

जरी ही जीवाची भूमी असली तरी ती साधारण जीवाची भूमी नाही. विज्ञानभूमीचा जीव विज्ञानमय आणि सत्यसंकल्पतावश योगसिद्ध आहे. याकरिता हा जीव असला तरीही "ईश्वर" पदवाच्य आहे. त्या भूमीत मनोवहा नाडीची कोणतीही क्रिया होत नाही.

जरी येथे आहुती द्यावी लागत नसली तरी असे म्हणणे भाग

पडते की, तेथेही एक प्रकारची आहुती द्यावे लागते. एक प्रकारे ही अन्तिम आहुती असते. जरी या आहुतीचे अन्य आहुतींप्रमाणे वर्णन करणे योग्य होणार नसले तरी या आहुतीला अन्य दुसरे कोणतेही योग्य नावही देणे शक्य होत नाही. ही आहुतीच "ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुताम्" अशी असते. आनन्दमय कोषाचीही इतर कोषात गणना होत असल्यामुळे तो कोषही ओलांडून पलीकडे जाणे भाग पडते. हे करणे म्हणजे एका बाजूने आत्मसमर्पण किंवा आपल्याला रिकामे करणे आहे आणि दुसऱ्या बाजूने अपरिच्छिन्न, अनन्तस्वरूप व शक्तिमय अशा आत्मस्वातंत्र्यात अधिष्ठान प्राप्त करणे अर्थात् आत्मस्वरूपात प्रतिष्ठा प्राप्त करणे आहे.

जोपर्यंन्त मृत्यूचा सम्बन्ध असतो अथवा मलिनता असते तेथपर्यंन्त आहुतीची आवश्यकता असते. तोपर्यंन्त अग्नीही असतो. त्यानन्तर आत्मस्वरूपात अग्नीचे विलीनीकरण होते. अमृतीकरण आणि मलापसरण (संपूर्ण मल दूर होणे) पूर्ण झाल्यावर लौकिक दृष्टीने आहुतीकरिता काळ शिल्लक राहात नाही. परन्तु खरे पाहता पूर्णतेच्या मार्गावर येथेही आहुतीची आवश्यकता असते. वरील प्रकारे प्राप्त झालेल्या आनन्दाचे किंवा परमानन्दाचेही समर्पण करणे भाग पडते. हा आनन्द किंवा परमानन्द हा जरी सत्तारूप असला तरी द्वितीय रूपाने तो आस्वादित असा असतो. यामुळे तोही एक प्रकारे भोगाच्या अन्तर्गतच असतो. जोपर्यंन्त त्याचे समर्पण होत नाही तोपर्यंन्त भोक्तृ–भोग्यमात्ररहित अशा अद्वय व विशुद्ध चैतन्यात स्थिती प्राप्त होत नाही. "चिदवसानो भोगः।" खरे पाहता, प्रियतमाला भेट देण्याला आनन्द हीच एकमात्र योग्य वस्तू आहे. पहिल्या पाच दिव्य अग्नीत आनन्दाबरोबर मिश्रितरूपाने निरानन्दाचे अर्पण झालेले असते. शेवटची चरम आहुती

देताना त्या महान् आनन्दाचेही किंवा अमृताचेही समर्पण करून आनन्दाच्या पलीकडे असणारी स्वस्वरूपात स्थिती प्राप्त केली जाते. असे झाले म्हणजे मूळ अविद्येची ग्रंथी मोकळी होते आणि द्वन्द्वातीत परमसाम्यात प्रतिष्ठा प्राप्त होते. " हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।" आनन्द म्हणजेच ते हिरण्मय पात्र असून त्याच्या द्वाराच पूर्ण सत्याचे स्वरूप झाकले जाते.

त्याला मृत्यू द्यावा लागेल, अमृत द्यावे लागेल, दुःख द्यावे लागेल आणि सर्वात् शेवटी आनन्दही द्यावा लागेल. त्याला हेय म्हणजे त्याज्य किंवा निष्कृष्ट द्यावे लागेल आणि त्याबरोबरच उपादेय म्हणजे ग्राह्य अर्थात् उत्कृष्टही द्यावे लागेल. असे झाले म्हणजे निर्मल प्रकाशाचा उदय होईल. त्यावेळी मग सर्व रूपामध्ये अनन्त द्वंद्वमय अशा विकासांच्या रूपात प्रकाशमान झालेली अशी ती एक-मात्र सर्वातीत व द्वंद्वातीत सत्ताच प्रत्यक्ष दृष्टिगोचर होईल. अमृत आणि मृत्यू व दुःख आणि सुख ही त्या सत्तेची म्हणजे शक्तीचीच रूपे आहेत. लौकिक किंवा अलौकिक अशा कोणत्याही अग्नीत चरम आहुती किंवा पूर्णाहुती ग्रहण करण्याचे सामर्थ्य असणे शक्य असत नाही; कारण पूर्णाहुती म्हणजे निर्मल अमृत असते. एकमात्र ब्रह्माग्नीत किंवा विशुद्ध चैतन्यरूप अग्नीतच ते परमामृत सोम धारण करण्याची क्षमता असते. त्यात त्यावेळी अग्नी व सोम हे एकाकार होतात. चैतन्य आणि आनन्द किंवा शिव आणि शक्ती ही सामरस्य प्राप्त करतात. यालाच परिपूर्ण सत्य असे म्हणतात.

योगीलोक सर्वसाधारणपणे विश्वाला पाच स्तरावर विभक्त करून व्याख्या करतात. याकरिता येथेही पाच स्तर घेतले आहेत. येथे संख्येचा जो निर्देश केला आहे तो केवळ समजावून सांगण्याच्या सोयीकरिता आहे. पाच स्तर-विभाग घेतले आहेत. याकरिता

अग्नीही पाच रूपात ग्रहण केला आहे. खरे पाहता स्तर हे अनन्त व असंख्य असल्यामुळे एकच स्तरहीन अखण्ड सत्ता सर्वत्र विराजमान आहे.

दिव्य अशा पाच अग्नींची क्रिया संपल्यावर हे सर्व अग्नी आत्म्यामध्ये पूर्णपणे एकरूप होतात. त्यावेळी आत्मभाव अनात्मसत्तेपासून दूर होऊन आपल्या स्वरूपामध्ये स्थिर होतो.

सृष्टीचे रहस्य अत्यन्त विचित्र आहे. येथे अमृत आणि मृत्यू, आनन्द आणि दुःख, शुद्ध सत्त्व आणि रजस्तम व चांगले आणि वाईट हे सर्व एका बरोबर दुसरे अशा रीतीने संलग्न असतात. आत्मबलिरूप यज्ञाच्या द्वारा यांना विभक्त करून शुद्ध सत्त्वांशाचा आधार घेऊन वर येता येते. अशुद्ध अंश तत्काळ दूर करावा लागतो. असे केले म्हणजे ज्यात फक्त अमृत राहते; पण मृत्यू राहत नाही, आनन्द राहतो; पण दुःख राहत नाही, सार वस्तू राहते; पण असार वस्तू राहत नाही आणि शुद्ध सत्त्व राहते; पण रज आणि तम राहत नाही. अशी अवस्था क्रमशः प्राप्त होते. या अवस्थेत शुद्धीकरणाचा एक प्रकारे अन्त होतो असे म्हणणे शक्य आहे. यानन्तर महाज्ञानाचा उदय झाल्यावर अमृताचा व मृत्यूचा भेद नष्ट होतो. त्यावेळी आनन्दाची व दुःखाची पुन्हा निराळ्या रूपाने जाणीव होत नाही आणि एकच स्वप्रकाशमय व चिदानन्दमय महाप्रकाश जणू काही आत व बाहेर ओतप्रोत भावाने ( खरे पाहता आत व बाहेर त्यावेळी कोठे आहे ? ) आपला आपल्यात विराजमान राहतो असे दृष्टीस पडते. हीच पूर्ण साक्षात्काराची अवस्था आहे. अनेक प्रकारांनी होऊ शकतो. परन्तु वास्तविक साक्षात्कार हा

येथे क्रमांचे अवलम्बन करूनच पर–पर अवस्थांचा उदय आणि त्यानन्तर साक्षात्काराची गोष्ट सांगितली आहे. हा क्रम निश्चितच

अक्रम आहे म्हणजे त्यात क्रम नाही अर्थात् क्रमच तेथे अक्रमामध्ये पूर्णरूपाने प्रकट होतो. हे सर्व साधकाच्या योग्यतेच्या तारतम्यानुसार किंवा शक्तीच्या तारतम्याच्या क्रमभेदाने होते. आणव, शाक्त आणि शाम्भव या तीन उपायांमधील शाम्भव उपाय श्रेष्ठ आहे. अनुपायासंबंधी तर काही सांगण्याचे कारण नाही; कारण अनुपायामध्ये कोणत्याही उपायाच्या अर्थात् साधनाच्या नियंत्रणाशिवाय परमेश्वराचा (साधकाच्या ठिकाणी) पूर्ण समावेश होतो. शाम्भव उपायातही क्रमिक साधनाची आवश्यकता राहात नाही. एका वेळेलाच अखण्ड सत्तेचे भान होत राहते. प्रातिभ ज्ञानात क्रम असत नाही. त्यात एका क्षणात सर्वांचा पूर्ण प्रतिभास अपरोक्ष रूपाने होतो.

यज्ञाकरिता ("यज्ञो वै विष्णुः") किंवा भगवन्ताकरिता जे कर्म केले जाते अथवा जे यज्ञरूप कर्म आहे ते जर पूर्ण करावयाचे असेल तर सर्वात् प्रथम देहाभिमानाची शुद्धी करणे आवश्यक असते. एका बाजूने व्यष्टिदेहाच्या अभिमानाची आणि दुसऱ्या बाजूला समष्टी किंवा महासमष्टी देहाच्या अभिमानाची शुद्धी आवश्यक असते. खरे पाहता; प्रकृतीच्या किंवा स्वभावाच्या गुणांच्या द्वाराच आणि मुळामध्ये चित्शक्तीच्या प्रेरणेमुळेच सर्व कर्म होते. परन्तु जोपर्यंन्त मनुष्य अहंकाराने अत्यन्त मोहित झालेला असतो तोपर्यंन्त तो स्वतःच्या ठिकाणी कर्तृत्वाचा अभिमान बाळगीत असतो. या मिथ्याभिमानामुळे कर्मविपाकापासून होणाऱ्या सुखदुःख भोगाशी त्याला निगडित राहावे लागते. यज्ञरूप कर्माच्या मुळाशी अशा प्रकारच्या अशुद्ध अभिमानाचा मोह राहत नाही आणि व्यक्तिगत आकाक्षाच्या पूर्तीची कामनाही राहात नसल्यामुळे ते विशुद्ध कर्म असते.

या कारणांमुळेच यज्ञाला आरम्भ करण्यापूर्वी देहामध्ये असणाऱ्या आधारकुण्डात म्हणजे मूलाधारात होमाग्नी प्रज्ज्वलित करणे आवश्यक असते. हा अग्नी जरी मुळामध्ये एकच असला तरीही त्याच्या आकृतीमुळे व प्रकृतीमुळे अनेक भेद होतात. त्याप्रमाणेच या अग्नीचे कर्मरूप व अधिकाररूप भेदही अस्तित्वात आहेत. प्राण आणि अपानाच्या संघर्षणाने किंवा ॐकार आणि आत्म्याच्या ध्यानरूप घुसळण्याने किंवा अन्य दुसऱ्या कोणत्याही उपायाने अग्नी प्रज्ज्वलित करणे आवश्यक आहे. अनादि कालापासून जे अमूल्य रत्न उपेक्षित होऊन गुप्तरूपाने पडलेले असते त्या रत्नाचा प्रदीप्त अग्नीच्या प्रकाशात शोध घेऊन त्याला प्रकट केले पाहिजे. लौकिक प्रकाश तर सोडूनच द्या; पण दिव्य प्रकाशही त्या "गुहा-निहित" पदार्थाला प्रकाशित करण्यास समर्थ नाही.

योगीलोक ज्याला कुण्डलिनीचे उद्‌बोधन असे म्हणतात, तो या होमाग्नी प्रज्ज्वलनाचा आतील पर्याय आहे. आत्मविस्मृत होऊन संशयामुळे झाकून गेलेला जीव श्वास-प्रश्वासाच्या आधीन राहून इडा पिंगलेच्या कालराज्यात भटकत व फिरत राहतो. जोपर्यंन्त कुण्डलिनी शक्ती जागृत होत नाही तोपर्यंन्त कालमार्गाचा त्याग करून सुषुम्णारूप मध्यमार्गात प्रवेश होऊ शकत नाही आणि मध्यमार्गात प्रविष्ट झाल्याशिवाय योगस्थ होऊन कोणतेही कर्म करण्याचा कोणताही उपाय नाही; मध्यमार्गात थोड्या दूरपर्यंन्त प्रवेश झाल्यावर हे लक्षात येईल की, आपण स्थूल शरीरापासून बाजूला होऊन आपला सूक्ष्मदेहाच्या प्रथम स्तरात प्रवेश झाला आहे. त्यावेळी श्वास कालनाडी सोडून देण्यास आरंभ करतो आणि तो सुषुम्णेत प्रविष्ट होऊन वर-खाली संचार करीत राहतो. त्यामुळे बाह्य

जगताची स्मृती जवळ जवळ लुप्त होते; परन्तु आतील चैतन्य उज्ज्वल रूपात प्रस्फुटित होते. त्यानन्तर पुढे प्राणाचा सुषुम्णेच्या आत असलेल्या वज्रा नाडीत प्रवेश होतो आणि सूक्ष्म देहाच्या प्रथम स्तरातून निघून दुसऱ्या स्तरात स्थिती होते. त्यावेळी प्राणांचा वज्रा नाडीच्या शाखाप्रशाखांमध्ये संचार होत राहतो. यानन्तर ज्यावेळी प्राण चित्रिणी नाडीत प्रविष्ट होतात त्यावेळी संशयरहित ज्ञानाचा उदय होतो, हृदय ग्रंथीचा भेद होतो आणि विकल्पमय अशुद्ध जीवभाव नष्ट होतो. यालाच सूक्ष्मदेहाची तृतीय स्तरामध्ये विश्रांती घेणे असे म्हणतात त्यावेळी ज्ञानसूर्याचा उदय होतो आणि हृदयकमल त्या सूर्याच्या निर्मल किरणांच्या स्पर्शामुळे प्रस्फुटित होते अर्थात् उमलते. त्यानन्तर प्राणांचा चित्रिणी नाडीच्या आतील ब्रह्मनाडीत प्रवेश झाल्यावर साधकाला आपले स्वरूप हृदयापासून द्वादशान्तापर्यन्त (ब्रह्मरन्ध्रातील महाशून्यापर्यन्त) स्पन्दनशील असे दृष्टीस पडते. ही ब्रह्मनालातील स्थितीच आहे, शुद्धकारण देहात किंवा महाकारण देहात स्थिती आहे आणि जगज्जननी आईच्या कुशीत विश्रांती घेणे आहे. त्यावेळी चैतन्यमय स्थिती आणि अत्यन्त शान्ती प्राप्त होते. खरे पाहता; या स्थितीत भोग आणि शान्ती अथवा स्थिती आणि क्रिया यांचा भेद नाहीसा होतो अर्थात् सर्व काही राहात असले तरी जणूकाही काहीही राहात नाही.

'मध्य' असे म्हटल्याने वास्तविकपणे शुद्ध चित्ताचे ज्ञान होते; कारण की, तेच सर्व वस्तूंमध्ये ओतप्रोत भरलेले असून त्याच्या आधारावरच उभे राहून सम्पूर्ण विश्व हे प्रकाशित होते. परन्तु मायिक अवस्थेमध्ये शुद्धचित् अर्थात् चैतन्य शक्ती आपल्या स्वतःच्या स्वरूपात जशीच्या तशी राहूनही मायिक खेळासाठी आपले स्वस्व-रूप झाकून घेते आणि स्वभावतःच प्राण-बुद्धी आणि देह-भाव

धारण करून हजारो नाड्यांच्या जाळ्यामध्ये स्वतःच व्याप्त होते आणि नाडीमार्गाचे अनुसरण करते. या सर्व नाड्यांमध्ये मध्यनाडी ही मुख्य आहे. ती देहामध्ये वरपासून खालपर्यंन्त पसरलेली आहे. प्राणशक्ती तिच्याच आश्रयाने व आधाराने राहते. सर्व नाड्यांच्या उदयाचा आणि विश्रान्तीचा ही मध्यनाडी सुषुम्नाच एकमात्र आधार आहे. जोपर्यंन्त त्या नाडीचा विकास होत नाही तोपर्यंन्त साधकाचा पशुभाव नष्ट होत नाही. परमेश्वराप्रमाणेच सृष्टी इत्यादि पाच कर्मांच्या कर्तृत्वाची भावना, विकल्पक्षय, शक्तिसंकोच, शक्तिविकासादि अनेक उपायांनी वरील विकास होऊ शकतो. (पाहा प्रत्यभिज्ञाहृदय) या दृष्टीने योगकुण्डलिनी—उपनिषदात जो शक्तिचालनरूप सरस्वतीचालन आणि प्राणरोधरूप नाना प्रकारच्या कुम्भकांचा उल्लेख आला आहे त्याचेही एकमात्र फळ हेच आहे विज्ञानभैरवात शाक्तक्षोभ, कुलावेश इत्यादि आणखी कितीतरी विशिष्ट साधनांचे किंवा उपायांचे विवरण पाहावयास मिळते. सर्वांचे मूळ लक्ष्य अर्थात् ध्येय मध्यनाडीत प्रवेश हेच आहे.

भूतशुद्धितंत्रात असे लिहिलेले आहे की, सुषुम्णेच्या आतमध्ये थोड्या वर वज्रा आणि त्याच्या वर चित्रिणी नाडी आहे. यामुळे सुषुम्णा त्रिगुणरूपात प्रतीत होते. अर्थात् वज्रा आणि चित्रिणी बरोबर एकरूप होऊन त्रिसूत्र रूपात दृष्टीस पडते. गौतमीतन्त्राच्या मतानुसार सुषुम्णा सर्व तेजोमयी अशी आहे. त्रिवर्णानुसार सुषुम्णा अग्निरूप आणि तमोगुणात्मक, वज्रा सूर्यरूप आणि रजोगुणात्मक व चित्रिणी चन्द्ररूप आणि सत्त्वगुणात्मक आहे, अशी भावना करण्याचे विधान आहे. ब्रह्मनाडी "शुद्धबोधप्रबोधा" आणि त्रिगुणातीत म्हणजे सर्वगुणमयी आहे. ती मूलाधारात असलेल्या स्वयंभूलिंगाच्या छिद्रापासून सहस्रारात असलेल्या परमशिवापर्यंन्त

पसरलेली आहे. ब्रह्मरन्ध्र त्याच्या मुखातच आहे. सुषुम्णेचे मूळ म्हणजे प्रारंभही येथेच आहे. श्रीतत्त्वचिन्तामणिकार पूर्णानन्द असे म्हणतात की, मेरूच्या मध्यात सुषुम्णा नाडी आहे. त्याच्या मध्यात ( कन्दाच्या वर दोन बोटे वर असलेल्या लिंगस्थानापासून निघालेली ) वज्रा नाडी आहे आणि वज्रा नाडीच्या मध्यात प्रणवविलसित चित्रिणी नाडी विराजमान आहे. ब्रह्मनाडी चित्रिणी नाडीच्याही आत आहे. क्षुरिकोपनिषदात सुषुम्णा नाडीच्या आत असलेल्या कैवल्य नाडीसंबंधी लिहिलेले आहे. ते बहुधा ब्रह्मनाडीचे दुसरे नाव असावे. मण्डलब्राह्मणोपनिषदाच्या राजयोगभाष्यात सुषुम्णा नाडी ही ब्रह्मनाडी आहे असे म्हटले आहे.

छत्तीस बोटांच्या प्राणसंचाराच्या मार्गाच्या एका बाजूला हृदय आहे आणि दुसऱ्या बाजूला द्वादशान्त किंवा विसर्गान्त पद आहे ( तेथेच महाप्रकाशाचा अनुभव येतो. ) या मार्गात कोणत्याही प्रकारचा प्रयत्न न करता निरंतरपणे वर्णांचा उदय होत राहतो. असे होणे हे स्वाभाविक आहे; परन्तु पद आणि मंत्राचा उदय साधकाच्या प्रयत्नाशिवाय होत नाही. वर्णाच्या उदयामध्ये पर आणि सूक्ष्म भेदाने तरतमभाव दिसून येतो. ज्याचा परवर्णाच्या रूपाने उल्लेख केला जातो त्याच्याही परतर आणि परतम या दोन अवस्था आहेत. सर्वोत्तम अथवा गम्भीरतम अवस्थाच परतम वर्णाच्या उदयरूपाने प्रसिद्ध आहे. हेच नादाचे परमस्वरूप आहे. या अवस्थेत सम्पूर्ण वर्ण परस्परांच्या पृथक्पणाचा त्याग करून अविभक्तरूपाने सामान्यतः अखंडपणे ध्वनित होत राहतात. ही स्थिती नित्य उदित अशी असते. ती कधीही नाहीशी होत नाही. अनाहतनादाचे हेच वास्तविक पाहता खरे स्वरूप आहे.

कारणदेह आणि महाकारणदेह यांच्यामध्ये भेद आहे. कारणदेह हा

मायामय, अज्ञानात्मक आणि आनन्दप्रधान आहे; परन्तु महाकारण-देह हा महामायामय, ज्ञानात्मक आणि आल्हादप्रधान आहे. जरी दोन्ही देह अचित्‌रूप असले तरी पहिला कारणदेह हा अशुद्ध आणि दुसरा महाकारणदेह हा नित्य शुद्ध आहे. त्याचप्रमाणे पहिला कारणदेह हा त्रिगुणमय आणि प्राकृत आहे तर दुसरा महाकारण-देह शुद्ध सत्त्वमय आणि अप्राकृत आहे. स्थूल आणि लिंगशरीर कारणदेहापासून उत्पन्न होणारे व संसारात संचार करणारे आहेत. महाकारणदेह कारणदेहापासून निराळा आणि स्वरूपानन्दाचे आस्वा दन करणारा आहे. कारणदेहाचे क्षेत्र एकपाद विभूती आहे आणि महाकारणदेहाचे क्षेत्र त्रिपाद विभूती आहे. तन्त्रमतानुसार महा-कारणदेह हाच बैन्दव देह होय. जागृत कुण्डलिनी शक्तीपासूनच महा-कारणदेहाची उत्पत्ती होते. महाकारण देहाचा कोणताही हेतू नसल्याने वेदान्तादि ग्रंथामध्ये या देहाची चर्चा व विवरण केलेले नाही; परन्तु नाथपन्थियांनी, कबीरादि संतांनी, श्रीदत्तात्रेयादि अवधूत पुरुषांनी आणि वैष्णव, शैव व आगमाच्या अनुयायी सर्व साधकांनी कोणत्या ना कोणत्या रूपात स्पष्टपणे याचा स्वीकार केला आहे. या देहात चित्‌शक्ती साक्षात् रूपाने राहते हीच गोष्ट ख्रिष्टीय साधकसमाजात Pneumatic Body म्हणजे Pneuma किंवा चित्-शक्तिद्वारा नेहमी प्रकाशित असते. कारणदेहाचे एक पीठ मायामय आहे, तेच प्रचलित कारणशरीर आहे, तेच निर्मल महाकारणाच्या नावाने परिचित आहे आणि तोच विशुद्ध ज्ञानदेह आहे.

आगमात असे म्हटले आहे की, ज्यावेळी इन्द्रियगोचर आणि इन्द्रियातीत सम्पूर्ण ज्ञेय पदार्थांची आहुती देण्याची योग्यता प्राप्त होते त्यावेळीच यज्ञाचे यथार्थ स्वरूप हृदयंगम होते. त्यावेळी इंद्रिये ही स्रुक होतात. (होम करताना ज्याचे हवन करतात त्या

जुहूला स्त्रुक असे म्हणतात.) स्वतः साधकच होता होतो. आपले आत्मरूपी शिव हे अग्नी होतात आणि विभिन्न शक्ती अग्नीच्या ज्वाळा होतात. याचा अर्थ असा आहे की, चिदात्मा स्वतःच होता होऊन अपरिच्छिन्न, विशुद्ध चैतन्यात्मक निजस्वरूपभूत अग्नीत इन्द्रियसंवेद्य अशा सर्व विषयांची इन्द्रियांच्या द्वाराच आहुती देतो. त्यावेळी निजबोधरूप अग्नीत सर्व भाव समर्पित होऊन आपापला वेगळेपणा आणि भेद यांचा त्याग करून एकमात्र बोधरूपात स्फुरण होत राहते. याचेच नाव अमृतीभाव असे आहे. अशा प्रकारे बोध जागृत झाल्यावर इन्द्रियांच्या अधिष्ठात्री देवता या अमृताचा भोग करतात अर्थात् परमबोधरूपाने त्या अमृताचा परामर्ष करतात. त्यावेळी देवता तृप्त होऊन परमबोधाशी एकरूप होतात. त्यावेळी महास्वातंत्र्याचा उदय होतो आणि परमप्रकाशाबरोबर अद्वैतभावात स्थिती प्राप्त होते. हेच पूर्णतेचे पूर्वरूप आहे.

येथपर्यन्त यज्ञाच्या रहस्यार्थाची थोडीथोडी माहिती पाहिली. जरी सकाम कर्मकाण्डी आणि असाधारण जनतेची यज्ञाच्या स्वरूपासंबंधी आणि उद्देश्यासंबंधी कोणतीही कल्पना असली तरी निष्काम भावाने ज्या यज्ञाचे अनुष्ठान केले जाते त्याचे तात्पर्य त्यापेक्षा कितीतरी गंभीर असते. पंचकोषांच्या भेदाच्या दृष्टीने अथवा सुषुम्णेच्या अन्तर्वाहिनी ऊर्ध्वगतीच्या दृष्टीने एकच अद्वितीय लक्ष्य अध्यात्म मार्गाच्या भाग्यवान् पथिकांच्या समोर प्रकट होते. निष्काम कर्मरूप यज्ञाचा गूढतम आदर्श आत्मत्याग आहे. आत्म-साक्षात्काराच्या बरोबरच स्वस्वरूपामध्ये स्थिती प्राप्त होणे हे आत्मयज्ञाचे चरम अर्थात् सर्वश्रेष्ठ फल आहे. यज्ञाच्या आदर्शभूत उत्कर्षाचा या परमलाभाच्या ( "यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः।" ) दृष्टीनेच सूज्ञ लोकांनी निर्णय घेतला आहे.

परन्तु जोपर्यन्त परम सौभाग्य उदित होत नाही तोपर्यन्त कोणाचीही या यज्ञाच्या महान् लक्ष्याकडे दृष्टी जात नाही. ज्यांना ही दृष्टी प्राप्त होते व जे या यज्ञाचे अनुष्ठान करतात ते असे म्हणतात की –

**यत्रेन्धनं द्वैतवनं मृत्युरेव महापशुः ।**
**अलौकिकेन यज्ञेन तेन नित्यं यजामहे ।। (भट्ट श्रीवीरवामनक)**

ज्या यज्ञात द्वैतवन हे इन्धन आहे व मृत्यू हा महापशू आहे असा अत्यन्त उच्च आदर्श असलेला अलौकिक यज्ञ समजावून घेण्याला क्लेश होत नाहीत. यासंबंधी आचार्य श्री. अभिनव गुप्त यांनी असे म्हटले आहे की, "ज्यांचा हा शेवटचा जन्म आहे आणि ज्यांच्यावर चित्-शक्ती सुप्रसन्न झाली आहे अशा एकमात्र विरळचा महात्म्याच्या हृदयातच अशा प्रकारच्या रहस्यमय यज्ञाचे स्वरूप प्रतिफलित होते. साधारण लोकांना ही गोष्ट बुद्धिगम्य असत नाही.

**एष यागविधिः कोऽपि कस्यापि हृदि वर्त्तते ।**
**यस्य प्रसीदेच्चिच्चक्रं द्रागपश्चिमजन्मनः ।।**

परन्तु उपरोक्त महान् आदर्शाबरोबर सम्बद्ध असलेली अशी यज्ञासंबंधीची आणखी एक दृष्टी आहे. " शास्त्रामध्ये अनेक ठिकाणी असे सांगितले आहे की, यज्ञ हा विश्वाच्या रक्षणाचा श्रेष्ठतम उपाय असल्यामुळे त्याचे " विष्णू "च्या रूपात वर्णन केले गेले आहे." श्रीभगवन्तांनी श्रीमद् भगवद्गीतेमध्ये (३–१०–१६) असे म्हटले आहे की, सृष्टीच्या आरम्भापासूनच श्रीब्रह्मदेवाने यज्ञाच्या बरोबर मनुष्यांना सम्बद्ध करून त्यांची रचना केली. तेथे ते असे म्हणतात की, देवतांची भावना करणे अर्थात् हविर्द्रव्याच्या द्वारा देवतांचे संवर्द्धन करणे हे मनुष्याचे कर्तव्य आहे. अशा प्रकारे मनुष्यांच्या द्वारा संवर्द्धित झालेल्या देवतांनी मानवांचे कल्याण करणे अर्थात् त्यांची तृप्ती करणे

व त्यांना अपेक्षित असलेले त्यांचे सर्व भोग देणे हे त्यांचे कर्तव्य आहे. ही सर्व देव-प्रदत्त सम्पत्ती देवतांच्या उद्देशाने अर्पण न करता तिचा नुसता उपभोग घेण्याने त्यांचे ऋणी व्हावे लागते. अशा रीतीनें परस्पर भावनेच्या द्वाराच विश्वचक्र चालते. जगताचे कल्याण करणाऱ्या ब्रह्मदेवानेच ही महानीती सृष्टीच्या प्रारंभी प्रचलित केली. त्याने कोणालाही स्वत:बद्दल आसक्ती ठेवण्यास सांगितले नाही. माणसांनी आपल्या कल्याणाकरिता प्रार्थना न करता देवतांच्या कल्याणाकरिता प्रार्थना करावी आणि देवतांनी आपल्या कल्याणाकरिता भावना न करता मनुष्यांच्या कल्याणाकरिता भावना करावी हेच परमार्थ कर्म आहे. जीवाच्या बरोबर श्रीभगवन्ताच्या आन्तरिक सम्बन्धाच्या दृष्टीनेही हीच नीती दृष्टीस पडते; कारण की, जो भक्त अनन्यचित्त होऊन श्रीभगवन्ताचे ध्यान करतो आणि ज्याला आपल्या स्वत:संबंधी चिन्तन करण्यास वेळ मिळत नाही त्याचा योगक्षेम श्रीभगवान् स्वत: चालवितात अर्थात् ते स्वत: आपल्या भक्ताची चिन्ता करतात. यावरून हे स्पष्टपणे दिसून येते की, जे लोक आपल्या व्यक्तिगत भावनेने आपल्या इच्छा-पूर्तीचा प्रयत्न करतात आणि जे आपल्या क्षुद्र अहंकाराच्या अधीन होऊन स्वत:च आपल्या सर्व त्रुटी दूर करण्याकरिता प्रवृत्त होतात त्यांच्याकरिता विशेष रूपाने चिन्ता करण्याला श्रीभगवन्ताला वेळ असत नाही अर्थात् श्रीभगवान् त्याचा सर्व भार घेत नाहीत. याचा अर्थ असा आहे की, जे खऱ्या यज्ञार्थ कर्मापासून परावृत्त होतात, जे स्वार्थ चिन्तेमध्ये अगदी लीन असतात, ज्यांचे अन्त:करण दुसऱ्यांच्या चिन्तेमध्ये मग्न होत नाही व जे श्रीभगवन्ताच्या द्वारा परिचालित अशा मंगलमय यज्ञात्मक जगत्चक्राचे अनुसरण करीत नाहीत त्या इन्द्रियाराम व्यर्थजीवन व्यक्तींकरिता विश्वसंस्थानात

कोणतेही विशिष्ट स्थान असत नाही. या सर्व लोकांना कालचक्रात भरडले जाणे भाग पडते. कालचक्र हे ब्रह्मचक्राच्या अन्तर्गतच आहे. याकरिता अशा प्रकारे भरडले जाण्याच्या फलाचाही परिणाम शुभावह होतो; कारण की, त्यामुळेच योग्यवेळी त्यांच्या सत्य-दृष्टीचा उन्मेष होतो आणि ते सत्यभावाने पूर्णपणे आप्लवित होण्यास समर्थ होतात.

"सर्वं वेद्यं हव्यम्, इन्द्रियाणि स्रुचः, शक्तयो ज्वालाः, स्वात्मा शिवः पावकः, स्वयमेव होता।" (परशुरामकल्पसूत्र १।२६)

या विश्वहोमाचे किंवा सर्व त्यागाचे वर्णनच पुढील पद्यात कोणी एका महापुरुषाने केले आहे–

"अन्तः प्रभास्वति निरन्तरमेधमाने
मोहान्धकारपरिपन्थिनी संविदग्नौ।
कस्मिंश्चिदद्भुतमरीचिविकासभूम्नि
विश्वं जुहोमि वसुधादिशिवावसानम्।"

याचा अर्थ असा आहे की, पृथ्वी तत्त्वापासून शिवतत्त्वा-पर्यन्तच्या ३६ तत्त्वांची आणि त्यांनी रचलेल्या सम्पूर्ण विश्वाची मी या संविद् अग्नीमध्ये अर्थात् विशुद्ध महाचैतन्यरूप अग्नीमध्ये आहुती देतो. महान्धकाराचा विनाश करणारे आणि अलौकिक किरणे फैलाविणारे हे अग्निदेव माझ्या हृदयात प्रकाशित-प्रदीप्त होत आहेत. जे महान् अग्निदेव शिवतत्त्वाला गिळून टाकू शकतात, ते तत्त्वातीत अखण्ड प्रकाशच आहेत, यात काहीच शंका नाही.

ज्याच्यामध्ये कोणाचेही कोणतेही स्वरूप कधीही लुप्त होत नाही त्या परमसाम्यमय अखण्डप्रकाशात सर्व देश, सर्व काल, स्थूल आणि सूक्ष्म इत्यादि सर्व वस्तू आपले आपले वैशिष्टच

कायम ठेवून नेंहमी अभिन्नरूपाने विद्यमान असतात. योगवासिष्ठ-रामायण (निर्वाण, उत्तरार्द्ध, सर्ग १२५-१२-१४) मध्ये असे म्हटले आहे की–

अतीतं वर्त्तमानं च भविष्यत् स्थूलमप्यणु ।
तथा दूरमदूरं च निमेषः कल्प एव च ।।
स्वरूपमजहत्येव सामान्ये भाति सर्वदा ।
सर्वात्मनि स्थितान्येव ...... ।।

याचा अर्थ असा आहे की, भूत, भविष्य आणि वर्तमान, दूर आणि जवळ, निमेष आणि कल्प–हे सर्व अव्यक्त स्वरूपात सत्ता-सामान्यरूपी सर्वात्म्यामध्ये नित्य राहात असतात.

ज्योतिष्टोमादि काम्य कर्मांमुळे चिरस्थायी स्वर्गादि भोग आणि ऐश्वर्य सिद्ध झाल्यावरही जरा, जन्म आणि मृत्यूच्या दुःखापासून सुटका होत नाही. याकरता श्रुतीने स्पष्ट रूपात सकाम यज्ञाची निन्दा केली आहे–

प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म ।
एतच्छ्रेयो येऽभिनन्दन्ति मूढा जरामृत्युं ते पुनरेवापि यन्ति ।।

★ ★ ★

अशा रीतीने या प्रांतात श्रीस्वामीमहाराजांचा संचार चालू असताना प्रत्येक गावी मोठाच समारंभ होत असे; कारण श्रीस्वामी-महाराजांसारख्या देदिप्यमान, दिव्य, अलौकिक, लोकोत्तर व अनुपमेय देवपुरुषाच्या दर्शनाने सर्व लोक अगदी भारावून गेल्यामुळे त्यांच्या चरणी त्यांची अपूर्व श्रद्धा बसली होती. त्यामुळे प्रत्येक गावात त्यांचे आगमन वाजत–गाजत मिरवणुकीने होऊ लागले. श्रीस्वामीमहाराजांना अशा तऱ्हेचा थाटमाट आवडत नसे; पण

या स्थूल अशा लौकिक गोष्टींमुळे सर्वांची देवावरील व धर्मावरील श्रद्धा वृद्धिगत होत आहे हे पाहून, त्यांची श्रद्धायुक्त अन्तःकरणे न दुखविणे हेच योग्य होय, असा विचार करून ते हे मान्य करीत असत. त्यामुळे जे गाव सोडून श्रीस्वामीमहाराज जात असत त्या गावचे लोक चौघडा-वाजंत्री वाजवीत त्यांना मिरवणुकीने पुढील गावाच्या सीमेपर्यन्त पोहोचवीत असत. तेथे पुढील गावची मंडळी अगोदरपासूनच सीमेवर वाद्ये घेऊन स्वागतासाठी हजर असत. श्रीस्वामीमहाराज रात्री किंवा दिवसा अशा कोणत्याही वेळा जावयास निघाले व आले; तरी त्यांच्यापुढे वाजंत्री-चौघडा झडत होता. सारांश, श्रीस्वामीमहाराजांचा या प्रदेशातील संचार हा रात्रंदिवस वाद्यांच्या गजरात चालला होता असे म्हटले तर त्यात काहीच वावगे होणार नाही.

श्रीस्वामीमहाराजांच्या उत्सवाच्या वैभवाचे हे वर्णन वाचले म्हणजे श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी चाफळमध्ये श्रीराम-प्रभूचे देवालय बांधून जो उत्सव सुरू केला त्या संबंधी आपल्या "डफगाण्यामध्ये" जे वर्णन केले आहे त्याची आठवण झाल्या-शिवाय राहात नाही. ते असे म्हणात की—

भोंवता डोंगराचा फेर। मध्यें देवाचें शिखर।
पुढें मंडप सुंदर। नव खणांचा ॥ १ ॥
चहुं खांबांवरी रचना। वर त्याच वीस कमाना।
काम कटाव नयना। समाधान ॥ २ ॥
नाना तरु आंबे बनें। दोहींकडे वृंदावनें।
वृंदावनें जगज्जीवनें। वस्ती केली ॥ ३ ॥
पुढें उभा कपिवर। पूर्वेकडे लंबोदर।
खालीं दाटलें दरबार। ठायीं ठायीं ॥ ४ ॥

दमामे चौघडे वाजती । धडाके भांडयांचे होती ।
फौजा भक्तां साजती । ठायीं ठायीं ॥ ५ ॥
महिमरातबे निशाणें । मेघडंबरें सूर्यपानें ।
पताका छत्र्या सुखासनें । दिंडया विझणे कुंचे ॥ ६ ॥
काहळें कर्णे बुरुंग बांकें । नाना ध्वनीं गगन झांके ।
बहु वाद्यांचे धबके । परोपरी ॥ ७ ॥
टाळ मृदंग उपांग । ब्रह्मविणे चुटक्या चंग ।
तानमानें माजें रंग । हरिकथेसी ॥ ८ ॥
घंटा घाट शंख भेरी । डफडीं पावे वाजंतरीं ।
भाट गर्जती नागरी । परोपकारी ॥ ९ ॥
उदंड यात्रेकरू आले । रंगीं हरिदास मिळाले ।
श्रोते वक्ते कथा चाले । भगवंताची ॥ १० ॥
नाना पुष्पमाळा तुरे । पाहो जातां भडस पुरे ।
रंग स्वर्गींचा उतरे । ठायीं ठायीं ॥ ११ ॥
गंध सुगंध केशरें । उदंड उधळिती धूसरें ।
जगदंतरीं हरिहरें । वस्ती केली ॥ १२ ॥
दिवटया हिलाल चंद्रज्योती । नळे अरडत ऊठती ।
बाण हवाया झरकती । गगनामध्यें ॥ १३ ॥
उदंड मनुष्यांचे थाटे । दिसताती लखलखाटे ।
एकमेकांसी बोभाटें । बोलाविती ॥ १४ ॥
उदंड उजळल्या दीपिका । नामघोष करताळिका ।
कित्येक म्हणती ऐका ऐका । ऐसे शब्द होती ॥ १५ ॥
खिरापतीची वांटणी । तेथें जाहलीसे दाटणी ।
पैस नाहीं राजांगणीं । दाटी जाहली ॥ १६ ॥

रंगमाळा निरांजनें। तेथें वस्ती केली मनें।
दिवस उबावला सुमनें। कोमाइलीं ॥ १७ ॥
रथ देवाचा ओढिला। यात्रेकरां निरोप जाला।
पुढे जावयाचा गलबला। ठायीं ठायीं ॥ १८ ॥
भक्तजन म्हणती देवा। आता लोभ असूं द्यावा।
धन्य सुकृताचा ठेवा। भक्ति तुझी ॥ १९ ॥
दास डोंगरीं राहतो। यात्रा देवाची पाहतो।
देव भक्तासवें जातो। ध्यानरूपें ॥ २० ॥

  

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचा या भागात संचार चालू असताना ते जितूरवरून पूर्णानदीच्या तीरावरील बामणी या गावी जात असताना रस्त्यातच एका मारुतीच्या देवळात श्रीहनुमानजयंती साजरी करून ते दुपारी त्या गावी पोहोचले. त्या काळात चंद्रग्रहण येत असल्यामुळे श्रीस्वामीमहाराज ते ग्रहण करून चार दिवस बामणी या गावीच राहिले. तेथून निघून ते पाथरीस आले. यावेळी त्यांच्या बरोबर पुष्कळ मंडळी होती. "श्रीगुरुदेवदत्त, श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज की जय," असा जयघोष करीत मंडळी चालली होती.

श्रीस्वामीमहाराज पाथरी येथे आल्यावर पाथरी-गोपेगाव या रस्त्यावर राहणारे एक श्रीमंत गृहस्थ श्री. बाळेराव चौधरी हे त्यांच्या दर्शनासाठी आले. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर आपली व्यावहारिक व्यथा त्यांच्या चरणी निवेदन करताना ते असे म्हणाले की, "प्रभो! आमचे वडिलोपार्जित एक शेत असून ते अद्यापपर्यन्त पडिक आहे. या शेतात नांगर धरून जो कोणी शेती करण्याचा प्रयत्न करतो तो माणूस लगेच मृत होतो. या शेताचा

वापर फक्त गुरे चारण्यासाठी करण्यात येतो; मात्र त्या शेतातील गवत कापून नेण्याचा जर कोणी प्रयत्न केला तर चोराच्या मागे साप लागतो किंवा पोटदुखी सारख्या व्याधीने तो हैराण होतो. या सर्व कारणांमुळे या शेताच्या बाजूने नुसते फिरकावयास कोणीही तयार होत नाही. तरी आपण काहीतरी उपाय सांगून अशी कृपा करा की, ज्यामुळे या शेतामधील दोष दूर होऊन ते लागवडीसाठी उपयोगात आणता येईल."

श्री. बाळेराव चौधरी यांनी केलेली प्रार्थना ऐकून श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, "या शेतात पूर्वी एक फकीर मृत झाला असून तो जिंद (पिशाच्च) होऊन राहिला आहे. त्यामुळे तो तेथे कोणालाही पीक काढू देत न'ही. याकरिता त्याची या योनीतून सुटका होऊन शांती व्हावी म्हणून तुम्ही पुष्कळसे फकीर येथे बोलावून त्याच्याकडून या शेतावर नमाज पढवा आणि त्यांना पोटभर भोजन द्या. असे केले म्हणजे तो जिंद आपल्या योनीतून मुक्त होईल व तुम्हाला पीक मिळेल. असे प्रतीवर्षी करीत जा म्हणजे सर्व ठीक होईल." श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्री. बाळेराव चौधरी यांनी करताच ते शेत लागवडीस आले व त्यांना भरपूर उत्पन्न मिळू लागले.

श्रीस्वामीमहाराज पाथरीहून साखरामार्गे वऱ्हाडातील हिंगोली या गावात आले. या गावात पाण्याची नेहमी टंचाई भासत असे; कारण तेथे अगदी मोजक्याच विहिरी होत्या. त्यांपैकी एका विहिरीचे पाणी हे माणसांनाच काय; परन्तु कोणत्याही प्राण्यास पिण्यास योग्य नव्हते; कारण त्या विहिरीच्या पाण्यात किडे पडलेले होते. श्रीस्वामीमहाराज त्या विहिरीपाशी आल्यावर ते त्या विहिरीला असलेल्या पायऱ्या उतरून खाली गेले व आपल्या कमंडलूत पाणी

भरून वर आणून त्यांनी त्या पाण्याने आपले पाय धुतले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर असलेल्या सर्व लोकांनी हा प्रकार पाहिला व त्यांनी तत्काळ पुढे येऊन श्रीस्वामीमहाराजांना असे सांगितले की, "प्रभो! या विहिरीचे पाणी दूषित असून ते पिण्या-लायक व वापरण्यास योग्य नाही." श्रीस्वामीमहाराजांना लोकांनी असे सांगताच ते किंचित् हसले व गप्प बसले. त्यानन्तर ज्यावेळी लोकांनी त्या विहिरीच्या पाण्याकडे दृष्टी टाकली तेव्हा त्यांच्या असे लक्षात आले की, श्रीस्वामीमहाराजांनी त्या विहिरीच्या पाण्याला स्पर्श केल्यामुळे व त्या पाण्याने हातपाय धुतल्यामुळे त्यातील पाणी एकदम स्वच्छ व निर्मळ झाले आहे. अशा प्रकारे त्या पाण्यातील सर्व किडे नष्ट झाल्याने ते पाणी हिंगोली गावातील सर्व लोकांना वापरण्यास योग्य झाले. ही सर्व हकीकत हिंगोलीच्या एका माणसाने श्री. गंगाधरपंत वैद्य यांना कळविली होती.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांच्या स्पर्शात किती अद्भुत सामर्थ्य होते याचे प्रत्यन्तर आल्याशिवाय राहात नाही. जो स्पर्श एका क्षणात पाणी शुद्ध करू शकतो तो स्पर्श झाल्या-बरोबर जीव आपल्या मूळ शुद्ध ब्रह्मस्वरूपाला प्राप्त होत असेल यात तिल:प्राय शंका नाही. असे हे सामर्थ्य श्रीस्वामीमहाराजांच्या अनुग्रहात, सौरसात आणि स्नेहात सामाविलेले होते. यालाच शास्त्रकार स्पर्शदीक्षा असे म्हणतात. ही स्पर्शदीक्षा झाल्याबरोबर ध्रुवासारखा अज्ञबालक वेदांचीही बुद्धी कुंठित होईल असे स्तवन करू लागल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ज्ञानेश्वरीत" कथन केले आहे. ते असे म्हणतात की–

> ना तरी मधुवनीं ध्रुवासि केलें। जैसें कपोल शंखें शिवतलें।
> आणि वेदांचियेही मतीं ठेलें। तें लागला बोलों॥११.१८४॥

तैसा अनुग्रहो पैं राया। श्रीहरी केला धनंजया।
आतां कवणेकडेही माया। ऐसी भाष नेणेंचि तो ॥१८५॥
एकसरें ऐश्वर्यतेजें पाहलें। तया चमत्काराचें एकार्णव जाहलें।
चित्त समाजीं बुडोनि ठेलें। विस्मयाचिया ॥१८६॥
जैसा आब्रह्म पूर्णोदकीं। पव्हे मार्कंडेय एकाकीं।
तैसा विश्वरूप कौतुकीं। पार्थु लोळे ॥१८७॥
म्हणे केवढें गगन एथ होतें। तें कवणें नेलें पां केउतें।
तीं चराचरें महाभूतें। काय जाहलीं? ॥१८८॥
दिशांचे ठावही हारपले। अधोर्ध्व काय नेणों जाहलें।
चेइलिया स्वप्न तैसे गेले। लोकाकार ॥१८९॥
नाना सूर्यतेजप्रतापें। सचंद्र तारांगण जैसें लोपे।
तैसीं गिळिलीं विश्वरूपें। प्रपंचरचना ॥१९०॥
तेव्हां मनासी मनपण न स्फुरे। बुद्धि आपणपें न सांवरे।
इंद्रियांचे रश्मी माघारे। हृदयवरी भरलें ॥१९१॥
तेथ ताटस्थ्या ताटस्थ्य पडलें। टकासी टक लागलें।
जैसें मोहनास्त्र घातलें। विचारजातां ॥१९२॥

अर्थ :– ज्यावेळी श्रीविष्णूंनी मधुवनात जाऊन ध्रुवाला दर्शन दिले त्यावेळी भगवान् श्रीविष्णूंची स्तुती करावी अशी उत्कट इच्छा ध्रुवाच्या मनात निर्माण झाली; पण ती स्तुती कशी करावी हे त्याला कळेना. त्यावेळी श्रीविष्णूंनी ध्रुवाच्या गालाला आपल्या शंखाचा स्पर्श केला. त्याबरोबर तो वेदांचीही बुद्धी जेथे कुंठित होते अशी स्तुती करू लागला. ॥ १८४ ॥ त्याप्रमाणे श्रीहरीने धनंजयावर जो अपूर्व अनुग्रह केला त्यामुळे त्याची माया कोणीकडे गेली तिचा पत्ताही तो जाणेनासा झाला. ॥१८५॥ त्यावेळी एकदम ऐश्वर्य तेजाचा उजेड पडून प्रलयकाली जलमय झाल्याप्रमाणे

त्याला सर्वच चमत्कारमय दिसू लागले व त्याचे चित्त आश्चर्याच्या गर्दीत निमग्न झाले. ॥ १८६ ॥ नदीच्या काठी संध्या करीत बसलेल्या मार्कण्डेय ऋषींनी ज्यावेळी श्रीभगवन्तांना "विश्वरूप दाखवा" अशी विनंती केली त्यावेळी पृथ्वीपासून ब्रह्मलोकापर्यन्त सर्वत्र पाणीच पाणी होऊन त्यात ते एकटे मार्कण्डेय ऋषीच ज्याप्रमाणे पोहू लागले त्याप्रमाणे विश्वरूपाच्या कौतुकात पार्थ निमग्न झाला. ॥ १८७ ॥ त्यावेळी अर्जुनाला असा प्रश्न पडला की, या ठिकाणी केवढे मोठे आकाश दृष्टीस पडत होते, ते कोणी कोणीकडे नेले ? तसेच हे स्थावर जंगमादि पदार्थ व महाभूते कोणीकडे गेली ? ॥ १८८ ॥ सर्व दिशांचा मागमूसही राहिला नाही. वर आणि खाली हे दोन्हीही कोण जाणे कोणीकडे गेली ? आणि जागृत झालेल्या मनुष्यास ज्याप्रमाणे स्वप्नांत पाहिलेला पदार्थ दृष्टीस पडत नाही त्याप्रमाणे एवढा वेळ दृष्टीस पडणारी लोकाकारात्मक सृष्टी नाहीशी झाली. ॥१८९॥ अथवा ज्याप्रमाणे सूर्याच्या तेजाच्या सामर्थ्याने चंद्रासह नक्षत्रांचा समुदाय लोपून जातो त्याप्रमाणे ही सृष्टीची सर्व रचना या विश्वरूपाने गिळून टाकली. ॥ १९० ॥ त्यावेळेस त्याच्या मनाला मनपणच स्फुरेनासे झाले म्हणजे मन संकल्पविकल्परहित झाले, बुद्धी आपली आपणासच आवरेनाशी झाली व इन्द्रियांच्या वृत्ती माघारी फिरून अंतर्मुखाने हृदयात साठविल्या गेल्या. ॥ १९१ ॥ तेव्हा स्तब्धपणाला स्तब्धता प्राप्त झाली, एकाग्रतेस एकाग्रता आली आणि जणूकाही सर्व ज्ञानाला मोहनास्त्रच घातले आहे असे झाले. ॥१९२॥

हा प्रसंग मुळात महर्षी श्रीवेदव्यास प्रणीत "श्रीमद्‌भागवत महापुराणातील" चतुर्थ स्कंधाच्या नवव्या अध्यायात आला आहे.

ध्रुवाला श्रीविष्णूंचे दर्शन झाल्यावर त्याला त्यांची स्तुती करण्याची इच्छा झाली; परन्तु त्याला काहीही येत नव्हते. त्यावेळी श्रीविष्णूंनी त्याची इच्छा जाणून त्याच्या गालाला आपल्या शंखाचा स्पर्श केला. त्याबरोबर त्यांच्या ठिकाणचा शक्तिस्वरूप सरस्वतीचा स्रोत उद्भूत होऊन तो श्रीविष्णूंची स्तुती करू लागला. याचे वर्णन करताना महर्षी श्रीव्यास असे म्हणतात की –

स तं विवक्षन्तमतद्विदं हरिर्ज्ञात्वास्य सर्वस्य च हृद्यवस्थितः ।
कृतांजलिं ब्रह्ममयेन कम्बुना पस्पर्श बालं कृपया कपोले ॥४-९-४॥
स वै तदैव प्रतिपादितां गिरं दैवीं परिज्ञातपरात्मनिर्णयः ।
तं भक्तिभावोऽभ्यगृणादसत्वरं परिश्रुतोरुश्रवसं ध्रुवक्षितिः ॥ ५ ॥

ध्रुव उवाच –

योऽन्तः प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्तां ।
संजीवयत्यखिलशक्तिधरः स्वधाम्ना ॥
अन्यांश्च हस्तचरणश्रवणत्वगादीन् –
प्राणान्नमो भगवते पुरुषाय तुभ्यम् ॥ ६ ॥

अर्थ :– ध्रुव हात जोडून श्रीभगवन्तासमोर उभा राहिला. त्याला त्यांची स्तुती करण्याची इच्छा होती; परन्तु स्तुती कोणत्या प्रकारे करावी याचे त्याला अल्पवयामुळे ज्ञान नव्हते. सर्वान्तर्यामी श्रीहरींनी त्याच्या मनातील ही गोष्ट जाणून अत्यन्त कृपापूर्वक आपल्या वेदमय शंखाचा त्याच्या गालाला स्पर्श केला. ध्रुवाच्या गालाला श्रीहरींच्या शंखाचा स्पर्श झाल्याबरोबर त्याला वेदमय दिव्यवाणी प्राप्त झाली व जीव–ब्रह्माच्या ऐक्याच्या स्वरूपाचाही निश्चय प्राप्त झाल्यामुळे त्याच्या मनात भक्तीच्या योगाने श्रीहरीं-विषयी प्रेम उत्पन्न झाले. त्यानन्तर लवकरच अढळपद प्राप्त

करणारा तो ध्रुव श्रीहरींची विशाल कीर्ती श्रवण करून स्थिर-चित्ताने त्यांची स्तुती करू लागला.

ध्रुव म्हणाला, " हे प्रभो ! आपण सर्वशक्तिसंपन्न अर्थात् सर्व शक्तींना धारण करणारे आहात. आपणच आपल्या चैतन्यशक्तीने माझ्या अन्तःकरणात प्रवेश करून आपल्या तेजाने माझ्या निद्रिस्त वाणीला जागृत करीत आहात. त्याचप्रमाणे हात, पाय, कान, त्वचा इत्यादि सर्व इन्द्रियांना व प्राणांना चेतना देत आहात. आपण सर्वान्तर्यामी व षड्गुणैश्वर्यसंपन्न आहात. मी आपल्याला नमस्कार करतो.

ध्रुवाच्या ठिकाणी श्रीहरींच्या शंखस्पर्शाने हा जो शक्तीचा स्रोत उत्पन्न झाला त्यालाच भक्ती असे म्हणतात. ही भक्ती योग-रूपच आहे. अशी भक्तीच पराभक्ती होय. बाकी सर्व भक्तीचा व्यापार व बाजार होय. हे अगदी विपाइले म्हणजे आगळे, वेगळे व निराळे आहे. महर्षी श्रीनारदांच्या भाषेत " प्रकाश्यते क्वापि पात्रे ॥५३॥ भक्तिसूत्रे ॥ " म्हणजे अनिर्वचनीय प्रेमस्वरूप क्वचित् एखाद्या श्रीसद्गुरुकृपेला पात्र झालेल्या भाग्यवानाच्या ठिकाणी प्रकाशमान होते, असे आहे. यासाठी श्रीकृष्णनाथांसारखे शक्ति-पाताने म्हणजे कृपेने शक्तिसंचार करून सिद्धयोगाची, महायोगाची किंवा सहजयोगाची दीक्षा देणारे श्रीसद्गुरू भेटावे लागतात. अर्जुनाला ते भेटले. त्यांनी त्याला स्पर्शदीक्षा दिली. त्यामुळे त्याच्या ठिकाणी सुखाचा पूर आला. त्याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज " ज्ञानेश्वरीत " असे म्हणतात की—

मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु ।
आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो ॥ १८-१४१८ ॥

न पवतां जयातें। काखे सूनि बुद्धीतें।
बोलणें मागौतें। वोसरलें ॥ १४१९ ॥
ऐसें जें कांहीं येक। बोला बुद्धीसिहीं अटक।
तें द्यावया मिष। खेवाचें केलें ॥ १४२० ॥
हृदया हृदय येक जाले। ये हृदयींचें तें हृदयीं घातलें।
द्वैत न मोडितां केलें। आपणाऐसें अर्जुना ॥ १४२१ ॥
दीपें दीप लाविला। तैसा परिष्वंगु तो जाला।
द्वैत न मोडितां केला। आपणपें पार्थु ॥ १४२२ ॥
तेव्हां सुखाचा मग तया। पूरु आला जो धनंजया।
तेथ वाडु तऱ्ही बुडोनियां। ठेला देवो ॥ १४२३ ॥
सिंधू सिंधूते पावों जाये। तें पावणें ठाके दुणा होये।
वरी रिगे पुरवणिये। आकाशही ॥ १४२४ ॥
तैसें तयां दोघांचें मिळणें। दोघां नावरे जाणावें कवणें।
किबहुना श्रीनारायणें। विश्व कोंदलें ॥ १४२५ ॥

अर्थ :– श्रीकृष्णांनी कंकणांनी युक्त असलेला आपला श्यामवर्णाचा उजवा हात पुढे करून आपल्याला शरण आलेल्या भक्तराज अर्जुनाला आलिंगन दिले. जे आत्मस्वरूप बुद्धीला व शब्दाला आकलन न झाल्यामुळे जेथे बोलणे खुंटून जाऊन ते मागे फिरते, ते स्वसंवेद्य आत्मस्वरूप अर्जुनाला देण्याकरिता श्रीकृष्णांनी आलिंगनाचे निमित्त केले. त्यावेळी श्रीकृष्णांचे हृदय व अर्जुनाचे हृदय एकमेकांना भिडले. श्रीकृष्णांनी कृपेने शक्तिसंक्रमण करून आपल्या हृदयातील ज्ञान अर्जुनाच्या हृदयात घातले व देवभक्तांचे द्वैत न मोडता अर्जुनाला आपल्यासारखे अर्थात् आत्मरूप केले. एका दिव्याने दुसरा दिवा लावल्यावर ज्याप्रमाणें दिव्यांचे प्रतीतीमात्र द्वैत कायम राहून प्रकाशदृष्टचा ऐक्य मोडत नाही त्याप्रमाणेच या

आलिंगनाचा प्रकार होऊन द्वैत न मोडता श्रीकृष्णांनी पार्थाला आपल्या स्वरूपाशी मिळवून घेतले. मग त्यावेळेस अर्जुनाला त्या आनन्दाच्या सुखाचा जो पूर आला त्या पुरात भगवान् श्रीकृष्ण जरी सर्वव्यापक व सर्वश्रेष्ठ असले तरी तेही बुडून गेले. ज्याप्रमाणे समुद्राला समुद्र मिळाल्यावर पाणी दुप्पट वाढते व त्या वाढीमुळे आकाशही व्यापून जाते त्याप्रमाणे श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या आलिंगनामुळे उपस्थित झालेले प्रेम दोघांनाही आवरेनासे झाले. हे प्रेम कोणाला जाणणे शक्य आहे? खरोखर त्यावेळी सर्व विश्व नारायणरूप होऊन गेले.

अशा रीतीने हिंगोली गावातील लोकांची पाण्याची सोय करून श्रीस्वामीमहाराज श्रीगोदावरीनदीच्या तीरावरील गोंड या गावी आले. तेथे श्रीरेणुकामातेचे स्थान आहे. त्या ठिकाणी जाऊन श्रीस्वामीमहाराजांनी श्रीरेणुकामातेला वन्दन केले. श्रीस्वामीमहाराज या गोंड गावी मुद्दाम आले होते; कारण या गावी श्री. अंबादास कायर या नावाचे ब्राह्मण गृहस्थ, जो महारुद्र स्वाहाकार करणार होते, त्याला त्यांना उपस्थित राहावयाचे होते. श्री. अंबादास यांनी पूर्वीच पाथरी येथे श्रीस्वामीमहाराजांची महारुद्र स्वाहाकार करण्यासाठी परवानगी घेतली होती आणि श्री. कायर यांच्या इच्छेप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनीही या यज्ञस्वाहाकाराला उपस्थित राहण्याचे मान्य केले होते. या महारुद्रस्वाहाकारामध्ये पाथरी गावच्या श्री. बाळेराव चौधरी, श्री. श्यामराव चौधरी वगैरे सर्व मंडळींनी पुढाकार घेतला होता. या यज्ञाच्या पूर्णाहुतीच्या दिवशी श्री. श्यामराव चौधरी यांच्या घरची सर्व मंडळी यज्ञनारायणाच्या व श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आली होती. श्री. श्यामराव त्यांच्या घरच्या सर्व मंडळींमध्ये त्यांची दोन वर्षांची मुलगीही

आली होती. ही मुलगी या प्रसंगी एकाएकी आजारी पडून मृत्यू पावली. त्यामुळे यज्ञामध्ये अकस्मात् मोठे विघ्न निर्माण झाले. सगळीकडे शोकाचे वातावरण पसरले. अशा स्थितीतच ब्राह्मणांना द्यावयाच्या दक्षिणेचे पैसे त्यांच्याकडे असल्यामुळे ते देण्यासाठी त्यांनी यज्ञमंडपात यावे म्हणून एकजण त्यांना बोलवावयास तेथे गेले; परंतु तेथील एकंदर प्रसंग पाहून "आपणास दक्षिणेचे पैसे देण्यासाठी बोलाविले आहे," इत्यादि निरोप न देताच ते गृहस्थ परत आले व त्यांनी तेथे घडलेली एकंदर सर्व हकीकत श्रीस्वामी-महाराजांच्या कानावर घातली. श्रीस्वामीमहाराजांना एकंदर सर्व खरी हकीकत समजताच ते स्वतःच यज्ञमंडपातून उठून श्री. श्याम-राव चौधरी यांची मुलगी जेथे मृत होऊन पडली होती तेथे गेले व त्यांनी आपल्या कमंडलूतील पाणी त्या मुलीच्या अंगावर शिंपडले. श्रीस्वामीमहाराजांच्या हस्तस्पर्शाने पवित्र झालेले ते दिव्य व अमृतासम असलेले पाणी त्या मुलीच्या अंगावर पडताक्षणीच त्या मुलीचा श्वासोच्छ्वास सुरू झाला व ती थोडयाच वेळात सावध होऊन आपल्या आईचे स्तनपान करू लागली. हे अघटित घडलेले आश्चर्य व यज्ञाच्या प्रसंगी उपस्थित झालेले संकट दूर झालेले पाहून तेथे जमलेल्या सर्वच मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांच्या नावाचा जयजयकार केला.

हा सर्व श्रीस्वामीमहाराजांच्या अद्भुत व दिव्य अशा हस्त-स्पर्शाचा महिमा होता, यात तिळमात्र शंका नाही. ज्या हातातील नुसत्या पाण्याच्या शिंपडण्याने मृतही जीवित होऊन उठतात त्या हाताने जर स्पर्शदीक्षा झाली तर मुमुक्षू साधकाला आत्मज्ञानाची प्राप्ती होऊन मोक्ष मिळाल्याशिवाय राहणार नाही. या दृष्टीनेच श्रीसद्गुरू स्पर्शदीक्षा देऊन अविद्येचा अंधार दूर करून आत्मबोधाचा

उदय कसा करतात हे सांगताना "अमृतानुभव" या ग्रंथात श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की –

**अविद्येचें काळवखें। स्वबोध सुदिने फांके।**
**शिवतलेंनि प्रसादाकें। जयाचेनि ॥ २.१० ॥**

श्रीसद्गुरूंच्या कृपाप्रसादारूपी सूर्यानें स्पर्श केला असता म्हणजे त्यांच्या हस्तस्पर्शाने शक्तिपातयोगदीक्षा झाली असता आत्मबोधरूपी दिवसाचा उदय होऊन म्हणजे साधकाची अनादि निद्रिस्त कुंडलिनी शक्ती जागृत होऊन प्राणांची सुषुम्णान्तर्गत अन्तर्गती सुरू झाल्यानें अविद्येचा अंधार म्हणजे संसारोन्मुख वासनेची बहिर्गती नाहीशी होते.

अशा प्रकारची स्पर्शदीक्षा ही नुसती कल्पनेतील गोष्ट, अर्थवाद किंवा अनुभूतिशून्य वस्तू नसून ती शास्त्रीय कसोटीवर घासलेली, परंपरेने प्राप्त झालेली व श्रीसद्गुरूंनी अनुभूतीने दिलेली गोष्ट असल्याने प्रत्यक्ष डोक्यावर हात ठेवून श्रीसद्गुरू निवृत्तिनाथमहाराजांनी आपल्याला स्पर्शदीक्षा देऊन ज्ञानाचे बीज आपल्या ठिकाणी कसे रुजविले, याचे कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज "ज्ञानेश्वरीत" असे म्हणतात की–

**ज्ञानदेव म्हणे मी चाडें। सद्गुरूंनं केलें कोडें।**
**माथां हात ठेविला तें फुडें। बीजची वाइले ॥ ६.४९२ ॥**

**अर्थ :–** श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, ज्ञानरूप बीज पेरण्याकरिता श्रीसद्गुरूंनी मोठ्या कौतुकाने मला चाडे (पेरणीच्याकुरीवरचे भोकाचे लाकूड) केले व माझ्या मस्तकावर अत्यन्त कृपेने आपला हात ठेविला अर्थात् शक्तिसंक्रमणपूर्वक माझी आत्मशक्ती कुंडलिनी जागृत केली आणि अशा प्रकारे त्यांनी आत्मज्ञानाचे बीज माझ्या ठिकाणी पेरले; (कारण अनादि निद्रिस्त आत्मशक्ती

कुंडलिनी जागृत झाल्याशिवाय कोणालाही कधीही सामरस्यात्मक आत्मज्ञानानुभूती होणे शक्य नसते. )

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनीही श्रीसद्‌गुरूंच्या हस्तस्पर्शानेच ईश्वर प्रकट होऊन साधक जन्ममृत्यूच्या अतीत होतो, हे सांगून स्पर्शदीक्षेचे वर्णन करताना ग्रंथराज "दासबोधात" असे म्हटले आहे की–

सद्‌गुरूचेनि अभयकरें। प्रकट होईजे ईश्वरें।
जन्मदुःखें अपारें। नासूनि जाती ॥ ५.१.४० ॥

श्रीसद्‌गुरूंच्या या स्पर्शदीक्षेचे अपूर्वंत्र वर्णन करताना "श्रीएकनाथी भागवतातील यदू–अवधून संवादात" श्रीएकनाथमहाराज असे म्हणतात की –

तो अवधूत जाण दत्तात्रेय। तेणें आलिंगूनि यदुराया ॥
निजरूपाचा बोधू तया। अनुभवावया दीधला ॥ ९.४२९ ॥
दत्तात्रेयशिष्यपरंपरा। सहस्रार्जुन यदु दुसरा।
तेणे जनार्दनू तिसरा। शिष्य केला खरा कलियुगीं ॥४३०॥
गुरुप्राप्तीलागीं सर्वथा। थोर जनार्दनासी चिंता।
विसरला तीन्ही अवस्था। सद्‌गुरु चिंतितां चिंतनीं ॥४३१॥
देवो भावाचा भोक्ता। दृढ जाणोनी अवस्था।
येणें झालें श्रीदत्ता। तेणें हातु माथां ठेविला ॥ ४३२ ॥
हातु ठेवितांचि तत्काळ। बोधु आकळिला सकळ।
मिथ्या प्रपंचाचें मूळ। स्वरूप केवळ स्वबोधें ॥ ४३३ ॥

श्रीएकनाथमहाराजांनी उपरोक्त ओव्यातून आपली सिद्धयोगाची परंपरा स्पष्ट केली असून श्रीसद्‌गुरूंनी मस्तकावर हात ठेवताच सर्व बोध अर्थात् ज्ञान कसे प्राप्त होते हे स्पष्ट केले आहे. श्रीसद्‌गुरूंनी स्पर्शपूर्वक शक्तिसंक्रमण करून दिलेल्या ज्ञानाची

अपूर्वाई ही अशीच थोर असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्याचा फलासहित महिमा वर्णन करताना असे म्हटले आहे की—

हें असो दिठी जयावरी झळके। कीं हा पद्मकरु माथां पारुखे।
तो जीवचि परी तुके। महेशेंसीं ॥ १०.९ ॥

अर्थ :— हे असो. यापेक्षाही खरे असे आहे की, ज्याच्यावर श्रीसद्गुरूंची कृपादृष्टी पडते किंवा ज्याच्या मस्तकावर त्यांचा कमलासारखा कोमल वरदहस्त ठेवला जातो तो जीव असला तरी त्याला यामुळे श्रीमहेशांची साम्यता प्राप्त होते.

स्पर्शदीक्षेने जीव हा साक्षात् शिवच होतो; कारण श्रीसद्गुरूंचा पद्मकर हा साक्षात् शिवाचाच हस्त असून तो ब्रह्म व प्रपंच म्हणजे चेतन व जड हे वेगळे करणारा अर्थात् सर्व पाश छेदणारा असतो हे सांगताना शास्त्रकारांनी असे वर्णन केले आहे की —

ब्रह्मप्रपंच संयुक्ता शिवेनाधिष्ठितः शिवः।
पाशच्छेदकरः क्षेमी शिवहस्तः प्रकीर्तितः ॥

स्पर्शदीक्षेचे व श्रीसद्गुरूंच्या पद्मकराचे हे सामर्थ्य, श्रीकृष्णांनी श्रीउद्धवाला स्पर्शदीक्षा कशी दिली हे वर्णन करताना, श्रीएकनाथ-महाराज "श्रीएकनाथी भागवतात" असे म्हणतात की —

यालागीं कृष्ण जगजेठी। उद्धवाची पाठी थापटी।
अतिगुह्याची गुह्य गोष्टी। तुझे कृपेसाठीं मी बोलतों ॥११.१२७॥
पाठी थापटावयामिसें जाण। करीत स्वशक्तिसंचरण।
तेणें अद्वयबोधलक्षण। उद्धवासी जाण प्रकाशी ॥ १२८ ॥
ते कृष्णकृपेस्तव जाण। फिटलें उद्धवाचें दुर्लभपण।
सगुण निर्गुण एक कृष्ण। हे खूण संपूर्ण बाणली ॥२१.५२८॥
जाणोनी कृष्णाचें पूर्णपण। त्याचे लक्षोनि श्रीचरण।

धांवोनि उद्धवें आपण। घाली लोटांगण हरिचरणीं ॥५२९॥
तेव्हां सांवळा संकर्षण। चारी बाह्या पसरी श्रीकृष्ण।
उद्धवास प्रेमें उचलून। दीधलें आलिंगन स्वानंदें॥ ५३०॥
त्या आलिंगनाचें सुख। अनुभवी जाणती देख।
जो उद्धवासी झाला हरिख। त्याचा जाणता एक श्रीकृष्ण ॥५३१॥

या विषयासंबंधीची सर्व माहिती साधक-वाचकांना व्हावी म्हणून माझे सद्गुरू परमपूजनीय प्रातःस्मरणीय योगिराज सद्गुरू श्रीसन्त वामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांनी लिहिलेला "दैवी शक्तीचे संक्रमण" हा लेख परिशिष्ट क्र. २ मध्ये उद्धृत केला आहे, तो अवश्य पाहावा.

श्री. बाळेराव चौधरी व श्री. श्यामराव चौधरी यांची श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी अपरंपार भक्ती होती. त्यातच वरील प्रसंग घडून मृत मुलगीही जिवंत झाल्याने श्रीस्वामीमहाराजांच्या अपार व अपूर्व सामर्थ्याची प्रचीती येऊन या दोघांची भक्ती आणखीनच दृढ झाली होती. श्रीस्वामीमहाराजही या दोघांच्या भक्तीमुळे संतुष्ट झाले होते. अशा प्रकारे उभयतांच्या प्रेमाची वास्तविक स्थिती असल्यामुळे एके दिवशी श्री. श्यामराव चौधरी हे आपल्या दोन्ही पुरोहितबंधूंना घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या कडे गेले व त्यांनी त्यांच्या चरणी अशी प्रार्थना केली की, "प्रभो! आप्पा देव व आण्णा देव हे दोघे आमचे पुरोहित व उपाध्ये आहेत. त्या दोघांची आपल्याजवळ अरणे म्हणण्याची इच्छा आहे; तरी आपण त्यांची इच्छा पूर्ण करावी अशी आपल्या चरणापाशी माझी नम्र प्रार्थना आहे. आपण ह्या उभयतांची इच्छा पूर्ण कराल अशी मला खात्री वाटते."

श्रीस्वामीमहाराजांनी श्री. श्यामराव चौधरी यांची प्रार्थना

तत्काळ मान्य केली; कारण अधिकारी व्यक्तींना योग्य तो विषय शिकविण्यास श्रीस्वामीमहाराज नेहमीच उत्सुक व तयार असत. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज त्याच दिवशी त्या दोघांना घेऊन गोंड गावाजवळ असलेल्या आपेगावच्या अरण्यात गेले. तेथे एका कडुलिंबाच्या झाडाखाली बसून श्रीस्वामीमहाराजांनी ओळीने १७ दिवस त्या दोघांना अरणाची संथा दिली. संथा देण्याचे काम संपल्यानन्तर जेथे त्या दोघांना अरणाची संथा सांगितली होती, ती जमीन त्यांना गवत पसरवून जाळून टाकण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्या दोघांनी ती जमीन जाळल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना असे विचारले की, "महाराज! अशा प्रकारे ही जमीन जाळून टाकण्याचे कारण काय आहे?" हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना त्या गोष्टीचे कारण सांगताना असे म्हणालेकी, "या जागेवर बसून अरणे म्हटलेली असल्यामुळे गर्भिणी स्त्री, गाय, म्हैस येथे आल्यास त्यांचा गर्भपात झाल्याशिवाय राहणार नाही. असे काही विपरित घडू नये म्हणून ही जमीन दग्ध केली आहे. आता ही जमीन जाळली असल्यामुळे असे काही घडणार नाही."

ज्या कडुलिंबाच्या झाडाखाली बसून अरणे सांगितली त्या ठिकाणी श्रीदत्तात्रेयांच्या पादुका स्थापन करून तेथेच श्रीगांडामहाराजांना ठेवावे व ते स्थान प्रसिद्ध करावे असे श्रीस्वामीमहाराजांच्या मनात होते; परन्तु त्या गोष्टीला त्या शेताचा मालक कबूल झाला नाही व त्याने तेथे श्रीदत्तमंदिर बांधण्यास परवानगी दिली नाही. या ठिकाणी पादुका स्थापन झाल्यावर येथे यात्रा भरेल व गर्दीमुळे शेतीचे नुकसान होईल अशी त्या शेतकऱ्याला भीती वाटली असावी. श्रीगांडामहाराजांचा तेथे वास्तव्य करण्याचा योग नव्हता हेच खरे! यानन्तर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीगांडामहाराजांना गुंज या गावी

जाऊन राहण्यास सांगितले. पुढे श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे श्रीगांडामहाराजांनी संन्यास घेतला व ते गुंज या गावी जाऊन राहिले. कालौघात फाल्गुन वद्य १२ शके १८५० इ. स. १९२८ मध्ये त्यांचे तेथेंच देहावसान झाले. या गावी श्रीगांडामहाराजांनी श्रीदत्तात्रेयांच्या पादुका स्थापन केल्या असून तेथे त्यांनी एक मोठें श्रीदत्तमंदिरही बांधले. हल्ली तेथे मोठा उत्सव होत असतो.

श्रीस्वामीमहाराजांनी ज्या लिंबाच्या झाडाखाली बसून अरणाची संथा दिली होती त्या झाडाची पानें कालौघात गोड झाली. त्या वृक्षाचा सर्व कडवटपणा संपून तो सर्व वृक्षच मधुर बनला. एवढेच नव्हे; तर त्या वृक्षात अलौकिक सामर्थ्य उत्पन्न झाल्यामुळे अद्यापही लोक त्या झाडाची पाने श्रद्धेने औषध म्हणून नेतात आणि त्या पानांमुळे त्यांचे रोग कमी होत असल्याची प्रचीती त्यांना अद्यापही येते. याप्रमाणेच या लिंबाच्या झाडाला लोक आजतागायत नवस बोलत आले आहेत व ते फलद्रूप होत असल्याची प्रचीती लोक सध्याही घेत आहेत. या अद्‌भुत सामर्थ्यामुळेच या वृक्षाला "श्रीदत्ताचा लिंब" असे म्हणतात.

श्रीस्वामीमहाराज गोंड गावाहून निघाल्यावर गंगामसले या गावी आले व तेथून श्रीगोदावरीनदीच्या तीरावरील गुंज या गावी आले. गुंज हे गाव श्रीस्वामीमहाराजांना विशेष पसन्त पडले असावे; कारण येथे आल्यावर त्यांनी श्रीगांडामहाराजांना पुढील काळात येथे राहून साधन करण्याची आज्ञा केली. या आज्ञेप्रमाणे श्रीस्वामीमहाराज समाधिस्थ झाल्यावर श्रीगांडामहाराजांनी आपले उर्वरित आयुष्य गुंज या गावीच साधना करण्यात घालविले. येथेच त्यांनी श्रीदत्त-मंदिर स्थापन केले व "श्रीगुरुमूर्तिचरित्र" हे श्रीस्वामीमहाराजांचे ओवीबद्ध चरित्र लिहून आपल्या श्रीसद्‌गुरूंची वाङ्मयीन सेवा केली.

श्रीस्वामीमहाराज गुंजहून निघून देऊळगाव राजा येथे आले. या गावातील श्री. रंगनाथराव पुराणिक नावाच्या गृहस्थांना फार दिवस नाकातून रक्त पडण्याचा त्रास होत होता. त्यांनी आपली ही व्याधी दूर व्हावी म्हणून मिरज इत्यादि ठिकाणी जाऊन मोठमोठ्या वैद्यांना व डॉक्टरांना आपली प्रकृती दाखवून पुष्कळ उपचार केले; परन्तु काहीच गुण न आल्यामुळे ते अगदी उदास व दुःखी झाले होते. अशा व्याधिग्रस्त जर्जर अवस्थेत असताना आपल्या गावात एक थोर संत-महात्मे महापुरुष आले असल्याचे व ते जणूकाही दुसरे धन्वन्तरीच असल्याचे त्यांच्या कानावर आले. हे ऐकताच श्री. रंगनाथराव श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी त्यांच्याकडे गेले व त्यांनी आपली सर्व व्यथा त्यांच्या चरणी निवेदन केली. त्यांची ती व्यथा ऐकून व एकंदर अवस्था पाहून श्रीस्वामीमहाराजांना अत्यंत दया आली व त्यांनी त्यांना गंगावती नावाची वनस्पती दाखविली व तिचा रस नाकात घालण्यास सांगितले. श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्री. रंगनाथराव पुराणिक यांनी तीन दिवस उपचार करताच त्यांचा दुर्धर रोग दूर होऊन ते पूर्णपण बरे झाले.

अशा रीतीने काही दिवस देऊळगावराजा या गावी राहून श्रीस्वामीमहाराज गोपेगाव मार्गाने मंजीरथ या गावी आले. मंजीरथ हे गाव श्रीगोदावरीनदीचे हृदयस्थान म्हणून प्रसिद्ध आहे. मंजीरथ या गावी अनेक विद्वान व वैदिक ब्राह्मण राहत असत. श्रीस्वामीमहाराज आपल्या गावी आल्यामुळे तेथील सर्वच ब्रह्मवृंदांना परमानंद झाला. ज्यावेळी सर्वजण श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी गेले त्यावेळी तेथे जमलेल्या सर्व वैदिक मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांना असे विचारले की, "जटा, घन, क्रम इत्यादि रूपाने वेदमंत्र म्हणण्याचे कारण काय आहे?" हा प्रश्न ऐकताच

श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "ज्याप्रमाणे आलाप, ताना, एकाड, दुकाड वगैरे नानाविध प्रकारांनी गाणे म्हटल्यास मनोरंजन होते त्याप्रमाणेच जटा, माला, शिखा, रेखा, ध्वज, दण्ड, रथ व घन या अष्टविध विकृतींनी युक्त असे वेदमंत्र म्हटल्यास ऐकणाऱ्यास आनंद होतो व त्यामुळे देवही संतुष्ट होतात. सामवेद गायन तर देवांना अत्यन्त प्रिय आहे."

श्रीस्वामीमहाराज मंजीरथ येथे असताना एके दिवशी गावातील एक बाई सर्पदंश होऊन मरणोन्मुख अवस्थेत पडल्या. श्रीस्वामी-महाराजांची कीर्ती ऐकून त्यांच्या नातलगांनी त्यांच्यावर मंत्रोप-चार करण्यासाठी त्यांना श्रीस्वामीमहाराजांपाशी आणले. त्या बाईंची सर्पदंशाने झालेली एकंदर अवस्था अवलोकन करून श्रीस्वामीमहाराजांनी लिंबाची एक डहाळी अभिमंत्रून ती त्यांच्या नातलगांकडे दिली व त्या डहाळीने त्या बाईंच्या मस्तकावर ताडण करीत राहण्यास सांगितले. श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेला उपाय केल्यावर थोड्याच वेळात त्या बाईंचे विष उतरून त्या बऱ्या झाल्या.

श्रीस्वामीमहाराज मंजीरथहून निघून वैशाख महिन्याच्या अखेरीला श्रीगोदावरीनदीच्या तीरावरील उकडगावी येऊन पोहोचले. तेथे त्यांनी दशाहार म्हणजे श्रीगंगेचा उत्सव केला. त्यानन्तर राक्षसभुवनाजवळील पांचाळेश्वर या ठिकाणी ते गेले. पांचाळेश्वर हे भगवान् श्रीदत्तात्रेयांनी तपश्चर्या केलेले असे अपूर्व स्थान आहे. या ठिकाणी श्रीदत्तात्रेयांचे एक मंदिर आहे. तेथे श्रीदत्तात्रेयांचे दर्शन घेऊन श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र पैठण येथे आले. येथे आल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीएकनाथमहा-राजांच्या मठातच भिक्षा केली. श्रीएकनाथमहाराजांनी या ठिकाणी

मंदिर बांधून त्यात भगवान् श्रीकृष्णांच्या मूर्तीची प्रतिष्ठापना केली होती. कालौघात त्यांच्या वंशजांनी मंदिरात काही फेरफार करण्यासाठी ती मूर्ती मूळ जागेवरून उचलून बाजूला ठेवली; परन्तु मूळ मंदिरात काहीच फेरफार होऊ शकला नाही व अनेक वेळा प्रयत्न केले तरीही मूर्ती आपल्या मूळ जागेवर स्थानापन्न होऊ शकली नाही. अशा प्रकारे बारा वर्षे निघून गेली. श्रीस्वामीमहाराज मठात आल्यावर श्रीएकनाथमहाराजांच्या वंशजांनी ही सर्व हकीकत त्यांच्या कानावर घातली. ती सर्व हकीकत ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी मंदिराची मूळ जागा स्वत: पाहिली व त्या जागेत काहीही फेरफार न करता तेथेच पुन्हा विद्यमान वंशजांना मूर्तीची प्रतिष्ठापना करण्यास सांगितले. श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे मूर्तीची प्रतिष्ठापना करताच ते काम निर्विघ्नपणे पार पडले व भगवान् श्रीकृष्णनाथांची मूर्ती श्रीएकनाथमहाराजांनी प्रतिष्ठापित केलेल्या आपल्या मूळ जागेवर विराजमान होऊन शोभू लागली.

भगवान् श्रीकृष्णनाथमहाराजांच्या मूर्तीच्या प्रतिष्ठापनाचे कार्य पूर्ण झाल्यावर श्रीस्वामीमहाराज सर्व लोकांना उद्देशून प्रवचन करताना असे म्हणाले की, "श्रीएकनाथमहाराजांचा अधिकार फार मोठा होता; कारण ते महासिद्ध पुरुष होते. त्यांनी आपल्या सिद्धहस्ताने या श्रीकृष्णमूर्तीची येथे प्रतिष्ठापना केली होती; परन्तु काही लोकांनी मूळ जागेवरून मूर्ती दुसरीकडे हलविली. त्यामुळे मोठेच विघ्न निर्माण झाले. आता त्यांच्याच कृपेने हे विघ्न दूर झाले. श्रीनाथमहाराज साक्षात् विष्णूचेच अवतार होते. भगवान् श्रीगोपालकृष्णनाथमहाराजांनी स्वतः श्रीखंड्याच्या रूपाने त्यांच्या घरी गंगेचे पाणी भरले आणि गंधही उगाळले. आजही नाथ षष्ठीला देवच त्यांचा रांजण भरतात. भगवान् श्रीदत्तात्रेयांनी येथे पठाणाच्या

वेषात पहारा केला होता. अशा या ठिकाणाचे व या मूर्तीचे माहात्म्य अनन्यसाधारण आहे. श्रीएकनाथमहाराजांनी आपल्या या उपास्य देवतेचे "श्रीएकनाथी भागवतात" वर्णन करताना असे म्हटले आहे की–

लीलाविग्रही सुंदरपूर्ण। गुणकर्मक्रिया अतिपावन।
जगदुद्धरी श्रीकृष्ण। ब्रह्मपरिपूर्ण पूर्णावतार ॥ १.२३८ ॥
जो सकळ मंगळां मंगळ पूर्ण। जो का गोकुळीं कामिनीरमण।
मोक्षाचें तारूं स्वयें श्रीकृष्ण। ज्याचें बरवेपण अलौकिक ॥२३९॥
जो भक्तकामकल्पद्रुम। मनोहर मेघश्याम।
ज्याचें त्रिलोकीं दाटुगें नाम। स्वयें पुरुषोत्तम शोभतु ॥ २४० ॥
श्रीकृष्णाचिया सौंदर्यापुढें। लक्ष्मी भुलोनि झाली वेडें।
मदन पोटा आलें बापुडें। तेथ कोणीकडे इंद्र चंद्र ॥ २४१ ॥
ज्याचें त्रैलोक्यपावन नाम। जो करी असुरांतें भस्म।
तो बोलिजे अवाप्तकाम। भक्तां सुगम सर्वदा ॥ २४२ ॥
त्रिलोकींचें बरवेपण। भुलोनि कृष्णापाशीं आलें जाण।
ना कृष्णलेशें बरवेपण। शोभे संपूर्ण तिहीं लोकीं ॥ २४३ ॥
जो सकल सौंदर्याची शोभा। जो लावण्याचा अतिवालभा।
ज्याचिया अंगसंगप्रभा। आणिली शोभा जगासी ॥ २४४ ॥
जो हरिखत्वाचा सोलींव हरिख। कीं सुख सुखावतें परमसुख।
ज्याचेनि विश्रांतीसि देख। होय आत्यंतिक विसांवा ॥ २४५ ॥
तो अमूत मूर्तिधारण। कीं सकललोकलावण्य।
शोभा शोभवी श्रीकृष्ण। सौभाग्य संपूर्ण साजिरा ॥ २४६ ॥
घृत थिजलें कीं विघुरलें। परी घृतपण नाहीं मुकलें।
तेवीं अमूर्त मूर्तीं मुसावले। परी तें संचलें परब्रह्म ॥ २४७ ॥

तयासि देखिलियाचि पुरे। देखादेखीं देखणेंचि सरे।
पहाणें पाहातेनिसीं माघारें। लाजोनि वोसरे सलज्ज ॥२४८॥
दृष्टी घाली दे ढेंकर। आपण आपुलें शेजार।
होवोनियां परात्पर। सुखावे साचार श्रीकृष्णरूपीं ॥ २४९ ॥
श्रीकृष्णाची चाखिल्या गोडी। रसस्वादु रसना न सोडी।
जाये चाखणेपणाची आवडी। चाखणें दवडी चाखोनि ॥२५०॥
नवल तेथींचे गोडपण। अमृतही फिकें केलें जाण।
यापरी रसना आपण। हरिरसीं संपूर्ण सुखावे ॥ २५१ ॥
लागतां श्रीकृष्ण सुवावो। अवघा संसारुचि होय वावो।
सेवितां श्रीकृष्णसुगंधवावो। घ्राणासि पहावो आन नावडे।२५२।
वासु सुवासु सुमन। घ्रेय घ्राता आणि घ्राण।
कृष्ण मकरंदें जाण। विश्रामा संपूर्ण स्वयें येती ॥२५३॥
जयाचेनि अंगस्पर्शें। देह–देही–देहपण नासे।
अंगचि अंगातें कैसें। विसरे आपैसें देहबुद्धी ॥ २५४ ॥
कठिणाचे कठिणपण गेलें। मृदुचें मृदुपणही नेलें।
कृष्णस्पर्शें ऐसें केलें। स्पर्शाचें ठेलें स्पर्शत्व ॥ २५५ ॥
तयाचेनि पठणें वाचा। ठावो वाच्य वाचकांचा।
नेतिशब्दे पुसोनि साचा। करी शब्दाचा निःशब्दु ॥ २५६ ॥
बोलूं बोलणेंचि ठेलें। बोलतें नेणों काय झालें।
कृष्ण शब्दें ऐसें केलें। वाच्यानें नेलें वाचिक ॥ २५७ ॥
चित्त चिंतितांच पाये। चित्तपणा विसरोनि जाये।
मग निश्चितपणें पाहे। कृष्णचरणीं राहे निवान्त ॥ २५८ ॥
चित्त चिन्ता चिन्तन। तिहींची नुरे आठवण।
चिंतितांचि श्रीकृष्णचरण। ब्रह्मपरिपूर्ण निजचित्त ॥ २५९ ॥

नवल तयाचा पदक्रम । पाहतां पारुषे कर्माकर्म ।
मग कर्म कर्ता क्रियाभ्रम । करी निर्भ्रम पदरजें ।। २६० ।।
पाहातां पाउलांचा माग । तुटती कर्माकर्मांचे लाग ।
कर्माचें मुख्य माया अंग । तिचा विभाग उरों नेदी ।। २६१ ।।
गाईमागिल कृष्णपाउलें । पाहतां कर्म कर्तें निसी गेलें ।
अकर्म म्हणणें नाहीं उरलें । ऐसें कर्म केलें निष्कर्म ।। २६२ ।।
जयाचेनि कीर्तिश्रवणें । श्रोता नुरे श्रोतेपणें ।
वक्ता पारुषे वक्तेपणें । श्रवणें पावणें परब्रह्म ।। २६३ ।।
यापरी उदारकीर्ती । थोर केली अवतारख्याती ।
जेणें जड जीव उद्धरती । श्रवणें त्रिजगतीं पावन होये ।।२६४।।
स्वधामा गेलिया चक्रधरू । मागां तरावया संसारू ।
कृष्णकीर्ति सुगम तारूं । ठेवून श्रीधरू स्वयें गेला ।। २६५ ।।
नवल त्या तारुवाची स्थिती । बुडवूं नेणे कल्पांती ।
श्रवणें तरले नेणों किती । पुढेंहीं तरती श्रद्धाळू ।। २६६ ।।
श्रीकृष्णकीर्तीचें तारूं । घालितां आटे भवसागरू ।
तेथें कोरडचा पाउलीं उतारू । श्रवणार्थी नरू स्वयें लाहे ।।२६७।।
जे कृष्णकीर्ति करिती पठण । त्यांच्या संसारासि पडे शून्य ।
कीर्तिवंत ते अतिपावन । त्यांतें सुरगण वंदिती ।। २६८ ।।
आदरें पढतां श्रीकृष्णकीर्ति । पायां लागती चारी मुक्ती ।
त्यांचेनि पावन त्रिजगती । परमनिर्वृत्ति हरिनामें ।। २६९ ।।
श्रीकृष्णकीर्ति नामाक्षरें । रिघतांचि श्रवणद्वारें ।
भीतरील तम एकसरें । निघे बाहेरें गजबजोनी ।। २७० ।।
तंव कृष्णकीर्तिकथा गजरीं । तमासि ठोवो नुरेचि बाहेरी ।
धाकेंचि निमे सपरिवारीं । कृष्णकीर्तिमाझारी परमानन्दू ।२७१।

कृष्णकीर्तिप्रतापप्रकाशें। संसार कृष्णमय दिसे।
कीर्ति कीर्तिमंताऐसें। दे अनायासें निजसुख ॥ २७२ ॥
जों देखिलिया देखणे सरे। जो चाखिलिया चाखणें पुरे।
जो ऐकिलिया ऐकणें वोसरे। जो चिंतितां नुरे चित्तवृत्ति ॥२७३॥
ज्यासीं झालिया भेटी। भेटीस न पडे तुटी।
ज्यासीं बोलतां गोठी। पडे मिठी परमार्थी ॥ २७४ ॥
ज्यासि दिधलिया खेंव। खेंवाची पुरे हांव।
ज्याचें घेताचि नांव। नासे सर्व महाभय ॥ २७५ ॥

यानन्तर थोडयाच दिवसांनी श्रीस्वामीमहाराज पैठणहून निघून दौलताबादला अर्थात् देवगिरीला आले. तेथे त्यांनी श्रीएकनाथ-महाराजांचे गुरू श्रीजनार्दनस्वामीमहाराज यांच्या समाधीचे दर्शन घेतले. याच ठिकाणी भगवान् श्रीदत्तात्रेय हे श्रीजनार्दनस्वामी-महाराजांवरोबर सोंगटया खेळत असत. तेथून निघून पुढे श्रीस्वामी-महाराज बारा ज्योतिर्लिंगातील प्रसिद्ध अशा श्रीक्षेत्र वेरूळ येथील श्रीघृणेश्वराच्या दर्शनासाठी गेले. या ज्योतिर्लिंगावर घाव घालून ते तोडून टाकण्यासाठी औरंगजेब बादशाह गेला असता त्याच्या शस्त्र धारण केलेल्या हाताचे स्तंभन झाले होते, अशी कथा आहे. अशा तऱ्हेने संचार करीत करीत व प्रसिद्ध देवदेवतांची दर्शने घेत घेत कन्नड या गावी जाऊन पुढे श्रीस्वामीमहाराज कान्हदेशात चाळीसगाव येथे आले.

वरील सर्व प्रवासात त्यांच्या बरोबर श्री. गांडामहाराजही होते. श्रीस्वामीमहाराजांचे नाव ऐकले नाही असे गाव या प्रांतात शोधून काढणे शक्य नव्हते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज जेथें जेथे जात असत तेथे तेथे मोठ्या समाराधना होत असत. त्यामुळे त्यांना व श्री. गांडामहाराजांना आपले देहधर्मादि प्रातःकर्मंही

उरकावयाला फुरसत मिळत नसे. श्रीस्वामीमहाराज एखाद्या गावाच्या देवळात किंवा धर्मशाळेत उतरल्याची वार्ता लोकांना समजली की, लोकांचा त्या स्थानाला अक्षरशः गराडा पडत असे. अशी स्थिती असली; तरी सर्व भरतखंडात पायी संचार करून वर्णाश्रमधर्माची प्रतिष्ठापना करण्याचे जे कार्य श्रीदेवांनी त्यांच्यावर सोपविले होते, ते करण्यासाठी ते कटिबद्ध होते; परन्तु या प्रवासात त्यांच्या बरोबर श्री. गांडामहाराज असल्यामुळे त्यांना त्यांची फार चिंता वाटत होती; कारण या सर्व गडबडीमुळे श्री. गांडामहाराजांना साधन, भजन, चिंतन, मनन इत्यादि करावयास सवडच मिळत नाही, हे त्यांच्या केव्हाच लक्षात आले. श्री. गांडामहाराजांच्या दृष्टीने त्यांना आपल्या श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांचा सहवास व सेवा लाभत होती, हे खरे असले; तरी ज्या अंतिम ध्येयसिद्धीच्या प्राप्तीसाठी श्रीगांडामहाराज साधनपथावरून मार्गक्रमण करीत होते, त्याकरिता या गोष्टी पुऱ्या पडणार नाहीत, याची श्रीस्वामीमहाराजांना परिपूर्ण खात्री होती. त्यामुळे चाळीसगावला आल्यावर श्रीस्वामीमहाराज एके दिवशी श्रीगांडामहाराजांना असे म्हणाले की, "या सर्व संचारामध्ये तू आमच्या बरोबर प्रवास करीत आहेस. अशा रीतीने जर तू फिरत राहिलास तर ब्रह्मदेवाचे आयुष्य मिळाले तरी ते अपुरेच पडेल. जर तू साधनेचा विचार केला नाहीस व मुक्कामाला पोहोचण्यासाठी प्रयत्न केला नाहीस तर तुला शेवटी पश्चात्ताप करण्याची पाळी आल्याशिवाय राहणार नाही. अशी पाळी आपल्यावर येऊ नये म्हणून तू येथून निघून भडोचला जा व तेथे राहून साधन, भजन, मनन, चिन्तन व निदिध्यासादि करून आत्मानात्मविवेकाचा अभ्यास कर. सध्याच्या प्रवासात प्रत्येक ठिकाणी तू आमच्या बरोबर येत असल्यामुळे व सर्वांची यथायोग्य

सोय करीत असल्यामुळे अनेक लोक सतत आपल्याबरोबर राहात आहेत. मात्र तू येथून निघून गेलास म्हणजे या लोकांची गैरसोय होऊन ते सर्वजण कंटाळून निघून जातील. जोपर्यंत तू आमच्या-बरोबर राहशील तोपर्यन्त आपल्याला लोकांची उपाधी होतच राहणार! याकरिता तू येथून त्वरित निघून भडोचला जाणे योग्य होईल. तेथेही लोकांची उपाधी होत आहे असे वाटल्यास जेथे कोठे उपाधी होणार नाही अशा ठिकाणी निघून जा व अशा एकान्त स्थानी राहून वृत्ती शान्त करण्याचा अभ्यास कर. असे केले म्हणजे अंतिम अवस्था प्राप्त होऊन तू मुक्त होशील. त्यानन्तर गुंज येथे राहून लोकसंग्रह करण्यास हरकत नाही. माझा तुला आशीर्वाद आहे." श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगताच त्यांची आज्ञा शिरोधार्य मानून श्रीगांडामहाराजांनी तत्काळ तेथून निघून जाण्याचा निश्चय केला; परन्तु आपण गेल्यावर श्रीस्वामीमहाराज कोठे जातील असा प्रश्न त्यांच्या मनात उपस्थित झाला. तो प्रश्न श्रीस्वामीमहाराजांना विचारून त्यांच्याकडून त्याचे उत्तर घेण्या-पूर्वीच श्रीस्वामीमहाराज श्रीगांडामहाराज यांना असे म्हणाले की, "तू आमची काळजी करू नकोस. आपण नर्मदा किनाऱ्याला जेथे निवाऱ्याची जागा मिळेल तिथे राहून चातुर्मास करू. अशी जागा जर मिळाली नाही तर पुढे कोठे तरी जाऊन राहू." श्रीस्वामी-महाराजांनी आपल्या मनातील प्रश्न ओळखून तो विचारण्यापूर्वीच त्यांनी त्याचे उत्तर दिले हे पाहून श्रीगांडामहाराज संतुष्ट झाले व ज्येष्ठ वद्य १४ शके १८३३ अर्थात् इ. स. १९११ ला श्रीस्वामी-महाराजांची आज्ञा घेऊन ते मोठ्या जड अंतःकरणाने भडोचला जावयास निघाले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे आपल्याला श्रीस्वामीमहाराजांच्या

पराकाष्ठेच्या महानतेची व लोकोत्तरपणाची जाणीव झाल्याशिवाय राहात नाही; कारण त्यांनी श्रीगांडामहाराजांना आपल्यापासून दूर जाण्यास सांगून श्रीसद्गुरूंनी शिष्याला शिकविलेले ज्ञान पोटी जिरविण्यासाठी एकान्तात राहून तीव्रतम साधन करण्याची आवश्यकता असते, हे ज्याप्रमाणे प्रत्यक्ष कृतिद्वारा सूचित करून स्पष्ट केले आहे, त्याप्रमाणेच समाजोद्धारासाठी अर्थात् लोकसंग्रहासाठी किंवा लोकोद्धारासाठी परंपरा जागृत ठेवणे अत्यंत आवश्यक आहे, ही महान् धारणाही ह्या कृतिद्वारा प्रकट केली आहे. श्रीस्वामीमहाराजांच्या या कृतीच्या भव्यतेचे व धारणेच्या महानतेचे दर्शन आपल्याला श्रीजनकशिष्य श्रीशुकमहामुनी, श्रीकृष्णभक्त श्रीउद्धव व श्रीसमर्थशिष्य श्रीकल्याणस्वामीमहाराज यांच्या जीवनकथाद्वारा घेता येते. या सर्व कथांमध्ये श्रीसद्गुरू आपल्या शिष्यावर कृपा करून म्हणजे शक्तिपातयोगद्वारा शक्तिसंक्रमण करून त्याची अनादि निद्रिस्त आत्मशक्ती कुंडलिनी जागृत करून त्याच्या ठिकाणी ज्ञानाचे बीज कसे पेरतात व त्या बीजाचा वटवृक्ष कसा होतो म्हणजे शिष्य एकान्तात जाऊन साधन करून आपल्याला प्राप्त झालेले किंवा आतून झालेले ज्ञान पोटात जिरवून महासिद्ध कसा होतो आणि कालौघात त्या वृक्षाच्या छायेत अनेकांना विश्रांतीचा लाभ कसा होतो अर्थात् आपल्या शिष्याच्या द्वारा अनेकांना शक्तिपातयोगाच्या द्वारा ज्ञानप्राप्तीचा मार्ग कसा प्राप्त होतो, हे स्पष्ट होते. या दृष्टीने उपरोक्त तिन्ही कथांचा आस्वाद सर्व साधकभक्तांना लाभदायक झाल्याशिवाय राहणार नाही.

या संबंधीची श्रीशुकमहामुनींची कथा सामवेदीय "महोपनिषदातील" दुसऱ्या अध्यायात कथन करताना ऋषी असे म्हणतात का, "श्रीशुक नावाचे एक महातेजस्वी मुनीश्वर होते. ते निरन्तर

आत्मानंदाच्या आस्वादनात तत्पर राहात असत. त्यांनी जन्माला आल्याबरोबर सत्याची व तत्त्वज्ञानाची प्राप्ती केली. त्यामुळे त्या महामना श्रीशुकदेवांनी दुसऱ्या कोणाच्याही उपदेशाशिवाय आपल्या स्वतःच्या विवेकाच्या अर्थात् जागृत आत्मशक्तिरूप श्रीगुरूच्या बळावर अनेक वर्षेपर्यंत विचार करून आत्मस्वरूपाचा पुढीलप्रमाणे निश्चय केला. ।। १–२ ।।

आत्मा हा अनिर्वचनीय, अगम्य आणि मनरूपी सहाव्या इंद्रिया-मध्ये राहणारा असल्यामुळे तो अणूच्या आकाराचा, चिन्मात्र व आकाशापेक्षाही अत्यन्त सूक्ष्म आहे. या परम चिद्रूपी अणूमध्ये कोटी कोटी ब्रह्माण्डरूपी रेणुका शक्तिक्रमाने उत्पन्न आणि स्थित होऊन विलीन होत राहतात. बाह्यशून्यतेमुळे आत्मा हा आकाश-स्वरूप आहे आणि चिद्रूपतेमुळे अनाकाशस्वरूप आहे. आत्म्याचा निर्देश करणे शक्य होत नाही त्यामुळे तो अवस्तुरूप आहे. त्याची सत्ता असल्यामुळे तो वस्तुरूप आहे आणि तो प्रकाशयुक्त असल्या-मुळे चेतन आहे. आत्मा हा वेदनेचा विषय होऊ शकत नसल्यामुळे शिळेसारखा आहे. तो आपल्या अन्तःस्थ आत्म्याकाशामध्ये चित्र-विचित्र अशा नाना प्रकारच्या जगताचा उन्मेष करतो. हे विश्व केवळ त्याचा आत्मप्रकाशच आहे. त्यामुळे विश्व हे आत्म्यापासून निराळे नाही. जगद्‌भेद हा आत्म्यामध्येच भासित होत असतो. त्यामुळे तो भेदही आत्ममयच असतो. आत्मा हा सर्वांशी सम्बद्ध असल्यामुळे त्याची सर्वत्र गती असते आणि तो गतिहीन असल्यामुळे कोठेही जात नाही. त्याला कोणताही आश्रय नसल्यामुळे तो "नास्ति" रूप आहे आणि तो सत्स्वरूप असल्यामुळे "अस्ति" रूप आहे. धनदात्याला परमगती प्राप्त होते. जे ब्रह्म आनन्द आणि विज्ञान-स्वरूप आहे, चित्ताच्या द्वारा सर्व संकल्पांचा परित्याग करणे हेच

ज्या ब्रह्माचे किंवा आत्म्याचे ग्रहण करणे आहे व जागृत अवस्थेच्या प्रतीतीचा अभाव हीच त्याची प्रतीती आहे, असे बुद्धिमान् लोक सांगतात. ज्याच्या संकोचाने आणि विकासाने जगताचा प्रलय आणि त्याची निर्मिती होते, वेदान्त-वाक्यांची जे ब्रह्म ही निष्ठा आहे आणि वाणीला जे अगोचर आहे, ते ब्रह्मच मी आहे, दुसरे काहीही नाही. अशा प्रकारे आपल्याच सूक्ष्म बुद्धीच्या द्वारा श्रीशुकदेवमुनींना सर्व काही ज्ञात झाले. त्यानन्तर ते स्वतः प्राप्त करून घेतलेल्या परतत्त्वात अविश्रान्त अर्थात् निरन्तरपणे मनाने संलग्न होऊन स्थिर झाले. "हीच वस्तू आहे, दुसरी कोणतीही नाही," अशा प्रकारचा विश्वास त्यांना आत्मतत्त्वात प्राप्त झाला आणि तेव्हा, ज्याप्रकाराने ढगातून मिळालेल्या पाण्यामुळे चातकाचे चांचल्य दूर होऊन तो शांत होतो त्याप्रकाराने नाना प्रकारच्या भोगांपासून उत्पन्न होणाऱ्या विषयांच्या आसक्तीपासून दूर होऊन त्यांचे चित्त कैवल्यरूप झाले. ॥ ३-१३ ॥

एकदा या अत्यन्त शुद्ध प्रज्ञेच्या श्रीशुकदेवमुनींनी मेरू पर्वतावर एकान्तात राहणाऱ्या आपल्या वडिलांना अर्थात् श्रीकृष्णद्वैपायन मुनींना म्हणजे श्रीव्यास महर्षींना भक्तिपूर्वक असा प्रश्न विचारला की, "मुनीश्वर ! हा सर्व जगत् प्रपंच कशा रीतीने उत्पन्न झाला व तो कोणत्या प्रकारे विलीन होतो ? हे सर्व काय आहे ? कोणाचे आहे ? व केव्हा झाले आहे ? तरी कृपा करून माझ्या या सर्व प्रश्नांची उत्तरे देऊन आपण माझे समाधान करा." अशा प्रकारे श्रीशुकदेवमुनींनी प्रश्न विचारल्यावर आत्मज्ञानी श्रीव्यास महर्षींनी त्यांना योग्य रीतीने सर्व प्रश्नांची उत्तरे दिली; परन्तु "या सर्व गोष्टी तर आपल्याला आधीच ज्ञात आहेत," असे पाहून श्रीशुक-व मुनींनी आपल्या वडिलांनी सांगितलेल्या गोष्टींचा बुद्धीने विशेष

आदर केला नाही. श्रीशुकदेवमुनींनी आपण सांगितलेल्या गोष्टीं-संबंधी प्रकट केलेली अनास्था पाहून भगवान् श्रीव्यास महर्षी त्यांना असे म्हणाले की, "तुला सांगितलेल्या सर्व गोष्टी मला तत्त्वतः माहीत नाहीत. मिथिलानगरीत जनक नावाचे एक राजे आहेत. ते या सर्व गोष्टी उत्तम प्रकारे जाणतात. हे मुला ! तू त्यांच्या-कडून सर्व काही प्राप्त करू शकतोस !" आपल्या वडिलांचे हे म्हणणे ऐकल्यावर श्रीशुकदेवमुनी सुमेरुपर्वतावरून उतरून भूतला-वर आले व ते श्री. जनकांकडून परिपालित होणाऱ्या विदेह नगरीत जाऊन पोहोचले. ॥१४–२०॥

ज्यावेळी श्रीशुकदेवमुनी श्री. जनकराजांच्या राजवाड्याच्या दरवाजावर आले त्यावेळी द्वारपालाने श्री. जनकांकडे जाऊन असे सांगितले की, "महाराज ! श्रीव्यास महर्षींचे पुत्र श्रीशुकदेव मुनी हे राजद्वारावर आले असून ते आपल्याला भेटू इच्छितात. हे ऐकताच श्रीशुकदेवमुनींची परीक्षा घेण्याकरिता श्री. जनकराजांनी आज्ञापूर्वक द्वारपालाला इतकेच सांगितले की, "त्यांना तेथेच द्वारावर थांबण्यास सांग." त्यानन्तर श्री. जनक सात दिवस गप्प बसून राहिले. अशा रीतीने सात दिवस गेल्यावर श्री. जनक-राजांनी श्रीशुकदेवमुनींना अन्तपुरातील अंगणात बोलावून घेतले; मात्र तेथेही ते सात दिवसपर्यंन्त श्रीशुकदेवमुनींच्या समोर आले नाहीत व त्यांनी त्यांची भेट घेतली नाही. श्री. जनकराजांनी अन्तःपुरातील तरुण स्त्रिया, नाना प्रकारचे जेवण आणि विविध भोग्य पदार्थांच्या द्वारा सौम्य वदन श्रीशुकदेवमुनींचा आदरसत्कार करण्याचा प्रयत्न केला; परन्तु ज्याप्रमाणे मन्द वारा हा दृढता-पूर्वक स्थित असलेल्या पर्वताला हलवू शकत नाही त्याप्रमाणे ते

सर्व भोग आणि भोज्य पदार्थ श्रीशुकदेवमुनींच्या मनाला आकर्षित करून विचलित करू शकले नाहीत. त्यावेळी श्रीशुकदेवमुनी असंग, समभावापन्न, निर्विकार, मौन आणि प्रसन्नचित्त राहून निर्मल अशा पूर्णचंद्राप्रमाणे स्थिर राहिले. ॥२१–२७॥

अशा प्रकारे श्री. जनकराजांनी जेव्हा श्रीशुकदेवमुनींच्या स्वभावाची परीक्षा घेतली तेव्हा त्यांनी त्यांना आपल्या जवळ बोलाविले आणि ते प्रसन्नचित्त आहेत असे पाहून त्यांना प्रणाम केला. श्रीशुकदेवमुनींचे स्वागत करताना श्री. जनकराजा त्यांना असे म्हणाले की, "आपण आपली सर्व सांसारिक कृत्ये निःशेष केली आहेत व आपले सर्व मनोरथ परिपूर्ण झाले आहेत. अशा स्थितीत आपली काय इच्छा आहे ?" हा प्रश्न ऐकताच श्रीशुकदेवमुनी श्री. जनकराजांना असे म्हणाले की, "गुरुवर ! हा जागतिक प्रपंच कसा उत्पन्न होतो आणि तो कोणत्या प्रकारे विलीन होतो, हे आपण मला तत्काळ उत्तमरीतीने समजावून सांगा." त्यावेळी महात्मा श्री. जनकराजांनी श्रीशुकदेवमुनींना सर्व गोष्टी उत्तमरीतीने समजावून सांगितल्या. याच गोष्टी श्रीशुकदेवमुनींच्या वडिलांनी यापूर्वीच सांगितल्या होत्या. श्री. जनकराजांचे म्हणणे ऐकल्यावर श्रीशुकदेवमुनी असे म्हणाले की, "आपण आता सांगितलेल्या या ज्ञानाच्या सर्व गोष्टी मी स्वतःच विशेषरूपाने जाणल्या होत्या आणि माझ्या वडिलांना यासंबंधी विचारल्यावर त्यांनीही याच गोष्टी मला सांगितल्या होत्या. ज्ञानिश्रेष्ठ ! आपणही मला त्याच गोष्टी सांगितल्या आणि शास्त्रातही हा विषय असाच सांगितल्याचे दृष्टोत्पतीस येते. मनाच्या विकल्पामुळे प्रपंच उत्पन्न होतो आणि त्या विकल्पाचा नाश झाला की, प्रपंचाचाही नाश होतो. निन्दनीय संसार हा साररहित आहे, हे निश्चित आहे. याकरिता हे महाभाग ! ही

वस्तू काय आहे ? हे मला खरे खरे सांगा. जगतासंबंधी भ्रान्त झालेले माझे चित्त आपल्या द्वाराच शान्ती प्राप्त करू शकेल." ॥२८–३५॥

श्रीशुकदेवमुनींचे हे म्हणणे ऐकून श्री. जनकराजे त्यांना असे म्हणाले की, " हे शुकदेवमुनी ! मी सर्व ज्ञान विस्तारपूर्वक कथन करतो. ते आपण ऐका. हे ज्ञान समस्त ज्ञानाचे सार व सर्व रहस्यांचेही रहस्य असून ते जाणल्यामुळे साधकाला अत्यंत त्वरित गतीने मुक्ती प्राप्त होते. वास्तविक पाहता " दृश्य जगत् हे अस्तित्वातच नाही, " असा बोध झाल्यावर मनाची दृश्य–विषयापासून परिशुद्धी होते. ज्यावेळी हा बोध परिपक्व होतो त्यावेळी त्यामुळे निर्वाणरूपी परमशान्ती प्राप्त होते. वासनांच्या निःशेष व परिपूर्ण त्यागालाच सर्वश्रेष्ठ त्याग म्हणतात व या विशुद्ध अवस्थेलाच साधुजन मोक्ष असे म्हणतात. ॥३६–४१॥

ज्याला तपःसाधन इत्यादि काहीही न करता स्वभावतःच जगताचे भोग चांगले वाटत नाहीत त्याला जीवन्मुक्त असे म्हणतात. ज्यावेळी जशी सुखे व दुःखे प्राप्त होतील त्यासंबंधी अनासक्त राहून जो प्रसन्नही होत नाही दुःखही होत नाही त्याला जीवनमुक्त असे म्हणतात. हर्ष, अमर्ष म्हणजे उद्वेग, भय, क्रोध, काम आणि कार्पण्य म्हणजे शोक या सर्वांपासून ज्याचे अन्तःकरण अस्पर्श राहते त्याला जीवनमुक्त असे म्हणतात. जो अहंकारमय वासनेचा सहज त्याग करून स्वस्थ राहतो अर्थात् चित्तालम्बनाचा सम्यक् त्याग करतो ज्याला जीवन्मुक्त असे म्हणतात. ज्याची दृष्टी नेहमी अन्तर्मुख राहते, ज्याला कोणत्याही पदार्थाची आकांक्षा नसते व उपेक्षाही नसते आणि जो झोपेसारख्या स्थितीत नेहमी राहतो त्याला जीवन्मुक्त असे म्हणतात. जो नेहमी आपल्या आत्मस्वरूपात रत

असतो, ज्याचे मन पूर्ण आणि पवित्र असते, जो परमश्रेष्ठ शान्त अवस्था प्राप्त करून संसारातील कोणत्याही वस्तूची इच्छा करीत नाही आणि जो कोणत्याही गोष्टीची आसक्ती न ठेवता उदासीनपणे राहतो त्याला जीवन्मुक्त असे म्हणतात. ज्याचे हृदयाकाश संवेद्य पदार्थांच्याद्वारा थोडेसुद्धा लिप्त होत नाही आणि चेतन संवित् अर्थात् जागृत आत्मशक्ती कुंडलिनी हेच ज्याचे स्वरूप आहे त्याला जीवन्मुक्त असे म्हणतात. राग-द्वेष, सुख-दुःख, धर्माधर्म आणि फलाफलाची अपेक्षा न ठेवता जो काम करतो त्याला जीवन्मुक्त असे म्हणतात. जो अहंभाव, मान व मत्सर यांचा त्याग करून आणि निरुद्वेग व संकल्पहीन होऊन कार्य करतो त्याला जीवन्मुक्त असे म्हणतात. जो सर्वत्र स्नेहरहित होऊन साक्षीच्या स्वरूपात समानरीतीने स्थिर राहतो आणि कोणत्याही इच्छा न ठेवता कर्तव्यात मग्न राहतो तो जीवन्मुक्तच असतो. ज्याने धर्म आणि अधर्म, जगताची चिन्ता आणि सर्व इच्छा या सर्वांचा अन्तःकरणातून पूर्णपणे त्याग केलेला असतो त्याला जीवन्मुक्त असे म्हणतात. ॥४२-५०॥

आपल्या दृष्टीला दिसणाऱ्या या सर्व दृश्य प्रपंचाचा ज्याने विचारपूर्वक उत्तमरीतीने त्याग केला आहे त्याला जीवनमुक्त असे म्हणतात. तिखट, चमचमीत, खारट, आंबट, कडू, स्वादिष्ट आणि स्वादहिन इत्यादि सर्व एकसारखे आहे असे समजून जो खातो त्याला जीवनमुक्त असे म्हणतात. म्हातारपण. मृत्यू, विपत्ती, राज्य आणि दारिद्र्य या सर्व गोष्टी रम्य आहेत असे मानून जो त्याचा उपभोग घेतो तो जीवनमुक्तच असतो. जो समत्वपूर्ण आणि स्वच्छ बुद्धीने उद्वेग आणि आनन्दविरहित होऊन शोक करीत नाही आणि उत्साहित होत नाही तो जीवनमुक्तच असतो. सर्व इच्छा, सर्व शंका, सर्व कामना आणि सर्व निश्चयांचा ज्याने

मनापासून त्याग केला आहे त्याला जीवनमुक्त असे म्हणतात. जन्म, स्थिती आणि विनाशात ( मृत्यूत ) आणि उन्नती व अवनतीमध्ये ज्याचे मन एकसारखे राहते तो जीवनमुक्त असतो. जो कोणाचाही द्वेष न करता आणि कशाचीही इच्छा न करता प्रारब्धवशात् प्राप्त झालेल्या भोगांचा उपभोग घेतो त्याला जीवन्मुक्त असे म्हणतात. ज्याने संसाराचे चिन्तन करणे सोडून दिलेले असते, जो कलावान असूनही निष्कल राहतो आणि जो चित्त असूनही निश्चित्त राहतो त्याला जीवन्मुक्त असे म्हणतात. जो संपूर्ण अर्थजाळयामध्ये राहून व्यवहार करीत असताना ज्याप्रमाणे दुसऱ्याच्या धनासंबंधी मनुष्य निःस्पृह असतो त्याप्रमाणे निःस्पृह राहतो आणि जो आत्म्यातच पूर्णतेचा अनुभव घेतो तो जीवन्मुक्तच असतो. ।।५१–६२।।

अशा मनुष्याचे शरीर कालाधीन झाल्यावर अर्थात् त्याला मृत्यू आल्यावर तो जीवन्मुक्त अवस्थेचा त्याग करून गतिहीन वाऱ्याप्रमाणे विदेहमुक्त अवस्था प्राप्त करतो. या विदेहमुक्त अवस्थेत जीवाची उन्नती, अवनती किंवा लय होत नाही. ही अवस्था सत्, असत् किंवा दूर अशी असत नाही. या अवस्थेत अहंभाव किंवा दुसरेपणाचा भाव असत नाही. विदेहमुक्ती ही गंभीर व स्तब्ध अवस्था आहे. त्या अवस्थेत तेज आणि अन्धकार या दोन्हीही गोष्टी व्याप्त नसतात. मात्र या अवस्थेत अनिर्वचनीय आणि अभिव्यक्त न होणारे असे एक प्रकारचे सत् अवशिष्ट राहते. ही अवस्था शून्य, आकारयुक्त, दृश्य आणि दर्शन यांपैकी काहीही असत नाही. त्यात ही भूते व पदार्थांचा समूह असत नाही; तर केवळ सत् अनन्तरूपात अवस्थित राहते. ते एक असे अद्भुत तत्त्व आहे की, ज्याच्या स्वरूपाचा निर्देश करणे शक्य होत नाही. त्याची आकृती पूर्णाहूनही पूर्णतम

असते. ते सत् किंवा असत् नसते; मात्र ते चेतनमात्र असते. ते चित्तविहीन व अनन्त असते. ते तत्त्व अजर असले तरी शिवस्वरूप व कल्याणकारी असते. त्याला आदि, मध्य आणि अन्त असत नाही. ते तत्त्व, स्थिती किंवा अवस्था ही अनादि व दोषहीन असते. दृश्य, दृष्टा आणि दर्शन यांच्या त्रिपुटीमध्ये ते केवळ दर्शनस्वरूप मानले जाते. हे शुकदेवमुनी ! या विषयासंबंधी याच्याशिवाय दुसरा कोणताही निश्चय करता येणे शक्य नाही. आपण हे तत्त्व स्वतः जाणले आहे आणि आपल्या वडिलांपासून त्यासंबंधी असे ऐकले आहे की, जीव आपल्या संकल्पानेच बंधनात पडतो आणि संकल्पहीन झाल्यावर तो मुक्त होतो. याकरिता जे जाणल्यावर या संसारात महात्म्यांना सर्व दृश्यांपासून अथवा भोगांपासून विरक्ती उत्पन्न होते, ते तत्त्व तुम्ही स्वतःच जाणले आहे. तुम्ही पूर्ण चेतनावस्थेमध्ये राहण्याच्या स्थितीचा लाभ प्राप्त करून घेऊन सर्व प्राप्तव्य वस्तू प्राप्त केलेल्या आहेत. आपण तपःस्वरूपातच राहात आहात. हे ब्रह्मन् ! तुम्ही मुक्तच आहात. याकरिता आपण भ्रांती सोडून द्या. शुकदेवजी ! बाहेर व अत्यन्त बाहेर आणि अन्तःकरणात व त्याच्याही आत पाहिले असता आपण दृष्टीस पडत नाही; कारण आपण पूर्णकैवल्य स्थितीत साक्षिमात्रानेच राहात आहात." ॥६३-७३॥

अशा प्रकारे तत्त्वज्ञान सांगून झाल्यावर श्री. जनकराजे श्रीशुकदेवमुनींना असे म्हणाले की, "आता आपण समेरू पर्वतावर जाऊन लाखो वर्षेपर्यन्त तपश्चर्या करून आपल्या स्वतःला प्राप्त झालेले व आम्ही आत्ता कथन केलेले ज्ञान पोटात जिरवून स्थिर राहा."

श्री. जनकराजांनी असे सांगितल्यावर श्रीशुकदेवमुनी शोक, भय, श्रम व संशयरहित आणि निष्काम होऊन परतत्त्वस्वरूप

आत्म्यात स्थिर होऊन एकदम शांत व स्वस्थ झाले. त्यानन्तर अखण्ड तत्त्व व समाधिप्राप्तीकरिता ते सुमेरू पर्वताच्या शिखरावर राहण्यास परत आले. तेथे स्नेहहीन दिव्याप्रमाणे हजारो-लाखो वर्षांपर्यन्त आत्मदशेत राहून त्यांनी निर्विकल्प समाधीच्या द्वारा शान्तीचा लाभ प्राप्त करून घेतला. अशा रीतीने ज्याप्रकारे पाण्याचा थेंब समुद्रात पडल्यावर तो त्यातच विलीन होऊन त्याच्याशी एकरूप होतो त्याप्रमाणे संकल्परूपी दोषांनी रहित, शुद्धस्वरूप, पवित्र आणि निर्मल आत्मपदात ते महात्मा श्रीशुकदेवमुनी वासनारहित होऊन तत्त्वाशी एकरूप होऊन गेले. ।।७४–७७।।

ज्याप्रमाणे श्रीशुकदेवमुनींना ज्ञानोपदेश केल्यानन्तरही तत्त्वाशी एकरूप होण्यासाठी श्री. जनकराजांनी सुमेरू पर्वतावर पाठविले त्याप्रमाणेच श्रीस्वामीमहाराजांनी श्रीगांडामहाराजांना आपल्यापासून दूर पाठविले, हे लक्षात घेतले पाहिजे. श्रीकृष्णांनीही श्रीउद्धवाला भागवतधर्मोपदेश करून त्यातील तत्त्वाशी एकरूप होण्यासाठी श्रीबदरीनारायणाश्रमाला कसे पाठविले यासंबंधी श्रीमद्भागवतात एकादश स्कंधातील २९ व्या अध्यायात जी कथा आली आहे तीही येथे पाहिल्यास अनाठायी ठरणार नाही.

भगवान् श्रीकृष्ण श्रीउद्धवास असे म्हणाले की, " हे उद्धवा ! आता मी तुला अत्यन्त मंगलमय अशा भागवत धर्माचा उपदेश करतो, तो तू श्रवण कर. अरे ! जो या धर्माचे अत्यन्त श्रद्धेने आचरण करतो तो मृत्यू सहज जिंकतो अर्थात् त्याला जन्ममरणपरंपरा भोगावी लागत नाही. हे उद्धवा ! मुमुक्षू पुरुषाने नित्य माझे स्मरण करावे, माझ्या ठिकाणी चित्ताचा लय करावा, माझी प्राप्ती हेच मुख्य कर्तव्य मानावे आणि सप्रेम अन्त:करणाने सर्व कर्मे माझ्या प्राप्तीसाठी म्हणून करावीत. हे उद्धवा ! ही गोष्ट एकदम साध्य

होण्यासारखी नाही, हे खरे आहे; परन्तु हा क्रम थोडाथोडा चालविला असता शेवटी यशःप्राप्ती होईल यात काहीच शंका नाही.

हे उद्धवा ! माझ्या भक्तीत निमग्न असणारे ज्ञानी पुरुष जेथे राहात असतील त्या पुण्यक्षेत्री जाऊन राहावे आणि देव, मनुष्य, दैत्य इत्यादिकांपैकी ज्यांनी आपली शरीरे माझ्या भक्तीत अर्पण केली असतील त्या महात्म्यांचे अनुकरण करावे. माझ्या संतोषाकरिता पर्वणी-पर्वणीस यात्रा, उत्सव वगैरे करीत जावे. ही कृत्ये करण्यास एकटयास सामर्थ्य नसल्यास ती पुष्कळ लोकांनी मिळून करावीत. यात्रेच्या वेळी व उत्सवप्रसंगी गायननृत्यादिक राजश्वैर्ये मला अर्पण करावीत. मन निरिच्छ ठेवावे आणि माझी म्हणजे परमात्म्याची व्याप्ती आकाशाप्रमाणे अंतर्बाह्य ओतप्रत व अपरिच्छिन्न आहे, अशी भावना करावी.

हे उद्धवा ! मित्रानेही उपहास केला; तरी मुमुक्षू पुरुषाने तिकडे लक्ष देऊ नये. "मी चांगला व दुसरा वाईट," अशी बुद्धी कदापीही ठेवू नये. बरेपणाबद्दल किंवा वाईटपणाबद्दल स्तुती किंवा निंदा करू नये आणि कुत्री, बैल, गाढवे अथवा चांडाळ ही सर्व परब्रह्मरूप आहेत असे समजून, त्यांना साष्टांग प्रणिपात करावा. हे उद्धवा ! अशा प्रकारे अद्वैत साक्षात्कार होईतोपर्यन्त वाणी, मन व शरीर यांच्या साहाय्याने याप्रमाणे सर्वांविषयी समान आचरण ठेवावे. असे आचरण केले असता परब्रह्मस्वरूपाचे ज्ञान प्राप्त होते, समस्त जगत् ब्रह्ममय दिसते आणि द्वैतमूलक सर्व भ्रम दूर होतात. हे उद्धवा ! अशी ब्रह्मदृष्टी प्राप्त झाल्यावर मग सर्व क्रिया सोडून देण्यास हरकत नाही. सर्व भूतांच्या ठिकाणी माझी म्हणजे परमात्म्याची एकरूपाने व्याप्ती आहे, अशी भावना ठेवणे हाच सायुज्यप्राप्तीचा सर्वश्रेष्ठ उपाय आहे.

हे उद्धवा ! जो पुरुष या चराचर विश्वातील सर्व पदार्थां-विषयी समदृष्टी ठेवतो, तोच पंडित समजावा. विद्वान् पुरुष हे ब्राह्मणादिक उच्च वर्णांविषयी, चांडालादि नीच वर्णांविषयी, ब्रह्मस्व हरण करणाऱ्या चोरांविषयी, ब्राह्मणपूजक सत्पुरुषांविषयी, तेजोनिधी सूर्याविषयी, क्षुद्रतेजाच्या ठिणगीविषयी, शान्तस्थितीत वास करणाऱ्या महात्म्याविषयी आणि परपीडेत निमग्न असणाऱ्या खलांविषयी समान बुद्धी धारण करतात; कारण त्यांच्या मनात द्विधा भाव मुळीच नसतो. हे उद्धवा ! सर्व माणसे किंबहुना सर्व प्राणी परमेश्वरस्वरूप आहेत अशी भावना ठेवली असता स्पर्धा म्हणजे बरोबरीच्या व्यक्तींविषयी हेवा, असूया म्हणजे वरिष्ठ व्यक्तींविषयी हेवा, तिरस्कार म्हणजे हीन व्यक्तींविषयी द्वेषबुद्धी व अहंकार म्हणजे स्वतःविषयी अभिमान हे सर्व दोष त्वरित नष्ट होतात.

हे उद्धवा ! भागवतधर्म आचरताना कोणतेही विघ्न येण्याचा संभव नसतो. एका नैर्गुण्यास अनुसरून वागले म्हणजे हे धर्म सिद्ध होतात. हे उद्धवा ! भागवत धर्माची व्याप्ती इतकी आहे की, भयाचा प्रसंग आला असता पळून जाणे किंवा दुःखाचा प्रसंग आला असता आक्रोश करणे ही क्षुल्लक कृत्ये सुद्धा निष्कामबुद्धीने मला अर्पण केली म्हणजे हा धर्म घडतो. या धर्माचा मुख्य आशय, नश्वर व क्षुद्र देहाने नित्य व चिन्मय अशा माझी (परमात्म्याची) प्राप्ती करून घ्यावी हाच आहे. हे उद्धवा ! विवेकसंपन्न पुरुषांचा विवेक व ज्ञानी पुरुषांचे ज्ञान ते हेच होय !

हे उद्धवा ! ब्रह्मज्ञान प्राप्त झाले की, साधकाच्या सर्व जिज्ञासा संपल्याच म्हणून समजावे; कारण मग त्यास अन्य गोष्टींची अभि-

४०

रुची उत्पन्न होत नाही. अरे ! अमृत मिळेपर्यन्त इतर मधुर पदार्थ गोड लागतात. एकदा अमृत प्राशन केले की, सर्व मधुर पदार्थ तत्काळ नीरस ठरलेच असे समजावे. हे उद्धवा ! ज्ञान, कर्म, योग, कृषिकर्मादिक उद्योग, न्यायादिक व्यवहार इत्यादिकांच्या योगाने मनुष्याला जे चतुर्विध पुरुषार्थ मिळवावयाचे असतात, ते सर्व तुझ्या सारख्या भगवद्‌भक्तास केवळ माझ्या प्राप्तीने सिद्ध होतात; कारण भगवद्‌भक्ताने सर्व कर्मे सोडून देऊन आपल्या आत्म्याचा लय माझ्या ठिकाणी केला की, त्याचे कल्याण करणे मला भाग पडते व नन्तर मी त्यास मोक्ष दिला म्हणजे तो माझ्यासारखाच षड्‌गुणैश्वर्यसंपन्न बनून जातो."

याप्रमाणे श्रीकृष्णांनी श्रीउद्धवांना ज्ञानप्राप्ती व तत्त्वप्राप्ती होण्याकरिता भगवत्प्राप्तीचा मार्ग दाखवून दिल्यामुळे श्रीउद्धवांचा कंठ सद्‌गदित होऊन त्यांच्या नेत्रातून अश्रुधारा वाहू लागल्या आणि ते प्रेमपूर्वकपणे हात जोडून श्रीभगवन्तापुढे स्तब्ध उभे राहिले. त्यानन्तर त्या भक्तशिरोमणींनी चित्ताचे स्थैर्य करून आपले मस्तक श्रीकृष्णांच्या पदकमली ठेवले आणि मोठ्या विनयाने त्यांनी त्यांची अशी प्रार्थना केली की, "हे यदुवरा ! मला जी भ्रांती उत्पन्न झाली होती, ती सर्व आज तुझ्या कृपेने दूर झाली. तथापि माझी आणखी एक प्रार्थना आहे की, "तुझ्या चरणारविंदी माझी भक्ती अढळ राहील असे कर."

हे ऐकताच भगवान् श्रीकृष्ण असे म्हणाले की, "उद्धवा ! तुझी प्रार्थना मी मान्य करतो; परन्तु तुझ्या वर्तनावरून लोकांना वळण लावणे आवश्यक असल्यामुळे, मी जे काही सांगतो, ते तू कर. उद्धवा ! तू आता बदरिकाश्रमी जा आणि तेथे विष्णुपदीत स्नानादिक करून शुद्ध हो. त्या ठिकाणी अलकनन्दा नावाची गंगा

वाहात असून तिच्या केवळ दर्शनाने तुझी सकल पातके नष्ट होतील. नन्तर तू वल्कले परिधान कर व वनातील कंदमुळावर चरितार्थ चालव. सुखोपभोगांपासून पूर्ण निवृत्त हो. शीतोष्णादिक द्वंद्वे सहन कर. सौजन्य धर. इंद्रियांचा जय कर. वासना सोडून दे. स्थिर चित्ताने ब्रह्मज्ञान मिळव. आत्मसाक्षात्कार जोड. इंद्रियांच्या व मनाच्या वृत्ती माझ्याकडे लाव. मी सांगितलेल्या ज्ञानाचे मनन कर आणि भागवतधर्माप्रमाणे वाग म्हणजे त्रिगुणात्मक मायेचा उच्छेद करून तू मजप्रत येऊन पोहोचशील."

श्रीकृष्णांनी अशाप्रकारे श्रीउद्धवांना बदरीकाश्रमाला जाण्यास सांगितल्यामुळे ते अगदी गहिवरून गेले. त्यांच्या ठिकाणी ज्ञानोपदेशामुळे सुखदुःखादिक भावना अवशिष्ट राहिल्या नव्हत्या; तरीही श्रीकृष्णांचा वियोग होणार असे मनात येऊन त्यांची चित्तवृत्ती क्षुब्ध झाली. अशा स्थितीत त्यांनी श्रीकृष्ण भगवन्तांना प्रदक्षिणा करून त्यांच्या चरणी मस्तक ठेवले व आपल्या अश्रूंनी त्यांच्या चरणकमलांना स्नान घातले. आपणास श्रीकृष्णांचा विरह होणार असे पाहून श्रीउद्धव फार दुःखाकुल झाले व त्यांच्या चित्तात अत्यन्त अस्वस्थता उत्पन्न झाली. भगवन्तावर प्रेम करून त्यांचा त्याग करणे हे अशक्य आहे, या जाणिवेने ते पुनःपुन्हा मूर्छित होऊ लागले. ( शेवटी भगवान् श्रीकृष्णांनी दिलेल्या ) त्यांच्या पादुकांचा प्रसाद आपल्या मस्तकावर धारण करून श्रीउद्धवांनी श्रीकृष्णप्रभूंना अभिवंदन केले व मोठ्या कष्टाने ते तेथून निघून गेले. पुढे श्रीकृष्णांच्या उपदेशाप्रमाणे ते भक्तश्रेष्ठ श्रीउद्धव बदरिकाश्रमी गेले आणि भागवतधर्माचे आचरण करून शेवटी ते भगवत्स्वरूपी लीन झाले.

ज्याप्रमाणे श्रीशुकदेवमुनी व श्रीउद्धव यांना त्यांच्या श्रीसद्गुरूंनी तत्त्वाशी एकरूप होण्यासाठी व लोकोद्धारासाठी आपल्या-

पासून दूर पाठविले होते त्याप्रमाणेच श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी त्यांचे पट्टशिष्य व एकांतिक भक्त श्रीकल्याणस्वामीमहाराज यांना डोमगावी पाठवून उपरोक्त हेतू कसे सिद्धीस नेले, हे श्री. अनंतदास रामदासी यांनी " सप्तकांडात्मक श्रीदासायन " या श्रीसमर्थचरित्राच्या उत्तरार्ध–द्वितीय खंडात जे वर्णन केले आहे, ते वाचले म्हणजे स्पष्ट होते. ते असे म्हणतात की, " शके १६०० च्या विजयादशमीस श्रीशिवछत्रपतींनी श्रीसमर्थांना तेहेतीस गावांची प्रसिद्ध सनद अर्पण केल्यानन्तर एक दिवस ते चाफळ येथे एकान्तात बसले असता श्रीकल्याणस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, " अरे कल्याणा ! राजांनी दिलेल्या गावांपैकी डोमगाव येथे जाऊन मठ स्थापन कर, तेथेच एकान्तात राहून तत्त्वरूप हो आणि तिकडील प्रान्तात उपासना वाढवून जगदुद्धार कर. "

श्रीसमर्थांची व श्रीकल्याणस्वामींची शके १९५६ मध्ये गाठ पडल्यापासून त्यांना श्रीसमर्थांनी कधी क्षणभरही डोळ्याआड केलेले नव्हते. ते रात्रंदिवस श्रीसमर्थांच्या सन्निध असत. श्रीसमर्थांचा वियोग म्हणून कसा तो त्यांना माहीतच नव्हता. ते आपल्या श्रीसद्‌गुरूंची कोणतीही व कसलीही आज्ञा असली; तरी ती तत्काळ शिरोधार्य करून त्याप्रमाणे तंतोतंत आचरण करीत असत. असे असताना श्रीसमर्थांची ही अशी आज्ञा एकदम झालेली ऐकून त्यांना केवळ आकाश कोसळल्याप्रमाणे झाले. श्रीकल्याणस्वामीमहाराजांना श्रीसमर्थ केवळ मायबापाप्रमाणे वाटत असत. त्यामुळे त्यांना आपल्याला श्रीसमर्थांनी डोमगावास जावयाची आज्ञा करणे म्हणजे मायलेकरांची ताटातूट करण्याप्रमाणेच आहे असे वाटू लागले.

अशा स्थितीत श्रीकल्याणस्वामीमहाराज श्रीसमर्थ सद्‌गुरुचरणी

मस्तक ठेवून हात जोडून नम्रतेनें उभे राहिले आणि खाली पहात गहिंवरलेल्या आवाजाने त्यांनी श्रीसमर्थांना असे विचारले की "मजकडून काही अन्याय किंवा अपराध घडला, की आपणास माझा कंटाळा आला ? " श्रीकल्याणस्वामीमहाराजांसारख्या एकनिष्ठ व प्रेमळ सेवकाचे वियोगाचे दु:ख पाहून श्रीसमर्थ रुद्ध कंठाने त्यांना असे म्हणाले की, "नाही रे ! तसा काही प्रकार नाही ! बाबा रे ! तुला आजपर्यंन्त जे ज्ञान दिले ते तुझ्या पोटी जिरण्यासाठी व तू अखंड साधन करून तत्त्वरूप होण्यासाठी तुला डोमगावी जाणें आवश्यकच आहे. त्याचप्रमाणे झाडाखाली झाड वाढत नाही व कोणालाही स्वतंत्रता दिल्याशिवाय त्याची योग्यता प्रकट होत नाही, हे लक्षात ठेव. याकरिता तू कष्टी होऊ नकोस. श्रीरघुपतीची इच्छा तशीच आहे. तुला तिकडे जाणे भागच आहे; कारण पूर्वी एकदा आपण सर्वजण इतर मंडळींसहवर्तमान सीनेच्या तीराने चाललो असताना डोमगाव जवळील एका जाळीला आमच्या मेखळेचा पदर अडकला होता. तो तू सोडविलास. त्यावेळच्या या गोष्टीचे कदाचित् तुला स्मरण नसेल; पण त्यातील भाव असा की, त्या ठिकाणी आम्ही असावे. त्या भूमीचे निमंत्रण आम्हाला होते; पण आमचा पदर तू सोडविल्यामुळे आमची त्या जागेवरील कामगिरी तुझ्याकडे आली. ही श्रीरघुपतीचीच इच्छा आहे. ती आपणास कशी डावलता येईल ? आता त्या नेमलेल्या कामगिरीवर जाणे हे तुला क्रमप्राप्त आहे. हे सर्व जाणत असून तू अडाण्यासारखा रडतोस ? याला काय म्हणावे ? "

श्रीसमर्थांनी श्रीकल्याणस्वामीमहाराजांची अशी समजूत घातली; तरी त्यांच्या मनाचे समाधान न झाल्यामुळे ते त्यांना असे म्हणाले की, " महाराज ! आपला जो काही संकल्प असेल तो-मला

प्रमाण आहे; परन्तु श्रीचरणांची देह जाईपर्यंन्त निरन्तर सेवा करीत असावे असे अगदी मनापासून वाटते. आपण माझे अन्त:करण जाणताच आहात ! ”

श्रीकल्याणस्वामीमहाराजांची ही प्रार्थना ऐकून श्रीसमर्थ त्यांना असे म्हणाले की, “ काही चिन्ता नाही. तू काळजी करू नकोस. तू आहेस तोपर्यंन्त तुझ्या हातून सेवा घडेल. ” असा आशीर्वाद देऊन श्रीसमर्थांनी श्रीकल्याणस्वामीमहाराजांच्या मस्तकावर आपला पद्‌मकर ठेवून शक्तिसंक्रमणपूर्वक आपल्या जवळील सर्व सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी संक्रमित करून त्यांना डोमगावला जाण्यास आज्ञा दिली. श्रीसमर्थांच्या आज्ञेप्रमाणे डोमगावला गेल्यावर श्रीकल्याण-स्वामीमहाराज तत्त्वरूप कसे झाले व त्यांनी लोकसंग्रह कसा केला याचे वर्णन त्यांनी लिहिलेल्या “श्रीसमर्थ व कल्याणसंवाद” या त्यांच्या पुढील स्वकृत काव्यातून आल्याशिवाय राहात नाही. ते असे म्हणतात की–

**श्रीसमर्थ–**

ऐक बा कल्याणा हित उपदेश ।
प्राप्त जालें रहस्य जें कां तुज ॥ १ ॥
तेथें राहीं सदा न करी तत्त्वबोधा ।
जनाचिया वादा न प्रवर्तें ॥ २ ॥
श्रद्धावान पात्र जे भेटती तुज ।
त्यासी सांग गुज श्रीरामाचें ॥ ३ ॥
देह आत्मवादी जे शाब्दिक ज्ञानी ।
तयाचिये कानीं स्वप्नीं नको ॥ ४ ॥
नको त्या दुष्टासी स्वप्नीं सांगू गोष्टी ।
पडेल तुझी तुटी श्रीरामाशीं ॥ ५ ॥

श्रीरामाशीं तुज न हो वेगळिक ।
मानावें स्वसुख योगस्थिती ॥ ६ ॥
योगस्थिति आतां गुप्त आहे बापा ।
नको सांगू अल्पा देहबुद्धीते ॥ ७ ॥
देहबुद्धीचे प्राणी त्यांशी भाषण न करी ।
वायां हे वैखरी वेचूं नको ॥ ८ ॥
निमिष्यभरी होऊं नको स्वरूपावेगळा ।
अंतरशील रामा जनायोगें ॥ ९ ॥
अनुभवी संतांशीं करी बा संवादू ।
रामदासी बोधू कल्याणातें ॥ १० ॥

पद :–

सांग बा कल्याणा तुझी स्थिती मज आतां ।
कोण्या योगे कोण्या पंथें ऐक्य रघुनाथा ॥ धृ० ॥
उपदेशिलें ज्ञान तें तुझें अंतरीं आलें ।
भेदबुद्धि सर्वहि गेली संशय मावळले ।
देहस्मृतीचा लोप जाला कोण मी कळलें ।
ऐसा प्रत्यय जाला कीं नाहीं सांग ये वेळे ॥ १ ॥
स्वप्न अवस्था निरसुनि बोध जागृत जाले कीं ।
भजनमुद्रा भक्तिकळा निज वोळखिलें कीं ।
सद्गुरुमहिमा ऐसें जाणुनि सुरती भोगिले कीं ।
मोहो जाऊच विस्मृति प्रतीति बाणली कीं ॥ २ ॥
वृत्ति निश्चळ होती किंवा चंचल हे जाली ।
पाहुनि स्वरुपालागीं तटस्थ होऊनि कां ( गेली ? ) ।
इतुक्यामाजीं येक प्रत्यय सांग ये वेळीं ॥ ३ ॥

तूं देह आहे कीं आत्मा होय कोण मज सांग ।
बद्धमुक्त कोण कोणा वासनेचा भोग ।
कैशा स्थिति पाऊनि सेविसी श्रीरंग ।
रामदासीं प्रश्न केला निज अभंग ।। ४ ।।

कल्याण :—

सुखरूप जालों स्वामी तुमचिया पादसेवें ।
कल्याण माझें जालें रंगलों सोहंभावे ।
चित्त हे वृत्ति माझी चैतन्यीं मुराली ।
संतोष स्वात्मसुख अनुभव किल्ली दिली ।
निर्विकल्पीं वास जाला अनुभव बोलूं बोली ।
विश्व हें नाहीं अवघें श्रीरामस्वरूप पाहीं ।। १ ।।
कनक हें पूर्णपणीं नगास ठाव कोठें ।
चैतन्य मृत्तिका ऐसी वायां हे घटमठें ।
नाहीं हा दृश्यभास अनुभव ऐसा स्पष्ट ।
पूर्ण ब्रह्मसनातन सद्‌गुरु येकनिष्ठ ।। २ ।।
पावलों धालों देवा तुझिया सेवाबळें ।
वेदांत श्रुति ज्यासी निर्विकल्प बोलती बोले ।
तें मी स्वयंभ जालों हे शब्द मावळले ।
मीतूंपण अवघें स्वामी गिळुनी उगले ठेले ।। ३ ।।
रामाविण वृत्ति माझी आणिक न जाय कोठे ।
जिकडे पाहे तिकडे श्रीराम माझा भेटे ।।
कल्याण म्हणे सकळ द्वैतपण जिथे आटे ।
रामदासस्वामी जई आनंदघन भेटे ।। ४ ।।

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी संचारात बरोबर असलेल्या आपल्या परमप्रिय शिष्याला, त्याच्या व लोकांच्या कल्याणासाठी दूर भडोचला पाठवून देऊन ते एकटेच पुढील संचाराला निघाले. श्रीस्वामीमहाराजांच्या आयुष्यात आता असे दिवस आले होते की, क्षणोक्षणी त्यांच्या वृत्ती स्वस्वरूपी लीन होऊ लागल्या. बाह्य जगाचे भान राहू नये अशी त्यांची वरचेवर अवस्था होऊ लागली. प्रवास करता करता व चालता चालता त्यांचे मन समाधिलीन होऊ लागले. आजुबाजूचे विश्व त्यांना आता स्वप्नवत् भासू लागले. माणसे, प्राणी, झाडे, नद्या इत्यादि सर्व काही एखाद्या चित्रातील निर्जीव चित्राप्रमाणे केवळ भास आहेत असे त्यांच्या प्रत्ययाला येऊ लागले. यामुळे त्यांचे मन जणूकाही आत्तापासूनच पैलतीरी लागले होते; परन्तु देवांच्या इच्छेप्रमाणे अजूनही त्यांना आपल्या देहाची खोळ टाकता येत नव्हती. श्रीदेवांना त्यांच्या देहाकडून अजूनही लोकोद्धाराचे कार्य करून घ्यावयाचे होते.

श्रीस्वामीमहाराज चाळीसगावहून निघून तापीनदीचे स्नान करून पुढे श्रीनर्मदातीरावरील खेडीघाट या गावी आले. त्या गावी पूर्वीची बरीच परिचित मंडळी असल्याने त्या सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांना मोठ्या प्रेमाने एक दिवस ठेवून घेतले. खेडीघाट येथील सर्व प्रेमी लोकांच्या आग्रहास्तव एक दिवस राहून श्रीस्वामीमहाराज चिखलद्यास जावयास निघाले. अशा रीतीने श्रीनर्मदानदीच्या तीरातीराने जाताजाता ते आषाढ शुद्ध द्वादशीच्या दिवशी धर्मपुरी या गावी आले. तेथे त्यांनी श्रीबिल्वामृतेश्वराच्या देवळात मुक्काम केला. तेथील लोकांना जेव्हा श्रीस्वामीमहाराज गावात आल्याचे कळले तेव्हा ते त्यांच्या दर्शनार्थ आले. त्यावेळी सर्वजण रात्री अकरा वाजे-

पर्यन्त श्रीस्वामीमहाराजांबरोबर बोलत बसले. त्यानन्तर श्रीस्वामी-महाराज देवळात झोपले व नेहमीच्या वहिवाटीप्रमाणे लोकांनी देवळाचा दरवाजा बाहेरून कुलूप लावून बंद केला व ते सर्वजण घरी निघून गेले. श्रीस्वामीमहाराज एकटेच देवळात राहिले. दुसऱ्या दिवशी भल्या पहाटेच देवळाचा दरवाजा उघडून श्रीस्वामीमहा-राजांचे दर्शन घेण्यासाठी सर्व लोक गेले. ज्यावेळी कुलूप उघडून सर्व मंडळी देवळात आली त्यावेळी त्यांना श्रीस्वामीमहाराज तेथे कोठेच दिसले नाहीत. मंदिराला लावलेली कुलपे तशीच असताना श्रीस्वामीमहाराज गुप्त झाल्याचे पाहून सर्व लोकांच्या आश्चर्याला सीमा राहिली नाही. त्यामुळे धर्मपुरी गावातील मंडळी श्रीस्वामी-महाराज गेले तरी कोठे म्हणून शोध करीत चारही बाजूला गेली. अशा प्रकारे शोध करता करता तिसऱ्या दिवशी सर्व लोकांना ही बातमी समजली की, धर्मपुरीहून ५० मैल दूर असलेल्या चिखलदा या गावी दुसऱ्या दिवशी सकाळीच श्रीस्वामीमहाराज जाऊन पोहोचले आहेत. हे कळल्यामुळे सर्व लोक अगदी थक्क झाले.

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराज आषाढ शुद्ध त्रयोदशीच्या दिवशी सकाळी चिखलदा या गावी आल्यावर त्यांनी आपला पुढील दाविसावा चातुर्मास तेथेच करण्याचे ठरविले.

श्रीस्वामीमहाराज ! आपण अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक राजा-धिराज श्रीसद्‌गुरुनाथमहाराज आहात ! आपण निखिल भूमंडळा-तील सर्वश्रेष्ठ असे परमहंस परिव्राजकाचार्य आहात ! आपण साक्षात् पूर्ण ब्रह्म असून आपल्या रूपाने जणू काही अमृताची मूर्तीच साकार झाली आहे ! आपण आमच्या हृदयस्थ श्रीसद्‌गुरुनाथ-महाराजांचे सद्‌गुरू आहात ! आपला अखण्ड जयजयकार असो !

श्रीस्वामीमहाराज ! ! आपण भक्त्याचार्य आहात ! देवर्षी

श्रीनारदांनी आपल्या भक्तिसूत्रात "सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा ॥२॥ अमृतस्वरूपा च ॥३॥, यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति ॥४॥, यत्प्राप्य न किंचिद्वांछति न शोचति न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति ॥५॥, यज्ज्ञात्वा मत्तो भवति, स्तब्धो भवति, आत्मारामो भवति ॥६॥" आणि "नारदस्तु तदर्पिताखिलाचारिता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ॥ १९ ॥" असे म्हणून भक्तीची जी पराकाष्ठा वर्णन केली आहे ती आपल्या रूपाने समूर्त व साकार झाली आहे. खरोखर ती भक्ती परमात्म्याबद्दल अत्यन्त प्रेमाच्या स्वरूपाची आहे. ॥२॥, आणि ही भक्ती अमृतस्वरूपही आहे. ॥३॥, ही ( परमप्रेमरूप व अमृतस्वरूप भक्ती ) प्राप्त झाल्यावर मनुष्य अर्थात् साधक सिद्ध म्हणजे कृतकृत्य होतो, अमर होतो, तृप्त होतो. ॥४॥, ही ( परमप्रेमरूप व अमृतस्वरूप भक्ती ) प्राप्त झाल्यावर भक्त अन्य कशाचीही किंचित्‌ही इच्छा करीत नाही. तो कोणाकरिताही शोक करीत नाही, कोणाचाही द्वेष करीत नाही, कोणत्याही विषयात, वस्तूत किंवा व्यक्तीमध्ये आसक्त म्हणजे रममाण होत नाही आणि कोणत्याही लौकिक कार्यात किंवा विषयभोगाच्या प्राप्तीमध्ये उत्साहयुक्त होत नाही. ॥५॥, त्या परमप्रेमरूप भक्तीला जाणल्यामुळे म्हणजे अनुभविल्यामुळे भक्त उन्मत्त अर्थात् आनन्दविभोर होतो, स्तब्ध म्हणजे शान्त होतो आणि आत्मरत होतो म्हणजे आत्मस्वरूपात रममाण होऊन आपला आपल्याच ठिकाणी रंगून जातो ॥६॥ देवर्षी श्रीनारदांच्या मताप्रमाणे भक्त आपली सर्व कर्मे भगवन्ताला अर्पण करतो आणि त्याचे क्षणभर जरी यत्किंचितही विस्मरण झाले तरी तो परमव्याकुळ होतो. हीच खरी भक्ती होय. ॥१९॥

श्रीस्वामीमहाराज ! ! ! आपण आपल्या कृपेच्या म्हणजेच

शक्तिसंक्रमणाच्या अपरंपार अशा लोकोत्तर, लोकविलक्षण व अलौकिक सामर्थ्याने भक्ती जागृत करून मायेने उत्पन्न केलेली अनादि भ्रांती, कल्पना, वृत्ती, जीवपणाचा काळिमा, कर्मरेखेची सत्ता, अज्ञान व जन्ममरण परंपरा चुकवून शिष्याला अमृताच्या सागरात बुडवून स्वस्वरूपाच्या अखंड अनुभवाचे दान करीत असल्यामुळे आपल्या कृपेच्या करणीला पारावार नाही, हेच नितान्त सत्य आहे ! आपण श्रीपादश्रीवल्लभ श्रीमन्नृसिंहसरस्वती श्रीदत्ता-त्रेयस्वरूप असून कलियुगात जन्मलेल्या आमच्यासारख्या जड-जीवांचा उद्धार करण्याकरिताच "योगिराज" या नावाने या भूतलावर अवतार धारण करून आमच्या श्रीसद्‌गुरुनाथमहा-राजांच्या रूपाने आम्हाला सिद्धयोगान्तर्गत भक्तियोगाच्या योग-मार्गाची दीक्षा देऊन श्रीसंत एकनाथमहाराजांनी "आनन्दलहरी" या प्रकरण ग्रंथात म्हटल्याप्रमाणे "भवभ्रमातें निरसलें। जन्म-मरणातें चुकविलें। देहीं असतां मुक्त केलें। स्वरूपीं मेळविलें आपुलिया ॥ ३१ ॥ जेथ जन्ममरण जालें वावो। तेथें बंधमुक्त कैंचा ठावो। जीव गिळूनि आपुला उगवो। विसरला पाहाहो दुजेपण ॥ ३४ ॥" अशी स्थिती प्राप्त करून देऊन आमच्यावर जी अपरंपार कृपा केलेली आहे, ती कृपा श्रीसद्‌गुरुभक्तीनेच प्राप्त होणारी असल्यामुळे, या दृष्टीने श्रीसंत एकनाथमहाराजांनी आपल्या "आनन्दलहरी" या प्रकरण ग्रंथात श्रीसद्‌गुरूंची जी महती वर्णन केली आहे तीच आपल्या परमकोमलचरणी प्रस्तुत करून आम्हाला भक्तीचा परमानन्द प्राप्त करू देण्याची प्रार्थना करीत आहोत.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॐ नमो सच्चिदानन्दघना ॥

जो केवळ जाणता। तो मायेचा नेणता।
साधु भगवन्ताच्या ये समता। म्हणोनि बद्धता न घडे त्यासी ॥६७॥
त्यासी माया मिथ्या कळली पाही। तो देहीं असोनी विदेही।
जन्ममरणाचें भय नाहीं। सच्चिदानंदडोहीं क्रीडतु ॥ ६८ ॥
जयासी नाहीं आत्मज्ञान। तयासी देहाचें बंधन।
नाना दुःखें भोग दारुण। जन्ममरण भोगवी ॥ ६९ ॥
जे सद्गुरूचे अंकित। तयांसी देह दुर्लभ बहुत।
स्वरूपीं होऊनियां रत। सुखें भोगित स्वानंद ॥ ७० ॥
जैसें द्रव्याचेनि गुणें। एकीं विष घेऊनी भक्षणें।
एकीं उपभोग भोगणें। एक दानधर्म करिती ॥ ७१ ॥
तेथ द्रव्यासी नाहीं दूषणें। आपुलें संचित भोगणें।
तैसें देहाचेनि गुणें। बद्धमुक्तपण भोगिजे ॥ ७२ ॥
जे नाना पातकें करित। त्यांसी देह काय करा म्हणत ?।
कां जो श्रीहरीसी शरणागत। तयासी सांगत देह काई ॥७३॥
देह पाहतां अचेतन। देहासी कैचें दूषण।
जो देहासी चेष्टवी जाण। सुखदुःख भोग त्यालागीं ॥७४॥
जैसी काष्ठाची पुतळी केली। सर्व इंद्रियें निर्मिलीं।
परी चाळितेविण जाली। प्रेतरूप ॥ ७५ ॥
चाळिता बैसे अंतरीं। वोढी इंद्रियाची दोरी।
मग प्रवर्ते व्यापारी। सूत्रानुक्रमें ॥ ७६ ॥
तेथ सुखदुःख अवस्था। कैसी घडे पुतळ्यांच्या माथां।
जो अंतरीं चेष्टविता। तोचि कर्ता सर्वही ॥ ७७ ॥
तैसे देह अचेतन। त्यातें चालवितें मन।
सर्व इंद्रियें त्याचे आधीन। स्वामी जाण तयांचा ॥ ७८ ॥

पापपुण्याची कल्पना । संकल्पविकल्प उठती मना ।
विसरोनी आत्मज्ञाना । जन्ममरण भोगिती ॥७९॥
ज्यासी सद्‌गुरुकृपा होय । त्याचे मनपण विरोनि जाय ।
संकल्पाविकल्पां नुरे ठाय । मिरासी होय मोक्षाचा ॥८०॥
सद्‌गुरूचे कृपेवीण । नव्हे मोक्षाचें साधन ।
जन्ममरणाचें बंधन । न चुके जाण सर्वथा ॥ ८१ ॥
एक गुरुभक्तांतें निंदिती । एक गुरु म्हणजे काय म्हणती ।
जे जे गुरुतें सेविती । तयांसी प्राप्ती काय जाली ॥ ८२ ॥
सद्‌गुरुभजनीं लाधलें सुख । तें नेणती अज्ञान मूर्ख ।
विषयसुखें मातले देख । जन्ममरणाचें दुःख भोगिती ॥८३॥
जैसी नपुंसकाची पद्‌मिणी । आलिया सुख नुपजे अंतःकरणीं ।
किंवा उलूकास दिनमणी । देखतां नयनीं सुख काय ? ॥८४॥
गर्भांधासी लावण्यवता । गर्दभासी सुगंधता ।
सुकरू मिष्टान्न भोक्ता । हें सर्वथा न घडेचि ॥ ८५ ॥
श्वानासी शेज सुमनाची । बधिराशी गोडी कीर्तनाची ।
रोगियासी मिष्टान्नाची । लागे रुची हें न घडेचि ॥ ८६ ॥
तैसी अभक्तांसी गुरुभक्ती । हें न घडे हो कल्पांतीं ।
अनंता जन्माचीं पुण्यें फळतीं । तरीच प्राप्ती सद्‌गुरुभजन ॥८७॥
मूर्खासी सद्‌गुरुभजन । हे सर्वथा न घडे जाण ।
जन्ममरणाचें अधिष्ठान । संचित स्थान पापाचें ॥ ८८ ॥
मुकें शब्दाची चातुर्यता । म्हैसा होईल पुराणवक्ता ।
किंवा पांगुळ जाईल तीर्था । हें सर्वथा न घडेचि ॥ ८९ ॥
मर्कटासी सिंहासन । किंवा कागासी अमृतपान ।
वांझेसी वरमायपण । सर्वथा न जाण घडेचि ॥ ९० ॥

जे जीव तदंश होती। तेचि पावती सद्‌गुरुभक्ती।
निजसुखातें भोगिती। इतरा भ्रांती जन मूढां ॥ ९१ ॥
श्रोतीं न मानावा खेद। म्यां आपुल्या मनासी केला बोध।
भावें भजावा आनंदकंद। मोक्षाचें पद पावावया ॥ ९२ ॥
सुख धरोनी प्रपंचाचें। संचित होतसे पापाचें।
भरतें दाटे भवसिंधूचें। जन्ममरणाचें भय थोर ॥ ९३ ॥
प्रपंचीं जरी सुख जोडे। तरी कां सेविती गिरीकडे।
राज्य टाकुनी गेले थोडे। ते काय वेडे म्हणावे ? ॥ ९४ ॥
भर्तृहरीनें राज्य टाकिले। तेणें श्रीगोरखातें पुसिलें।
राज्य टाकुनि मुंडित जाले। कितेक गेले भूपती ॥ ९५ ॥
मग श्रीगोरक्षनाथ बोलती। नव्याणव कोटी भूपती।
इतरांची नाहीं गणती। योगाप्रती निघाले ॥ ९६ ॥
भवसिंधूच्या डोहीं। विषयाचा गळ घातला पाही।
काळ लक्षी दिशा दाही। जीव सर्वही भक्षावया ॥ ९७ ॥
जो सद्‌गुरूसी शरण जाये। तो काळाचाही काळ होये।
काळ तयासी शरण जाये। ऐसें बोलताहे वेदांत ॥ ९८ ॥
नलगे योगयाग साधन। नलगे व्रत तीर्थ अनुष्ठान।
नलगे वैराग्य तप दान। एक सद्‌गुरुभजन करावे ॥ ९९ ॥
अनेक कर्में केलीं पाहे। तपें राज्य प्राप्त होये।
राज्यांतीं नर्क होय। ऐसें बोलताहे वेदशास्त्र ॥ १०० ॥
स्वर्गीं काय सांगों सुख। पुण्य सरलियां लोटिती देख।
मागुती पाहावया मृत्युलोक। स्वर्गनर्क भोगावया ॥१०१॥
नर्क म्हणजे गर्भवास। गर्भीं पचावे नवमास।
नाना दुःखें होती जिवास। त्याहूनि विशेष दुःख काय ॥१०२॥

जेणें मृत्यूचें मूळ तुटें । जन्म मरणाचे खत फाटे ।
पापपुण्याची वाढी खुंटे । धरणें उठे काळाचें ॥ १०३ ॥
ऐसा होवावया एक उपावो । भावें भजावा सद्गुरुरावो ।
जन्ममरणा पुसी ठावो । स्वरूपीं जीव मेळवी ॥ १०४ ॥
येथून नाहीं जीव नेला । आणि स्वरूपीं मेळविला ।
देहीं असतां मुक्त केला । उगव दाविला जीवासी ॥१०५॥
जीव आपुला उगव पाहे । इंद्रियांसहित तल्लीन होय ।
तेथें काळ करील काय । जन्ममरण अपाय खुंटले ॥ १०६॥
जैसे भूपतिचिया बाळें । अनिवार अन्याय केले ।
तें मातेपुढें जाऊनि बैसलें । मग काय चाले कोणाचें ॥१०७॥
तैसा जीव स्वरूपींची असे । नाना कर्मे केली बहुवसें ।
तो स्वरूपीं जालिया समरसें । तेथें काळासी रीघ कैंचा ।१०८।
स्वरूप अखंडदंडायमान । सर्वां ठाईं परिपूर्ण ।
तेथें जिवासी कैंचें जीवपण । समरसोनि एक जालें ॥१०९॥
जैसें सागरीहूनी लवण । जळापासूनि निर्माण ।
सगुणत्वें जालें कठीण । म्हणोनि भिन्न न घडे त्यासी ।११०।
तेंचि जळामाजीं घालितां । जळचि होय तत्त्वतां ।
तें परतोन येईल हाता । हें सर्वथा न घडेचि ॥ १११ ॥
यालागीं सद्गुरूचें भजन । सर्वांहूनि वरिष्ठ जाण ।
अवतारादिक आपण । सद्गुरूसी शरण रिघावे ॥ ११२ ॥
रामराम स्मरतां घोष । तेणें तुटती भवपाश ।
तोहि शरण श्रीवसिष्ठास । गुरुभक्तीस सादर ॥ ११३ ॥
पूर्णब्रह्म श्रीकृष्णनाथ । तोहि म्हणवी गुरुभक्त ।
दुर्वास ऋषीची सेवा करित । नित्य मुक्तीलागीं ॥११४॥

मुक्त पद आलें हातां। भय न धरी कर्म करितां।
भोग भोगोनि अभोक्ता। कर्में करूनि अलिप्तता यालागीं ॥
ब्रह्मपदाचा अधिकारी। म्हणोनि विश्वातें उद्धरी।
स्मरणमात्रें दुरितें हरी। तो श्रीहरी गुरुभक्त॥ ११६ ॥
जैसी कासवीची उत्पत्ती। गर्भांध जाली संतती।
ते चक्षुविण वाढती। हें कल्पांतीं घडेना॥ ११७ ॥
तैसें सद्गुरु कृपेवीण। पावले मोक्षाचें सदन।
भूत भविष्य वर्तमान। ऐकिलें नाहीं जनीं कोठें ॥ ११८ ॥
नामया शरण भगवंतासी। भगवंत तरी प्रत्यक्ष त्यासी।
हरी शिकवी नामयासी। सद्गुरुविण सुखासी न पाविजे।११९।
तेणें मानूनिया वचन। रिघाला सद्गुरूसी शरण।
रूप पाहावया निर्गुण। पंढरीनाथाचें ॥ १२० ॥
तेणें खेचरविसा केला गुरू। तेव्हां जाला साक्षात्कारू।
तेणें केला ब्रह्मपूर्णपरू। निजसुखाचें घरू पावला ॥ १२१ ॥
एक सद्गुरुकृपेवीण। न तुटे जिवाचे बंधन।
सद्भावी जे भाविक जन। तयांसी हे वचन मानले ॥१२२॥
जें या वचनांते मानिती। भावें सद्गुरूतें वंदिती।
त्यांचें घरीं चारी मुक्ती। दास्य करिती अनायासीं ॥१२३॥
बहुत बोलोनियां काय। ज्याचे पदरीं पुण्य होय।
तोचि सद्गुरूसी शरण जाय। मुक्ती लाहे येचि देहीं ॥१२४॥
याचि देहीं याच डोळां। भोगिजे मुक्तीचा सोहळा।
ऐसा कोणीएक विरळा। तोचि जिव्हाळा स्वरूपाचा ॥१२५॥
त्यासी देखिल्या दृष्टीं। मुक्ती लाहिजे उठाउठीं।
मा त्यासीं पडल्या गांठी। आनंद सृष्टीं न समाये ॥१२६॥

तो म्यां देखिला जनार्दन । देखतांच गेला भवभ्रम ।
सुख जालें अनुपम्य घन । पावलों सदन मोक्षाचें ॥१२७॥
मस्तकीं लागतां तयाचा करू । न मोडतां सृष्टीचा वेव्हारू ।
सर्व जालें शून्याकारू । तेजें अंबर दाटलें ॥१२८॥
तया तेजाचा पारू । नेणती ब्रह्मा हरि हरू ।
वेद राहिले मौन्याकारू । श्रुतीसी विचारू पडिलासे ॥१२९॥
तयातें काय वाणावें । कवणा उपमेतें आणावें ।
त्यावीण दुजें देखावें । तरी सांगावे साक्षित्वें ॥१३०॥
जो निर्गुण निराकार । निरुपम्य निराधार ।
परब्रह्म निर्विकार । विश्वंभर अव्यक्त ॥१३१॥
अखंडतेजें सदोदित । उत्पत्तिप्रलया विरहित ।
व्यापुनी सर्वांसी अलिप्त । त्यावीण रिता ठाव नाहीं ॥१३२॥
जो कां वस्तु परात्पर । सगुण निर्गुणाचें उदर ।
वेदां नकळे जयाचा पार । शब्दाचा विचार खुंटला ॥१३३॥
मनें जयातें देखिजे । तयातें शब्दें वानिजे ।
जेथें मनें मनपणा मुकिजे । तो शब्दें बोलिजे कवणे परी ॥
मन सकळांतें चाळितें । तेथ ठाव नाहीं मनातें ।
यावरी कैंचे इंद्रियांतें । देखतां स्वरूपातें पावतील ॥१३५॥
जरी म्हणाल स्वरूप निराकार । तरी कोठूनि जाला विस्तार ।
या शब्दाचा विचार । श्रोतीं सादर परिसावा ॥१३६॥
जरी उपसाहित्यें सांगावें । तरी साहित्य कवणातें द्यावें ।
त्याचिया समता दुजें देखावें । तरी बोलावें साहित्य ॥१३७॥
परी बोलतों अल्पमती । भावें परिसावें सज्जन श्रोतीं ।
रविकिरणापुढें काडवाती । तैसें मतीं बोलतों ॥१३८॥

जैसे पाहतां वटबिजासी । सूक्ष्मत्वें नये दृष्टीसी ।
निराकार असता तयासी । तेथें द्रुमासी ठाव कैंचा ॥१३९॥
बिजामाजीं असतां अंकुर । बिजीं होता बीजाकार ।
सूक्ष्मत्वें निघाला बाहेर । मग अपार वाढला ॥१४०॥
त्वचा काष्ठें फळें पत्रें । बिजीं होतें बीजाकारें ।
तोचि महावृक्ष विस्तारे । मग पसरे स्वइच्छा ॥१४१॥
नाहीं म्हणतां विस्तारला । आहे म्हणों तरी नाहीं देखिला ।
बीजामांजीं होता संचला । तोचि विस्तारला सगुणत्वें॥१४२॥
तैसें निर्गुण स्वरूपा माझारीं । अनंतब्रह्मांडांची भरोवरी ।
स्वरूपाकार असतां अंतरीं । तेंचि बाहेरीं निघालें ॥१४३॥
बीजें व्यापिलें वृक्षासी । तैसें निर्गुणें व्यापिलें सगुणासी ।
शब्दें आणिलें भिन्नरणासी । जैसें कनकासी अलंकारनामें ॥
माया स्वरूपीं तदंश होती । ते इच्छेगुणें आणिलें व्यक्ती ।
सर्व गुणांतें जाली प्रसवती । करी मूर्ती त्रिगुणाची॥१४५॥
करी नाना रचनेतें । परी भिन्नत्व नाहीं स्वरूपातें ।
स्वरूपें व्यापिलें सर्वातें । जैसें अलंकारातें सुवर्ण ॥१४६॥
ऐसा स्वरूपाचा विस्तारु । होऊनि उरला अपारु ।
तया स्वरूपाचा विस्तारु । ब्रह्मादिहरिहरु वेडावले ॥१४७॥
त्यांतें मौन्येंचि पाहिजे । रसनेंवीण गोडी घेइजे ।
भाग्येंविण सुख भोगिजे । पद पाविजे गुरुखुणें ॥१४८॥
आतां बोलणें खुंटलें । शब्दाचें चातुर्य राहिलें ।
दृष्टीचें देखणें उरलें । तेंहि निमालें शेवटीं ॥१४९॥
सद्गुरूचे निजदास । तेचि पावती ये खुणेस ।
परिसतां नावडे येरास । जैसे पक्षियासी नारळ ॥१५०॥

सद्‌गुरुमंत्र उपदेशातत्त्वता। मोक्ष तत्काळ पावे त्वरिता।
ऐसें असे यथार्थता। सद्‌गुरूसी मन नाहीं सत्यत्वें ॥१५१॥

  

श्रीस्वामीमहाराज!!! अशा प्रकारे आपल्या अपार कृपाबलाने आमच्याकडून आपल्या चरणकमलांची सेवा घडून येऊन आम्ही ब्रह्मरूप होऊन आपली भक्ती करावी व आपल्याच चरित्ररूप गंगेत स्नान करून आपला सत्संग करावा अशी आमची तीव्र इच्छा आहे; कारण या दृष्टीनेच भगवान् श्रीगोपाळकृष्णनाथांनी "श्रीमद् भागवतात" सिद्धान्तरूपाने असे कथन केले आहे की, "प्रायेण भक्तियोगेन सत्संगेन विनोद्धव। नोपायो विद्यते सध्र्यङ्‌प्रायणं हि सतामहम् ॥ ११.११.४८ ॥" याचा अर्थच असा आहे की, "हे उद्धवा! भगवद्‌भक्ती व साधुसमागम यांवाचून संसार तरून जाण्याचा दुसरा चांगला उपाय नाही. साधूंचा अन्तरात्मा माझ्या ठिकाणी नित्य आसक्त असल्यामुळे त्यांच्या समागमाने माझी प्राप्ती सहजच सुलभपणे होते." यादृष्टीने "श्रीमद् भागवत महापुराणात" भगवान् श्रीकृष्णांनी भक्तराज उद्धवाला सांगितलेला भक्तीचा व सत्संगाचा महिमाच आम्ही आपल्या चरणी प्रस्तुत करून आपल्या भक्तीची व सत्संगाची साधनरूपाने आम्हाला प्राप्ती व्हावी म्हणून आपल्या चरणी अत्यन्त विनम्र भावाने प्रार्थना करीत आहोत.

हे प्रिय श्रीवासुदेवा! हे स्वामी! हे अखिल ब्रह्माण्डनायका! हे देवाधिदेवा! हे भगवन्ता! कर्मरूप दृढबन्धनातून मुक्त होऊ इच्छिणारे भगवद्‌भक्त अत्यन्त भक्तिभावाने आपल्या हृदयात आपलेच चिन्तन व ध्यान करीत असल्यामुळे आम्हीही आमची

बुद्धी, इन्द्रिये, मन, प्राण व वाणी ही सर्व आपल्या पदकमली लीन करून आपल्याला आम्ही प्रणाम करीत आहोत. ॥ १६.६.७ ॥

हे करुणाकर श्रीवासुदेवा ! हे अजित प्रभो ! आपण मायिक रजादि गुणांचा आश्रय करून या अचिन्त्य नामरूपात्मक प्रपंचाची त्रिगुणमयी मायेच्या द्वारा आपल्या ठिकाणीच रचना करता, पालन करता आणि त्याचा संहारही करता. हें सर्व करीत असतानाही आपण या कर्मांनी लिप्त होत नाही; कारण की, आपण रागद्वेषादि सर्व दोषांपासून पूर्णपणे मुक्त आहात आणि आपण आपल्या निरावरण अशा अखण्ड स्वरूपभूत परमानन्दात मग्न राहता. असे असले; तरी आज आमचे असे भाग्य उदयास आले की, आम्ही केवळ विषयसुखात निमग्न असतानाही आम्हाला आपल्या दिव्य चरित्राचे वाचन करण्याचे भाग्य लाभत आहे. ॥ ८ ॥

हे भवभंजन श्रीवासुदेवा ! हे अजय प्रभो ! या सृष्टीपासून आपणाला स्वतःला काही लाभ नसल्यामुळे आपण हा व्यर्थ खटाटोप का करता ? अशी शंका येणे साहजिकच आहे. परन्तु लोकांची चित्तशुद्धी होऊन त्यांना परमार्थप्राप्ती व्हावी हाच हा सर्व व्यवसाय करण्याचा आपला हेतू आहे, यात काहीच शंका नाही. हे विश्ववंद्या श्रीवासुदेवा ! सत्त्वगुणी पुरुषांनी आपल्या लीलेचे श्रवण केले म्हणजे आपल्या चरित्राच्या मननाविषयी त्यांच्या ठिकाणी अधिकाधिक श्रद्धा उत्पन्न होऊन त्यांचे चित्त आपल्या ध्यानाने शुद्ध होत जाते व त्या योगाने ते रागद्वेषरहित झाले म्हणजे मायातीत होऊन जीव आपल्या स्वरूपी मिळून जातो ! हे ईश्वरा ! सात्त्विक पुरुषांना आपल्या चरित्राच्या श्रवणाने हा जो अमोलिक लाभ होतो, तो विषयलोलुप पुरुषांना उपासना, शास्त्रपठण, वेदाध्ययन, दान, तपश्चर्या व कर्माचरण यांच्या योगानेही होत नाही. ॥ ९ ॥

हे मायानाशक श्रीवासुदेवा ! हे अमेय प्रभो ! आपल्या लीलेचे चिन्तन करणाऱ्याला असा परमार्थ प्राप्त होत असल्यामुळे मुमुक्षु-जन सायुज्यता प्राप्त करण्याकरिता मोठ्या कोमल अन्तःकरणाने आपले अन्तर्यामी ध्यान करतात. पांचरात्र विधीने उपासना करणारे भगवद्‍भक्त आपल्या ऐश्वर्याची प्राप्ती व्हावी म्हणून वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध या चार विभूतींचे पूजन करतात. जितेन्द्रिय व विवेकसंपन्न धीर पुरुष स्वर्गादि लोकांचे अतिक्रमण करून भगवद्‍धामाची प्राप्ती व्हावी म्हणून आपली त्रिकालपूजा करतात. यज्ञानुष्ठान करणारे पुरुष आपल्या इंद्रादिक विभूतींना मोठ्या आदराने तिन्ही वेदांच्या द्वारा सांगितल्याप्रमाणे आवहनीयादिक अग्नींमध्ये हविर्भाग अर्पण करून आपलेच चिन्तन करतात. योगसाधनात निमग्न असणारे पुरुष आपले आत्मस्वरूप प्राप्त होण्याकरिता आपल्या हृदयांतरात दहरविद्या इत्यादिंच्या द्वारा आपल्याच चरणकमलांचे ध्यान करतात आणि परमभागवत पुरुष केवळ आपल्याच सदानन्दस्वरूपाचा निदिध्यास करतात. हे प्रभो ! आपले हे चरणकमल आमच्या सर्व अशुभ विषयवासना भस्म व्हाव्यात म्हणून अग्निस्वरूप होवोत. ते अग्निप्रमाणे आमच्या सर्व पापांना व संकटांना भस्म करोत. हे व्हावे म्हणूनच आम्ही आपल्या दर्शनाकरिता येथे आलो आहोत. तरी आमच्या अन्तः-करणातील विषयवासना समूळ नष्ट करून टाका. ॥ १०–११ ॥

हे षड्‍रिपुनाशक श्रीवासुदेवा ! हे अप्रमेय प्रभो ! मुमुक्षुजन, भगवद्‍भक्त, विवेकशील पुरुष, याज्ञिक, योगिजन व परमभागवत या सहा प्रकारच्या साधकांमध्ये परमभागवतांवर आपली अत्यन्त प्रीती असते; कारण आपल्या वक्षस्थलावर या परमभागवतांनी अर्पिलेली ही वनमाला शिळी झालेली असली; तरी ती आपल्याला

श्रीलक्ष्मीपेक्षाही अधिक प्रिय आहे. मात्र आपण या माळेला श्रीलक्ष्मीच्या बरोबरीचे स्थान दिल्यामुळे सवतीप्रमाणे वेड्या-सारखी हिचा ती हेवा करीत असते. हे विश्वाधारा! खरोखर परमभागवतांना आपण याप्रमाणे श्रीलक्ष्मीपेक्षाही अधिक प्रिय मानता व त्यांची पूजा मोठ्या कौतुकाने स्वीकारता! याकरिता हे ब्रह्मांडनायका! हे भक्तवत्सल प्रभू! आपले चरणकमल सदासर्वदा आमच्या विषयवासनांना जाळून टाकणारे अग्निस्वरूप होवोत, अशी आमची आपल्या चरणी प्रार्थना आहे. अशा रीतीने आमची पूजा ग्रहण करून आमचे कर्मबंध तोडून टाका. ॥ १२ ॥

हे अष्टबंधनाशक श्रीवासुदेवा! हे अनन्त प्रभो! हे वदान्यपते! आपल्या चरणकमलाच्या ठिकाणी आपल्या साधुस्वभावाच्या भक्तांविषयी प्रेम व दुष्टस्वभावाच्या अभक्तांविषयी कोप आहे, ही गोष्ट फार पुरातन कालापासून प्रसिद्ध आहे. आपण वामनावतारात तीन पावलात बलिराजाचे बंधन करण्याकरिता जेव्हा दुसरे पाऊल उचलून ते सत्यलोकापर्यंन्त नेले तेव्हा ते जणूकाही आपल्या विजयध्वजासारखे दिसू लागले. हे प्रिय गोविन्दा! आपल्या चरणांच्या अग्रभागातून निघून तिन्ही लोकांवर वृष्टी करून त्यांना पावन करणाऱ्या श्रीगंगेच्या तीन धारा या तीन पताकांप्रमाणे फडकत आहेत असे वाटू लागले. हे भूमन् प्रभो! देव व दैत्य यांचे युद्ध चालले असताना त्या दोघांनी या जयपताका अवलोकन करताच दैत्यांची भीतीने एकच धांदल उडाली व देवांनी त्यास जिंकून त्यांचा सर्वस्वी मोड करून टाकिला. हे त्रिविक्रम प्रभो! आपली पदकमले साधूंना सद्गती देण्याविषयी आणि दुर्जनांना दुर्गती देण्याविषयी सदैव तत्पर असतात. हे माधवा! आम्हा सेवकांवर करुणा करून आपण आमचे पातक नष्ट करा. ॥ १२ ॥

हे अष्टपाशनाशक श्रीवासुदेवा ! हे विश्वाधिपते प्रभो ! ब्रह्मा इत्यादि जे जे म्हणून शरीरधारी आहेत ते ते सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या परस्पर विरोधी भावांची टक्कर झाली की, जन्म-मरण भोगीत राहतात. त्यामुळे ते सुख-दुःखाच्या पलीकडे राहू शकत नाहीत; कारण आपल्या मायेने देह धारण करणारे पुरुष कितीही पराक्रमी किंवा सत्ताधीश असले; तरी ते नाकात वेसण घातलेल्या वृषभाप्रमाणे आपल्याच अनुरोधाने वागत असल्यामुळे जयापजयाबद्दल मुळीच स्वतंत्र नसतात. या सर्वांच्या जीवनाचा आदि, मध्य व अन्त हे आपल्या अधीन आहेत. हे श्रीधरा ! सर्व काही करणारे किंवा करविणारे असे वास्तविक शक्तिमान् आपणच आहात आपण प्रकृती व पुरुष यांच्या पलीकडे असून मायोपाधिक सर्व जगताचे केवळ आपल्या इच्छेने नियंत्रण होत असल्यामुळे आपण कालस्वरूप आहात. याकरिता आपण आमच्यावर अनुग्रह करून आमचे शाश्वत कल्याण करा ! आपले चरणकमल आमचे कल्याण करोत ।।१४।।

हे मल-विक्षेप-आवरण नाशक श्रीवासुदेवा ! हे आदिपुरुषा ! आपणच या स्थावरजंगम ब्रह्माण्डाच्या उत्पत्ती, स्थिती व प्रलयाला परम कारण आहात; कारण की, प्रकृती, पुरुष व पंचमहाभूते या सर्वांचे आपण नियंते असून उन्हाळा, पावसाळा व हिवाळा या तीन पृथक् भेदांनी परिवर्तन करणारे आणि सर्वांना क्षयाकडे किंवा मृत्यूकडे घेऊन जाणारे असे संवत्सरात्मक काल आपणच आहात. आपली गती अबाध व गंभीर आहे. या सर्व कारणांमुळे आपल्याला पुरुषोत्तम असे म्हणतात. ।।१५।।

हे शक्तिसंपन्न श्रीवासुदेवा ! हे श्रीपते ! या चराचर विश्वाला उत्पन्न करणाऱ्या प्रकृतिपुरुषयोगाचे कर्तृत्व वस्तुतः आपणाकडेच

